# लवणाची मासोळी

स्वतंत्र सामाजिक कादंबरी

: लेखक :

ल. म. भिंगारे




किंमत ४॥ रुपये

: प्रकाशक :

दा. ना. मोघे, बी. ए.
स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल
कोल्हापूर.

प्रथमावृत्ति : वर्ष-प्रतिपदा १८८३



: मुद्रक :

चिं. पां. मोडक
समन्वय मुद्रणालय,
१९६/६९ सदाशिव पेठ, पुणें

लवणाची मासोळी । होय जरी जिव्हाळी ।
तरी जळीं ना वेगळी । न जिये जेवीं ॥

## : १ :

रघू कुठंतरी शून्याकडे दृष्टि लावून ताडताड चालला होता. मोटा गाडी-रस्ता सोडून त्यानं कॅनॉलच्या कडेची पायवाट धरली. डोक्यावर अजून ऊन रणरणत होत. इतक्या उनांतनं बाहेर पडायला वास्तविक आता कैऱ्याचे दिवससुद्धा उरले नव्हते. जोडीला कुणी नव्हतं. किती लांब जायचं आहे याचा पत्ता असल्याचं चिन्ह दिसत नव्हतं. त्याच्या चालण्याला कसलं बंधन नव्हतं. अंगांत एक रेघारेघाच्या कापडाच हात धुलाईचं दडकं अन् विटकी विजार; डोक्याला घामानं मेणचटलेली टोपी अन् पायात जुनाट गांवठी वहाणा—अशा वेषांत तो भरकटत होता. अन् त्याला पाहून कुणीहि गांवकऱ्यानं म्हटलं असतं, " पोरगं घरांतून पळून चाललेलं दिसतंय्— "

—पळून जायचा विचार रघूच्या डोक्यांत आला नव्हता असं नाहीं. पण बारा वर्षांच्या पोराच्या डोक्यांत पळायचं आलं तरी तें जाऊन जाणार कुटं? —दहा-पांच मैलांच्या पलीकडे त्याची धांव जाणं शक्य नव्हतं. आणि पळून जाऊन हवं तें साधणार असतं, तर तें करायलाहि रघूची ना नव्हती. पण—पण तें साधायचं नाहीं हें रघूला ठाऊक होतं.

रघूला जें साधायला हवं होतं तें अगदीं साधं होतं. चार दिवसांपूर्वींच सातवीच्या परीक्षेचा निकाल लागून रघू व्ह. फा. झाला होता. त्याच्या निकालाविषयीं कुणाच्याच मनांत शंका नव्हती. चांगला पंचावन्न टक्के मार्क मिळवून तो पास झाला होता. परीक्षेसाठीं सातारला जाऊन आल्यापासून त्यानं पुढच्या शिक्षणाचा ध्यास घेतला होता. परीक्षेच्या वेळेला ' एका वर्षांत तीन इयत्ता ', ' चार वर्षांत मॅट्रिक ' या क्लासवाल्याच्या जाहिरातींनीं, आपल्या शिक्षणाची कांहींतरी सोय झाली पाहिजे—हीच त्याची तळमळ वाढली होती.

ती गोष्ट रघूनं एकदा आपल्या वडलांच्याजवळ काढून पाहिली. पण कृष्णं-भटानी गरगर डोळे फिरवून त्याला गप्प बसवलें. रघूनं आपल्या आईजवळ हट्ट घेतला. रखमाबाईनं त्यातल्या त्यात सायीची वेळ बघून, ' पोराची हौस, त्याची हुषारी, आपलं मेलं जन्माचं दळिद्र ' या साऱ्याचा पाढा भटजींपुढं वाचला. पण " त्यातलं काही व्हायचं नाहीं " या एका वाक्याच्या पलीकडे कृष्णंभटजींनीं आपली मजल जाऊं दिली नाही. ' बायकांचा जन्म मेला अस-लाच ' म्हणून रखमाबाईनीं दोन दिवस उपास काढला. कृष्णंभटजी घरात असायची वेळ रघून बाहेर काढायला सुरुवात केली. कृष्णंभटजी मात्र ठरल्या-प्रमाण घरच किंवा आमत्रणाच अन्न पोटात पडल्याबरोबर इनामदाराच्याकडचा ब्रिजिकचा डाव खेळायचा क्रम न चुकता पाळीत होते. हें असच किती दिवस चालायचं होतं कुणास ठाऊक ?—पण रघूच्या निकालाच्या आधी दोन दिवस कृष्णभटांना वाचा फुटली.

" चिरंजीव कुठ आहेत ? अलीकडे जेवतांना सुद्धा घरात दिसेनासे झालेत ? "

" सुट्टीचेच दिवस आहेत. लवकर जेवून घेतो. जात असेल कुठ खेळाय-बिळायला. त्यानं तरी काय करायच आता ? "

" घरांत बसून कांहीं रूपावली, समासचक्र याचं अध्ययन केलं तर ? बापाच्या झोळींत धोंडा पडेल वाटतं ? तुम्हीच त्याचे फार लाड करतां— "

" पाठ काय करायचं तें पहाटेच करून टाकतो. तें चुकवीत नाहीं रघू. अन् पोरवय आहे— थोडं खेळावंसं वाटायचंच— "

" असं खेळत रहायला इनामदार नाहीं लागून राहिलों आम्ही. कळायला हवं आता — लहान नाही काहीं— "

" लहानच नाहींतर काय ? असं कितीसं वय आहे त्याचं ? परवा तर बारावं सरलं. त्यानं काय करायचं या वयात ? "

" या वयात मी लग्न लावायला जात होतों. मुहूर्ताच्या दिवसात तेवढेच पांच-दहा रुपये आणि दहा-वीस खण-नारळ पदरांत पडतात. यांना काहीं मिळवायला नको अन् शिकायला जायला पैसे मात्र हवेत. आणायचे कुणाच्या बापाचे ? "

" पोर आहे अजून-कळत नाहीं त्याला. समजाऊन सांगितल्यावर— "

" समजाऊन काय सांगायचं त्यांत ? आपलं आपण सारं ओळखायला हवं. तुमचीच फूस असते. परवां त्या तात्यांच्याकडे आमंत्रण होत. ' साफ जाणार नाहीं ' म्हणून सांगितलं. मलाच जावं लागलं— "

" माझं चुकलं असलं तर त्याबद्दल त्याला बोल लावायला नकोत. पण त्या तात्याच्या घरांत त्याला सारी ' भट – भट ' म्हणून चिडवतात. पोराच्या जातीला एवढं ' भट ' अन् ' गृहस्थ ' असे फरक केलेले आवडत नाहींत. आपली एक आहेच जन्माची भटकी. मिळालं पोराला शिकायला तर त्याची तरी सुटणूक होईल त्यातनं. मेल उठावं त्यानं बोलावं–जणूं कांही याच्या घरच आम्ही फुकटाफुकटीच खातों आहोंत !

" हें असलं बोलायच तर आधींच चांगला गृहस्थ पाहून द्यायला सांगायचं होतत बापाला. आमच्या घरात – भटाच्या घरात – आल्यावर भटकीच उगं काढून काय उपयोग ? दहा पिढ्या झाल्या उपाध्येपणाच्या या गावाच्या सीमेत. "

" माझं आता काय राहिलंय ? – माझा जन्मच गेला भटीण म्हणून घेण्यात. पण निदान पोराच्या पाठीमागं तरी तें नको अस मनात येतं राहून राहून–"

" तुमच्या मनांत यायला काय होतंय. दहा पिढ्याची वृत्ति सोडायची – म्हणजे आम्हांला गावात राहूं देईल का कुणी ? "

" मग काय – पोरानं अशीच भटकी करीत जन्म काढायचा ? अन् त्यात तरी काय मिळतंय तें दिसतंयच कीं – दुकानदाराच्या वाणसामानासारखी श्राद्धापक्षाच्या दक्षिणेचीसुद्धां आतां उधारी ठेवायला लागलेत ! अन् हीं सगळीं म्हणे गृहस्थाचीं घरं– "

" तें आमच आम्ही पाहून घेऊं. तुम्हांला दोन वेळेला कांहीं कमी पडलं नाहीं ना ? "

" असं म्हटल्यावर बोलणंच खुटलं. चाललंच आहे. असेल नशिबांत तर या होमांत रघूचीही आहुति पडूं दे–"

" जेवताना असलं अभद्र बोललेलं मला खपायचं नाहीं. आपल्या चिरंजीवाना संध्याकाळीं घरांत बसायला सांगा. "

" संध्याकाळचा तो अलीकडे तालमींत जातो–"

" कांहीं नको तालमींत जायला, अन् तिथ वाटेल त्या पोरात मिसळून ती शिवाशीव घरात कालवायला. आजपासून तालीम बंद. "

" सांगतें बापडी–"

—अन् त्या दिवशीं संध्याकाळीं रघूला तालीम चुकवून घरांत रहावं लागलं. त्यानं चागल्या खरपूस माराचीसुद्धा तयारी केली होती. रखमाबाई शंकराला नवस बोलून बमली. रघू त्या दिवशीं घरीं असूनही तिनं त्याला लवकर जेवायला घातलं. कृष्णभट आठ वाजून गेल्यावर घरीं परत आले; आणि त्यानीं इनामदाराकडे फराळ झाला म्हणून जेवायचं नसल्याचं सांगितलं. त्यानीं रघूला हांक मारली. आता काय होणार या शंकेनं, रखमाबाई दाराशी येऊन उभी राहिली. रघू मान खालीं घालून बापापुढं उभा राहिला.

" काय चिरंजीव, आज तालमींत गेला होतात कीं नाहीं ? "

" नाहीं. "

" समासचक्र–रूपावलीचं काहीं अध्ययन केलंत का ?

" पाठ झालींत दोन्हीं. "

" आतां पुढं काय करायचा बेत आहे ? "

" शिकायला जावसं वाटतंय् "

" मग जा कीं. कशाला राहिला आहात घरात ? "

" अजून उन्हाळ्याची सुट्टी आहे. शाळा भरायला एक आठवडा आहे. तंवर काहीं जमलं तर—"

" मग–जमल नाहीं का अजून ? तालमींत जाता रोज–तिथल्या पैलवानानी पट्टी करून वर्गणी जमवली नाहीं का ? "

" ते कसली पट्टी जमविणार ?– गरीब आहेत सारे. "

" अन् तुम्ही काय असे कुबेराचे बाप लागून राहिलाय ? शिकायला जायचं म्हणजे काय तोंडाच्या गप्पा आहेत ? "

" अं...अं...

" आला का अं अं ? शिकायला जाता ना ? जा. तुम्हांला कुणीं बांधून घातलं नाहीं. दाही दिशा मोकळ्या आहेत ! "

रखमाबाईला आतां राहवेना. नेहमींची मर्यादा सोडून ती रघूदेखत कृष्णंभटजींना म्हणाली " एवढयाशा पोराला असं थोरामोठयासारखं लावून

कशाला बोलायचं ? त्याला वाटायचच, आपल्या बरोबरीचीं मुलं शिकायला चालली तर आपणही जावं. त्यांतून त्याचा नंबर असतो वर्गात नेहमी पहिला. त्यानं मागं रहायचं आणि बाकीच्यांनीं पुढं जायचं म्हणजे त्याला वाईट वाटायचंच. त्याची समजूत काढायची तें आपणच आपल्या पोराला असं बोलल्यावर—"

" या गावंढ्या गांवांत पहिला नंबर मिळवला म्हणून काय झालं ? बाहेर टिकायला पाहिजे ना ? फुकटच्या नाहींत या गोष्टी – "

" पण बाहेर जायला मिळाल्याशिवाय तें कसं कळणार ? अन् आई, नुसतीं काहीं ब्राह्मणाचीं अन् पाटलाचीं मुलंच जात नाहींत तो गणपा चाभाराचा तायासुद्धा पास झाला तर शाहू बोर्डिंगांत शिकायला जाणार आहे. त्याला म्हणे फुकट शिकवतात तिथं. "

" मग तुम्हीसुद्धां आमच्या पोटीं यायच्या ऐवजीं कुणा कृष्णा चांभाराच्या पोटीं जन्म घ्यायचा होतात ...नाहीं तर आतां दत्तक जा. "

" त्याला काय हें बोलायचं ? आपलं ऐकलं तें त्यानं सांगितल. "

" तेवढंच बरं नेमकं ऐकायला आल ? त्या तालमींत चालले असतील एकेक बेत. घरांत तोंड मुस्कट मारल्यासारखं करायचं अन् बाहेर मार राजेश्वराच्या गुलुगुल गोष्टी चालायच्या. कलीच शिरलाय घरांत— "

" मग त्यानं काय करायच तें तरी एकदां सांगून टाकावं ? "

" माझ्या शिस्तीन चालायचं असलं तर बघतों कांहीं योग जुळतोय का तें. पण याना स्वतःचे गुण उधळायचे असतील तर मात्र या घरांत पाणी घ्यायला मिळायच नाहीं. एक पोरगा स्वर्गवासी झाला म्हणून अंघोळ करून मोकळा होईन. आहे का तयारी ? "

" पण कशाची तयारी ? "

" दुसरी कशाची ?–चिरंजीवांना शिकायला जायचं आहे ना ? तुम्हांलाही भटाची बायको म्हणून घ्यायचा कंटाळा आलाय–अंमलदाराची आई म्हणून मिरवायला पाहिजे. करतां काय ?–सारी लाज, अभिमान गुंडाळून ठेवणं आलं. आमच्या बापजाद्यांनीं कधीं म्हणून यजमानाकडं तोंड पसरलं नव्हतं, पण चिरंजीवांच्या पायांत तें करणं भाग पडलं. "

" कुणाकडे पैसे-बिसे मागितले काय ? आज शेटजींच्याकडे जायचं झालं होतं वाटतं ! म्हणूनच वेळ लागला ?—पण झाले ना कबूल ? "

" शेटजींकडं ? कशाला—कर्ज मागायला ?—या कृष्णंभटानं जन्मांत पैच कर्ज काढलं नाहीं. लग्ना-मुंजींतले पंचे नेसून दिवस काढले पण अडक्याची उधारी नावावर चढूं दिली नाही. मान तोडली तरी कुणाच्या ऋणांत पडणार नाही. अन् असं ऋण काढून कधीं शिक्षण झालंय ? उचलून दरमहा पंचवीस रुपये द्यायला कुणी हरीचे लाल या गांवांत नाहींत अन् असले तरी त्यांची अजीजी करणारा हा कृष्णंभट नाही. "

" पण मग—मग करायचं तरी काय झालंय ? "

" जें आजपर्यंत केलं नाहीं तें. सारी हयातभर बिजिकच्या डावात बरोबरीचे जोडीदार म्हणून खेळलों मांडीला मांडी लावून—यजमानकृत्याची वेळ सोडून एरवीं मागणं मागितलं नाहीं. पण आज त्या अप्पा इनामदाराच्या पुढ दांत वेंगाडणं आलं. त्यांना शब्द टाकलाय— "

" पण ते काय करणार ? "

" मझं पुरतं ऐकून तर घ्याल. त्यांचा बापू गेलीं दोन सालं एकटा राहिला होता. त्याला यंदा शिवपुरात ठेवायचा विचार आहे अप्पाचा— "

" अग बाई, आणि तें कां ?—इतक्या लांब एवढस पोर— "

" हीं एवढींशीं पोरंच डोक्यावर बसून मिरे वाटतात काय झालं एक देव जाणे की तो बापू जाणे. कुणीं म्हणतात, त्याला हाटेलात खायचे, अच्यावच्या हिंडायचे नाद लागले, अभ्यास करीनासा झाला. कुणी म्हणतात आणखीन् कांहीं—— "

" लोकांच्या तोंडाला कुणी हात लावायचा. पण इनामदार स्वतः——"

" ते काय खरं असलं तरी गांवांत आपल्या तोंडानं कबूल करणार आहेत थोडेच. ते म्हणतात मुलाला खानावळीचं अन्न मानवत नाहीं, त्याच्या शाळेत शिक्षणही यथातथाच आहे. एकूण काय त्याचा बेत चाललाय यंदा बापूला तिथं ठेवायचा नाही. अन् एकटाही ठेवायचा नाहीं. त्यांचा विचार आहे आत्याबाईनीं शिवपुरला बिऱ्हाड करून रहावं बापूच्या शिक्षणासाठीं. तेव्हां त्यांना शब्द टाकलाय. हे आमचे चिरंजीव—रध्या तिथं राहून सगळा बाजारहाट बघील. आत्याबाईच्या देवाधर्माला उपयोगी पडेल. तिथं त्याला

जेवायला घाला अन् मग यांना काय शिकायचं तें शिकून दिवे लावूं द्यात. फीची नादारी मात्र अभ्यास नीट करून मिळवली पाहिजे. काय समजलं ? कुणाच्या पुढें नाहीं ती अप्पा इनामदारांच्या पुढं भीक मागितली. या उपर असेल तुमच्या नशिबात तसं— ”

“ पण हें तरी नक्की झालंय ना ? का अजून त्यात काहीं पण आहे ?

“ माझ्याकडून मीं शब्द टाकलाय. अन् चार माणसांत तरी अप्पानीं हो–ला–हो म्हटलंय. तसे ते शब्दाचे धड आहेत–पण कुणीं सागाव ? अजून त्यांच्या घरांतच हाणामारी चालली आहे— ”

“ हें आणखीन् कसलं नसत विघ्न— ? ”

“ बापूच्या मनात बिऱ्हाड करायचं नाहीं. अन् शाळा तर मुळींच बदलायची नाहीं. अप्पांना तिचं नांव नकोय् एक तर चिरंजिवानीं आधीं गुण उधळलेत. एखाद्या हाटेलवाल्याचं नाहींतर पानपट्टीवाल्याच देणंसुद्धा असेल. अन् दुसर म्हणजे आपल्याच तालुक्याच्या गावांत रोज गावच्या माणसांची वर्दळ हरघडीला चारदोन माणस उतरायला यायचीं इनामदाराचं घर म्हणून हक्कानं. घराची खानावळ व्हायची. अन् खर्चाला तरी कोण पुरवठी पडणार ? ”

“ इश्श ! त्यांत काय एवढं–इनामदारांच्या घरचा हत्ती तो— ”

“ तोच पोसणं कठीण आहे. इथ खेड्यात राहून शहरच्या खर्चाची काय कल्पना येणार आहे ? जीव फेसाटीला येईल. अप्पा करताहेत तेंच टीक; पण–पण त्यांच्यांत तिसरीच भानगड उमटली— ”

“ ती आणखी कसली ? एकदां मालकांनीं टरवल्यावर— ”

“ मालकाला कोण ठरवून देईल तर ना ! जसे आमचे चिरजीव तसेच ते. बापूची बहीण कमळी यंदा पांचवी पास झाली ना ? ती हट्ट धरून बसली आहे–बापू नापास झाला तरी त्याला शिकायला ठेवताय–मी पास झालें. मी पण शिकणार म्हणून—”

“ नाहीं तरी ती पोरगीच हुशार आहे बापूपेक्षां— ”

“ हुषार असून काय करायचं ?–पोरगी आहे ना ? ही पोरगी शिकायला रहायची म्हणजे कठीणच झालं ! त्यांतून लहान तरी आहे ? बारावं चालूं आहे–नहाण येईल वर्षभरांत–अशा पोरीला बाहेर मांवीं ठेवायची—”

" पण आत्याबाई जाताहेत ना ? घरच केल्यावर बाहेर गांवचं काय आलंय ? त्यांतून आतां होताहेत कुठं लवकर पोरींचीं लग्न ! कायदासुद्धां झालाय् ना—मग करायचं काय दोन वर्षं घरांत राहून ? "

" वा ! वा ! तुम्ही तर मोठ्या सुधारकच व्हायला लागलात ! दोन वर्षांत घरीं आईच्या हाताखालीं कराय—सवरायला शिकेल. बुकं शिकून काय नवऱ्याला त्याचीं पानं वाढायचीं आहेत ताटांत ? "

" ती कशाला पानं वाढील ? इथं नाहीं का घरांत ब्राह्मण ? तिला सासरही मिळायचं असंच थोरामोठ्यांचं. ताटावरनं पाटावर अन् पाटावरनं ताटावर "

" म्हणून काय कुळाचार सोडायचा ? इनामदाराच्या बायकांना कधीं रांगोळींतसुद्धा ' श्री ' काढायला आली नाहीं. आता काळ बदलला म्हणून झाल्या पाच इयत्ता गावातल्या गावात तेवढ्या पुरे ! "

" पण तें आपल्याला काय करायचंय ? त्यांचं ते कांही कां ठरवीनात् ! आपल्या रघूची सोय झाल्याशी आपल्याला कारण—— "

" त्यातच तर सारं अडलंय ना ! आत्याबाई म्हणतात पोरीचं शिक्षण पुरें. बापू म्हणतोय तिला न्यायचं नाहीं. अप्पा पेंचांत पडलेत—त्यानं सारा बेतच फिसकटायचा—— "

" पण मग पेंच उरलाय कसला ? "

" कमळीची आई म्हणते एवढी मोठी पोरगी इथं खेड्यात रहायला नको. रस्त्यान जातां-येतां वाटेंतलीं वात्रट पोरं काय हवं तें बोलतात. त्यापेक्षा शहरात जाऊन शिकली लग्न होस्तवर तर तेवढच बरं, शिकलेली म्हणून घरही बरं मिळेल. अन् इथं ब्राह्मण आहे त्यापेक्षा तिथं आत्याबाईच्या हाताखालींच काहीं करायसवरायला शिकली तर शिकेल—"

" म्हणजे अजून कांहींच पक्कं नाहीं. सगळ दुसऱ्यांच्या हातांत—शंकराची मर्जी. एवढं कसतरी जमून रघूच्या मनासारख झालं म्हणजे बरं. "

" त्याचं होईल काहींतरी. पण तुमच्या चिरंजीवांना हें पटवून द्या; नाहींतर सगळं सोडून आम्ही ठरवायचं आणि आयत्या वेळेला या बादशहाची मर्जी फिरायची—आपल्याला इनामदारांच्या इथं रहायचंच नाहीं म्हणून—"

रघू हें सारं नुसतं ऐकत होता. दोन दिवसांनीं त्याच्या परीक्षेचा निकाल लागला अन् त्याच्यानंतर एक-दोन दिवसांत इनामदारांचं बिऱ्हाड शिवपुरला व्हायचं नक्की झालं. तेव्हापासून रघूनं बाजूला सारलेला विचार त्याच्या डोक्यात घर करून राहिला. त्याच डोकं सुन्न झालं अन् त्या भरांत तो ऐन उन्हाचा घरातून बाहेर पडून कॅनॉलच्या वाटेला लागला. शिकायला जायला मिळणार याचा आनंद मानावा की इनामदारांच्या घरांत राहायला लागणार याची खत करावी हें त्याचं त्यालाच कळेना कृष्णंभटांनी काढलेली शंका अगदी बरोबर होती. शिकायला जायचा बेत रघू करीत होता तेव्हा इनामदार त्याच्या खिसगणतींत नव्हते. पण आतां इनामदाराचं घर आणि रघूचं शिक्षण यांचं जणू कांही लग्न लागल्यासारखं झाल होतं आणि तेंच त्याला जाचीत होतं. त्याच्या बालवयात त्याला या विचारान असह्य वेदना होत होत्या. आतला ताप सहन करण्याची ताकद यावी म्हणूनच कीं काय तो उन्हांत भटकत होता.

× × ×

रघूची मुंज त्याच्या सातव्या वर्षी इनामदाराच्या बापूबरोबर झाली. मुंज म्हणजे काय हें पुरतं कळायचंसुद्धा त्याचं वय नव्हतं. त्या वेळीं आपली मुंज इतर मुलांच्यापेक्षा लवकर होतेय याचीच त्याला गंमत आणि अभिमान वाटला. त्याच्या आधीसुद्धा गांवांतले सारे लोक कोणत्या ना कोणत्या प्रसंगीं आपल्या वडलांच्या पायां पडतात, त्याना दक्षिणा देतात, आईला फुकट खण मिळतात, आपल्याला वाणाचं खारीक-खोबरं भरपूर मिळतं याचा आनंद व्हायचा. 'आम्ही ब्राह्मण आहोंत' हें सांगतांना त्याच्या सावळया चेहऱ्यावर तकतकी चढायची मीसुद्धा आतां दादांच्यासारखा ब्राह्मण जेवायला जाणार, लोक माझ्याही पाया पडतील—यांत कांहींतरी मान आहे, मोठेपणा आहे या कल्पनेनं तो खुषींत असायचा.

—पण इनामदारांच्या इथं मुंजीची तयारी सुरू झाली तेव्हां त्याच्या या मानाच्या आणि मोठेपणाच्या कल्पनेला पहिला धक्का बसला. गव्हले करायसाठीं रखमाबाईला बोलवायला म्हणून इनामदाराचा भाग्या गडी सकाळच्या प्रहरीं आला, तो मुळीं असं सांगतच आला कीं, "आत्याबाय म्हंगाल्या, आता

तुमाकडची मुंज बी आमच्या इतंच हुयाची हाय तर रघूला घिऊन येरवाळीच या. भटजींचा आज उपासच हाय जनू." रघूला त्या निरोपांत कांहीं विशेष वाटलं नाहीं. पण श्राद्धपक्षांच्या आमंत्रणाशिवाय एरवीं नुसतं फुकटांत जेवायला जाणं रखमाबाईला पसंत नसायचं. अन् त्यांतून रघूला बरोबर न्यावसं तर तिला वाटत नव्हतं. पण तुळशीला पाणी घालून रघूचा भात चुलीवर ठेवायच्या आत दुसरं बेलावणं आलं, तेव्हां खट्टू होऊन तिला रघूला घेऊन इनामदाराकडं जावंच लागलं. तिथल्या त्या रगाड्यांत मुलाचीं पहिलीं जेवण व्हायला बारा वाजले. मधें एकदां 'भूक' म्हणून रघूनं आईकडं पाहिलं. तेव्हा आत्याबाईनीं तोंडदेखलं "झालंच हं पिठलं भात रघू" म्हणून म्हटलं आणि चार पावलं जाऊन हवेंत मोठ्यानं सरबत्ती केली. "मेली भटांची जात सदा अन्नाला हावरलेली. त्यातून दुसऱ्याच्या घरीं असलं कीं जास्तीच. अगदीं उष्टावणाच्या दिवसापासून शिकवून ठेवतात जसे कांहीं—"

रघूला भूक आवरली नाही म्हणून बारा वाजता तो पोटभर जेवला. पण त्याला त्या भाताची चव विचित्र लागली रखमाबाईनं एकदा पदरानं नाकाचा शेंडा साफ करायचं निमित्त करून डोळे पुसले. पण त्या दिवशीं आपला उपास असल्याचं सागून तिनं अन्नाला हात लावला नाहीं. तेवढ्यावरच तें निभावलं असतं तर कदाचित् रघूच्या मनांत कांहीं राहिलं नसतं. पण गव्हल्याला बसल्यावर गावातल्या यच्चयावत् ब्राह्मणाच्या बायकाचीं तोंडं हातापेक्षाही अधिक झटझट चालू लागलीं, अन् त्याना पहिल्यादा कुठला विषय मिळाला असला तर तो रघूच्या मुंजीचा आणि रखमाबाईच्या सोंवळ्याचा —"

"रखमाबाईचं आपलं बर. कार्यात कार्य. खर्च नको काहीं करायसवरायला नको. अन् रघूला सातव तर आहे. पण आतांपास्नं आपली दक्षणा चालू—हो म्हणजे श्राद्धापक्षाला बाहेरचा दुसरा भट बोलवून वाटणी पडायला नको. आपलं उत्पन्न दुप्पट झाल" आत्याबाईनीं सुरुवात केली.

"त्याच काय ? भटजींनीं माया कमी का केली असेल ? रखमाबाईनीं थाटात मुंजीचा बार उडवून दिला असता. पण आमच्या इथं सागायचं झालं कीं आत्याबाई, तुमच्या घरनंच मुंजीचं विचारायचं झालं. इनामदारानीं नुसती आपल्यापुरती मुंज करून कसं चालेल ? म्हणून रघूची मुंज करून द्यायचं ठरवलं वाटतं. आणिक काय ती सातव्या वर्षापावतर लाभायची न

लाभायची पहायचं नसतं ना ? " गांवच्या मास्तरीणबाईनं पुस्ती जोडली.

" मला कांहीं त्यातलं ठाऊक नाहीं. पुरुष मंडळी बाहेरच्या बाहेर सगळं ठरवतात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणं करायचं एवढ आपलं काम– " रखमाबाईनं विषय बद करायसाठीं म्हणून, पण खरं तेंच सांगितलं.

" बाकी तसं बघितलं तर रखमाबाईचा रघू म्हणजे आमच्या वसताच्या बरोबरीचा. आमचा बेत होता वसंताबरोबर त्याची मुंज लावून द्यायचा. पण आतां आत्याबाईच्या वाड्यातनं उटावणी झाल्यावर आमचा काय पाड लागणार–त्यांतून आमच्या वसंताची मुंज काही आणखी दोन वर्षं तरी व्हायची नाहीं म्हणा. " मास्तरीणबाईनं विषय चालू ठेवायचा अन् त्यातल्या त्यात आपला मोठेपणा सांगून घ्यायचा बेत साधला.

" तुमचा बेत आम्हांला कळला असता तर आम्ही नसतों हो तुमच्या आड आलों. आम्हांला काय शेजारच्या वाडीतल्या जोशांचीं दोन मुलं होतींच की–त्यांतल्या एकाची मुंज लावून दिली असती. बाकी आता तरी काय– तुम्हांला जोशांचं घर आहेच म्हणायच. आमचं काय ?–आधी आपल्या उपाध्याचं पहायचं असा रिवाजच आहे. म्हणून अप्पाच्याकडून विषय काढला. भटजीहि हो म्हणाले अन् आपली बसल्या बैठकीला मुंज ठरली— "

" बाकी तुमच्या इथला उकाडाच मोठा आत्याबाई. त्यात आमच्या कासंडीचा काय पाड लागणार ! आता काय मुंजीला बापूच्या मावशी येणार असतील ना हैद्राबादकडच्या ! त्यांचा आपला सगळाच्श सगळा मोगलाई खाक्या— "

" अहो पहिलं कार्य हें अप्पाच्या हातचं. येणार सगळीं–यायला हवीतच. त्यासाठीं सगळं त्यांच्या बरोबरीनं करायला लागतंय अप्पाना. नुसती पाचशें रुपयांची बनात घेतली गड्याचा अन् पट्टेवाल्याचा पोषाक करायसाठीं. मावशीच्या इथन पट्टेवाले येणार–त्यांच्या पुढं आमच्या गडीमाणसाचं तरी उण दिसून कस चालेल ? "

" हो तर काय ! अहो तुमच्या इथलं कार्य म्हटलं तरी खरं म्हणजे साऱ्या गांवाचंच कार्य हें आत्याबाई. हैद्राबादकरांच्यापुढं आपल्या गावच्या इनामदारांचं कांहीं उणं दिसतां कामा नये. आपल्या आपल्यांत अंमल तेव्हांच वेगळं, पण बाहेरचे पाहुणे म्हटले कीं गावाचं नाव राहिलं पाहिजे. बरं का रखमाबाई ! "

मास्तरीणबाई रखमाबाईकडे पहात आपल्या लुगड्याचा पोत न्याहाळूं लागली.

रघूला मोठ्या बायकांचं हें बोलणं कांहीं फारसं कळलं नाहीं. पण त्या साऱ्यात आपल्या मुंजीचं नांव नुसतं निघायचं म्हणून निघालं, बाकी सगळं बोलणं इनामदाराच्यापुरतं एवढं जाणवलं. पुनः एकदां आपल्या आईचं नांव निघाल्यावर त्याला बरं वाटलं. तेवढ्यात आत्याबाईंची गर्जना सुरू झाली.

" आता तूंच विषय काढलास एकदा म्हणून बरं झालं. नाहीं तर मला आपलं अशुद्ध न् अवघड होऊन बसलं होतं. पण आतां आलीच वेळ तर आपलं सांगून टाकतें. रखमाबाई, तू आमच्या या वहिनींच्या बरोबरीन वावरणार साऱ्या मुंजीत देवका—मात्राभोजनाच्या वेळेला. तेव्हा हा पुरुषी मुकटा नको नेसूस बाई. मावशीची मंडळी हंसतील. आतां मुंजीचा खर्च वांचलायच एवीतेवी. तेवढा एक बायकाचा अंगभर मुकटा घ्यायला सांग नवऱ्याला. "

रखमाबाई या माऱ्यानं चूर झाली होती. बाकीच्या बायका आत्याबाईंच्या बोलण्याला साथ करीत आपापल्या परीनं उघड किंवा पदरात तोंड लपवून हंसत होत्या. आत्याबाईंना साथ करणं हा सगळ्या बायकांचा धर्म होता. कारण आत्याबाईंचं बोलणं म्हणजे ' हायकोर्टा 'चा निकाल होता. त्याच्यावर 'अपील' नव्हतं. रघूला मात्र त्या बोलण्यानं अन् तोंड लपवून हसण्यानं गुदमरून टाकलं. मुंजीबद्दल कांहीं तरी चमत्कारिक वाटू लागलं.

× × ×

रघूपेक्षा इनामदाराचा बापू चांगला तीन वर्षांनीं मोठा होता. त्यामुळं खरं म्हणजे त्याचे आणि बापूचे सवगडी वेगवेगळे असायचे. त्यांचीं घरंसुद्धा निरनिराळ्या आळयात होतीं. पण अगदीं लहानपणापासून इनामदारांच्या इथल्या बिजिकच्या अड्डयात कृष्णंभटाबरोबर जायची संवय झाली म्हणून असो कीं वर्षअखेरीं बापूचीं पुस्तकं रघूला मिळूं लागलीं म्हणून असो, तिथं त्याची बापूबरोबर जोडी ठरून गेली. बापूला ही गोष्ट कधींच फारशी आवडली नव्हती. पण अप्पांच्या कचेरींत मांडीला मांडी लावून बसणाऱ्या गुरुजींच्या मुलाला तो उघड-उघड डाफरूं शकत नव्हता. सुरुवातीच्या त्याच्या युक्त्या वेगळ्या असत. शनवार रविवारीं दुपारच्या वेळेला वडिलांनीं बाद म्हणून टाकलेल्या इस्पिटांच्या जोड्यांतून निवडून बावन पानीं डावाचा बरासा जोड तयार करून त्याच्या जोरावर मुलांचा पत्त्यांचा अड्डा इनामदारांच्या वाड्या-

शेजारच्या विठोबाच्या देवळात पडायचा. त्या डावात रघूला सामावून घेताना बापूनं अन् त्याच्या बरोबरीच्यानी त्याला घायकुतीला आणायचं. एक दिवस असाच डाव पडला असताना रघूला कुणाच्या बाजूला घ्यायचा याचा वाद सुरू झाला. मास्तराचा बंडू म्हणाला, " बापू, तुझ्यामुळ हा चिमुरडा रघ्या आपल्या डावात लुडबुडतो. त्याला हवं तर तुझ्या बाजूला घे. आमच्याकडं नकोच. "

" तर तर ! माझ्या बरोबर येतो म्हणे ! मी काय त्याला कडेवरनं घेऊन येतोंय् थोडाच ? मी का म्हणून घेईन त्याला ? म्हणजे आम्ही आपलं सारख दळत बसावं. तें काहीं नाही. आपण गुलाम टाकून गड्डी ठरवायचे—" बापू उसळून म्हणाला.

" मला येतंय् लाडीस – बघा तर खरं " रघूनं सांगायचा प्रयत्न केला.

" हो हो ! तू मोठा शहाणाच लागून राहिलायस कीं नाहीं ?—शाळे-तल्या पहिल्या नंबराची ऐट इथं खेळताना नाही चालायची बचंमजी—इथं आम्ही सांगू तसं खेळायच असल तर—"

" तुम्ही खोटं खेळता म्हणून होय ? – बरं कारे बंडू –बापूला एक्क्या–राजाच्या खुणा ठाऊक आहेत म्हणून त्याचा हुकूम सर होतो "

" रघ्या, बदडून काढीन बघ. तुला काय करायचंय ? चोमडा कुठला ! "

" बाप्या, आम्हाला असं फसवतोस होय—थांब लेका "

" बोलायचं कारण नाहीं. पत्ते माझे आहेत. खेळायचं असलं तर मुकाट्यानं खेळा– "

" तर तर—तुझ्या घरात डाव ठेवतात म्हणून पत्ते तुझे झाले वाटतं—बिजिकचे सारे डाव पट्टी करून आणलेले असतात. आमचे काका पण पट्टी देतात— "

" मग आणा जावा कीं डाव आपाल्या काकाच्याकडन—कधीं आणला नाहींत तो आजपर्यंत ? "

बापू—बंडूची अशी जुंपलेली बघून रघू घाबरला. त्याला वाटलं आपण बापूची युक्ति सांगितली म्हणून असं झालं; तर बंडूचीहि युक्ति फोडावी म्हणजे फिटंफाट होऊन भांडण मिटेल अन् त्यानं तोंड उघडलं.

" बरं का बापू, तुला एक्क्या-राजाच्या खुणा ठाऊक आहेत तशी या बंडूची पण एक गमत आहे–तो कनी पान चोरून हुकूम मारतो अन् डाव सर करतो— "

" रघ्या लेका तुझी बाजू घेतली तर माझ्यावरच उलटलास होय ? कधीं रे लेका, पान चोरून हुकूम मारला मीं ? खोट बोलतोस. थांब घर–आतां गुरुजीनाच सागतों. " बडू उसळून म्हणाला.

" तो तसलाच आहे रे बंड्या. लेकाचा गुडघ्याएवढा नाहीं तरी आमच्यात खेळायला पाहिजे अन् वर आपल्या आपल्यांतच भांडण लावून द्यायला बघतोय. ह्याला आपल्यातन हुसकून द्यायला हवंय– " बापू–बंडूची एकी होऊन ते दोघेहि त्याच्यावर उसळले.

रघूची पंचाईत झाली. तेवढ्यांत रामनं एक शक्कल काढली. तो बापूच्या कानाला लागला. अन् मग बापू मोठेपणाचा आव आणून म्हणाला, " जाऊं दे रे–लहान आहे अजून त्याला डावातली गंमत कळत नाहीं. पण रघ्यानं कुणाच्या बाजून खेळायचं याच भांडण नकोच मुळीं. आपण आज सगळेजण गाढवान खेळू या. " अन् असं म्हणता म्हणतां त्यानं बंडूला डोळा घातला. रघू आता आपल्याला खेळायला मिळणार या खुषीत होता. त्याचं लक्ष या डोळाडोळीकडे नव्हत. पानं वाटून झालीं. तेव्हां नेमके एक्के–राजे रघूच्या पानात येऊन बसले. अन् डाव सपायच्या वेळेला रघू वीस पानीं गाढव झाला. पुढच्या आरडा-ओरडीनं अन हुलडीनं काहींतरी भानगड झाली एवढ रघूच्या ध्यानात आलं. तो म्हणाला, " तुम्हीं कट करून मला जाडीं पानं दिली. आता मी पिचतों–मग बघूं या. " दुसऱ्या डावांतल्या पहिल्या चार उताऱ्यात रघूच्या हातांतलीं पानं कमी झालीं. पण नंतर पुनः एकदां बाकीच्या साऱ्याकडे एकेका रंगाची कटापी निघाली; अन् रघू चांगला बत्तीस पानीं गाढव व्हायचा रंग दिसूं लागला. तेवढ्यात त्याच्या लक्षांत आलं अन् तो ओरडला, " पानं चोरून झक्कू देताय–रडीचा डाव खेळताय " अन् त्यान पानं फेंकून दिलीं. तसे सारेच त्याच्यावर उलटले आणि त्याला ' रडूबाई ' म्हणून खरोखर रडेपर्यंत चिडवून निघून गेले.

—असले प्रसंग वरचेवर यायचे. रघूची स्थिति विचित्र झाली होती. त्यानं एक–दोनदां बापू-बंडूची संगत सोडायचा प्रयत्न केला.. पण गांवांतली

सारी ब्राह्मणांचीं मुलं होतीं या दोघांच्या गट्टींत—बापूच्या इनामदारीमुळं त्याच्याकडं मोहोळ जमायचं, तर बंडूचे वडील मास्तर, त्याला दुखवून उपयोगी नाहीं म्हणून त्याला धरून रहायचं; या वृत्तीनं त्यांच्याभोवतीं गराडा पडलेला असायचा. त्यांना सोडून जायचं म्हणजे मराठ्यांच्या मुलांत वावरायला हवं. एक तर हीं मुलं सुट्टीच्या दिवशीं हमखास बाजाराला किंवा रानांत जायचीं अन् कधीं त्यांचा डाव पडलाच गावांत तर त्यांत [illegible] मोठे ब्राप्य असायचे. त्यांच्यात डाळ शिजणं कठीणच. तरीसुद्धा रघून त्यांच्यात दोन-चारदा मिसळायचा प्रयत्न केला अन् "असूं द्ये-आलाया बामन तर येऊ द्ये." म्हणून त्यांनींहि रघूला आपल्यांत येऊं दिला पण नेमकी त्याच खेपेला ती गोष्ट कृष्णभटजींच्या कानावर गेली. बापू–बंडूला रघूची अडचण होत असली तरी त्यानं दुसरीकडे रमावं हें त्यांना बरं वाटलं नाहीं. अन् तोंडीं लावण्याला रघ्या नसला तर आपसांत भांडणं होतात हें त्यांना जड वाटलं. म्हणून रघ्या वाटेल त्या पोरांत मिसळल्याची गुणगुण भटजीच्या कानावर घालण्यांत आली अन् या शिवाशिवीबद्दल शिक्षा म्हणून भटजींनीं रघूला दिवस मावळल्यावर नदी-वरनं ओलेत्यानं यायला लावून वर घरांत आल्यावर यथास्थित प्रसाद दिला.

त्यानंतरच्या एका वर्षी रघूला एक नवीन युक्ति सांपडली. चातुर्मासांत गावांत कुणा कोरगांवकरबुवांचीं कीर्तनं सुरू झालीं. संध्याकाळीं शाळा सुटली कीं थेट रामाच्या देवळांत कीर्तनाला जाऊन बसायला रघून सुरूवात केली. रघूच तोंडीलावणं सुटल्यापासून बापू-बंडूला चुकल्या-चुकल्यासारखं व्हायला लागलं होतं. म्हणून त्यांनीं पहिल्यांदा थोडीशी थट्टा करून पाहिली. आजोबा-सारखं कीर्तनाला जाऊन बसणं अन् तेंहि जेव्हांकईचा—पत्त्याचा डाव सोडून ह्या आचरटपणाबद्दल ते दोघं चिडवत होते. नंतर रघूला त्या चिडवण्याचं कांहींच वाटलं नाहीं. पण हें आपल्यापेक्षां चिमुरडं कार्टं बधत नाहीं ह्याची बापू-बंडूला खंत वाटली. चीड आली. त्यांचीं डोकीं तल्लखपणानं काम करूं लागलीं.

—आणि त्यांना अचानक हवं होतं तें सांपडलं. इनामदारांच्या अड्ड्यांत बुवांच्या कीर्तनावर टीका व्हायला सुरुवात झाली होती. कारण हरदासी आचरटपणाच्या परिचित कोट्या आणि सुधारणेवरची खमंग टीका ही कांहीं कोरगांवकरांच्या कीर्तनांत इनामदारकंपूला मुळींच मिळत नव्हती. बुवा

बेदान्ताबद्दल बोलताना मूळ ग्रथांना धरून तेवढंच बोलत होते. इनामदाराच्या अड्ड्यानं त्याचं कारण शोधून काढलं. बुवांची न्हातीधुती मुलगी अंबू त्याच्या-बरोबर हिंडत होती. हा मूर्तिमंत अनाचार वावरत असताना बुवांना अली-कडच्या ' सुधारकी चोचल्यावर ' टीका करायला तोंड होतंच कुठे !— आणि हा शोध लावतानाच त्या अड्ड्यात अंबूच्या चारित्र्याची चर्चा झाली––ती कुणाचा तरी हात धरून नक्की पळून जाणार ! कारण अक्षरशः बारा गावचं पाणी प्यालेली पोरगी ती. अप्पा इनामदारांनीं आणि होस हो असं करणाऱ्यानीं नक्की ठरवून टाकलं. आणि त्यांतच बापू-बंडूला हवं होतं तें सांपडलं—

— खरं म्हणजे स्त्री-पुरुष संबंधाची कल्पना येण्याचसुद्धा त्यांचं वय नव्हतं. पण खेड्याच्या वातावरणात ' व्यायला ' स्तोत्रानं कान इतक्या लहानपणापासून पवित्र व्हायला लागतात, गावांतल्या ' भानगडीं ' ची चर्चा इतक्या राजरोस कानावर येते कीं बापू—बंडूना हवं तें सापडलं यात आश्चर्य वाटायचं काहीच कारण नाही. त्यांनी एके दिवशीं शाळेतच जाहीर करून टाकलं कीं, रघ्या नंबर एकचा इब्लिस-वय चोरलेला आहे. तो कीर्तनाला जातो तो कथेची गोडी वाटते किंवा खडीसाखरेचा प्रसाद मिळतो म्हणून नव्हे; तर त्याची नजर दुसरीकडे आहे. लेकाचा गुळाच्या ढेपीवर नजर ठेवून आहे मुंगळ्यासारखा.

त्या माऱ्यानं रघू हादरला. रडवेला झाला कीर्तनाला जायचं बंद करावं असं एक वेळ त्याच्या मनात आलं. पण कीर्तनाला नाहीं गेलों तर हीं दोघं जास्तच चिडवतील म्हणून तो जात राहिला. मात्र त्या घाणेरड्या बोलण्यामुळं त्याच्या मनांत एक अढी कायमची बसली. स्त्री-पुरुष संबंध हा चेष्टेचा—चिडवण्याचा विषय आहे. त्याच्यांत कांहींतरी अमंगळ आहे. या कल्पनेनं तो कुठल्याहि स्त्रीशीं बोलतांना दबकूं लागला—दुरावलेला राहूं लागला.

बापू—बंडूची ती घाणेरडी थट्टा त्याला मधून मधून डिवचूं लागली, विनाकारण खुपूं लागली. पण तिच्याबद्दल कुणाशीं––अगदीं आईपाशींसुद्धां कांहीं बोलावं असं त्याला वाटेना. थट्टा आठवली कीं त्याला थोराड बांध्याची-काळसर अंबू दिसायची-मग एकदम कसली तरी शिरशिरी यायची. डोळे

मिटायचे-आईची प्रतिमा तरंगू लागायची पण अचानक आईची प्रतिमा-सुद्धा नकोशी वाटायला लागली अशी एक त्याची विचित्र अवस्था झाली.

× × ×

रघू सहावींत गेला अन् त्याच वर्षी बापू–बड्ड सातवीच्या परीक्षेंत नापास झाले. पण नापास झाल्याबरोबर 'या व्ह. फा. त कांहीं राम नाहीं; आपल्याला कुठं मास्तर व्हायचं आहे ' असं म्हणत त्यांनीं इंग्रजी शिकायसाठीं तालुक्याच्या गावाला मुक्काम हलवला, आणि रघूच्या मागचा त्याचा भोंगा कमी झाला. त्यावेळीं कृष्णंभटजींनीं त्याच्यामागं दुसरा उद्योग लावला. चातुर्मासांत 'ब्राह्मण' जेवायला जाणं, तुळशीचीं लग्नं लावणं, लग्नातून अंतर्पाट धरणं, हें तो करीतच होता; पण आतां सणासुदीच्या आदल्या दिवशी रानात जाऊन दुर्वा, दर्भ, बेल आणायचं कामही भटजींनीं त्याच्यावर सोपवून टाकलें. रघूला या कामाचा तिटकारा होता असं नाही, उलट या रानांत खूप हिंडायला मिळायचं, जांभळा-बोरांच्या दिवसात मनमुराद फळं खायला मिळायचीं अन् याचा खूप आनंद व्हायचा – पण शाळा चालू असतांना असल्या पायपिटींत दोन तास खर्ची करणं त्याच्या जिवावर यायचं कारण त्याच्या अभिमानाला कसलाहि डाग न लागणारी एक वस्तु त्याच्यापाशी होती ती म्हणजे त्याचा शाळेंतला पहिला नंबर. कृष्णभटजींचीं किरकोळ कामें करून, अनेकवेळा दुपारच्या आमंत्रणाचं जेवण देशस्थी उशीरात अवेळीं उरकूनसुद्धां त्यानं शाळेंतला पहिला नंबर सोडला नव्हता. पुस्तकं नेहमींच चार–दोन कमी, इनामदारांच्या बापूनं गबाळेपणानं वापरून उरलेली, आगापिछा नसलेलीं असायचीं ! पण त्याची कदर न करता मेहनतीच्या आणि अकलेच्या भांडवलावर त्यानं आपला गाडा रेटला होता. सातवींत गेल्यावर तर त्याची मोठी त्रेधा उडाली होती. बिजिकच्या धोकाखातर मास्तरानीं मुलाचा अभ्यास करून घ्यायची सोपी युक्ति काढली होती – त्याच्याच एका मित्रान लिहिलेलीं बहुतेक सगळ्या विषयांचीं प्रश्नोत्तरें त्यांनीं क्रमिक पुस्तकांपेक्षा अधिक महत्वाचीं करून ठेवलीं होतीं ! अन् परीक्षेंत नापास झाल्याच्या तिरिमिरींत बापूनं नेमकीं तेवढीच पुस्तक जाळून टाकलीं होतीं. आणि त्या पुस्तकांत नसलेले उत्तर मास्तरांना नुसत्या काना-मात्रेच्या फरकानंदेखील चालत नव्हतं. रघूची पंचाईत झाली. तेव्हां त्यानं शाळेंतल्या एका मुलाचं पुस्तक मागून

आणून त्याननं इतिहास–भूगोल, शास्त्राचीं सबंधच्यासबंध प्रश्नोत्तरें लिहून काढण्याचा उद्योग केला होता.

त्याच्या वयाच्या मानानं अवजड असलेल्या या मेहनतीच्या भरीला कृष्णंभटजींचीं वाढतीं कामं येऊन रघूच्या अभ्यासाला अडवण होऊं लागली. पण कोणाजवळ बोलायची सोय नव्हती. [illegible] कीर्तनानंतर त्याचं आईशीं बोलणं तुटक झालं होतं आणि आईपाशीं बोलून कांहीं उपयोग व्हायचा नाहीं हेंही कळून चुकलं होतं. रघूच्या बाबतींत आणि विशेषतः त्याच्या अभ्यासाच्या बाबतींत रखमाबाईनं चुकून एखादा शब्द उच्चारला तरी "तुम्हाला काय समजतय त्यातलं" हें भटजींचं उत्तर रघूलासुद्धा अंगवळणी पडलं होतं.

मात्र दर्भा-दुर्वांच्यासाठीं रानं तुडवताना रघूला एक मोकळीक आपो-आप मिळाली. अडीअडचणींच्या जागेतन आपल्याला हव तें साहित्य जमवताना रघूला अनेकदा पंचाईत व्हायची; पण त्यावेळीं जवळपास असलेल्या गुराख्याच्या किंवा शेतकऱ्याच्या मुलात मिसळून त्याच्या मदतीनं आपलं काम करून घेताना रघूला 'का रे' म्हणणार कुणी नव्हतं. रघूला असं कांहीं हवंसं झालं कीं त्यानं जवळ दिसेल त्याला हाक मारायची अन् रघूच्या बरोबरीच्या किंवा त्याच्यापेक्षा चार सहा वर्षांनीं मोठ्या असलेल्या मुलानीं 'देवाच्या कामात' 'बामनाच्या पोरा'ला हौसेनें मदत करायची. त्या मदतीनं म्हणा, कीं त्यांच्या कौशल्यानं म्हणा, रघू अशा मदतनीसाकडे मनोमन खेंचला जायचा. त्यातल्या त्यात रंग्या जाधवाचं अन् रघूचं सूत खूप जमायचं.

असाच एकदां रघू कॅनॉलजवळच्या वावराच्या बाधावर उंच असलेल्या बेलाच्या झाडाकडे पाहात उभा होता. खूप वेळ विचार करूनहि त्याला बेल काढायची युक्ति सुचेना. लहान-सहान झाडावर चढायला तो कचरत नव्हता. पण हें झाड होतं खूप उंच आणि अगदीं बारीक. रघू इकडे तिकडे पाहूं लागला. अन् त्याला हेरून दूरवरनं रंग्या धावतच आला— "काय बामना, बेल पायजे व्हय – मग असा का बावरलास – चढ कीं वर—" "भीति वाटते रे" असं रघूनं म्हणतांच "हत् ल्येका! बामन त्यो बामन – नुसती तूंप-रोटी खा." म्हणत रंग्या भरसर झाडावर चढला देखील. 'अरे हळूं – बेतानं –

पडशीलबिडशील—' असं रघूच्या तोंडात आलं, पण रंग्याच्या तें गावीही नव्हतं. वरनं सप्सप् बेलाच्या बारक्या डहाळ्याच टाकायला त्यानं सुरुवात केली. "पुरे-पुरे" म्हणून रघू कटाळला – पण रंग्यानं चागला हलकासा भाराच खालीं साठेपर्यंत आपलं काम चालू ठेवलं. खालीं उतरल्यावर रघूनं रंग्याला बसवून घेतल—

"का र – फुरं नाय का झाला ?"

"पुरे की – त्याचा काय भारा बांधायचा आहे—"

"मग – आता जाऊं द्ये कीं मसराकडे—"

"बस – जाशील आता. रंग्या—"

"अरं बोल कीं मर्दा – लाजतुयास का बायकुवानी—"

"रंग्या, एवढा सरसर झाडावर चढलास, तुला भीति नाहीं कारे वाटली ?"

"छल ! मी काय तुझ्यावानी बामन है व्हय असा भ्याला—"

"तर तर–ब्राह्मण नसलास म्हणून काय पडलास तर तुला लागायचं नाहीं ?"

"तूं असाच भ्याचास बामना – झाडावरन पडलं तर लागल म्हून झाडावर चढायचाच न्हाइस – आर, चार-दोन डाव पडल्याबिगर झाडावर चढाया ईल कंदीं ?"

"अरे रंग्या – मी काय झाडावर चढत नाही ? पण असल्या बारीक अन् अवघड झाडावर – मुद्दाम पडायलाच चढायंच – एखादी फादीबिंदी मोडली तर—"

"तर काय हुईल ? जरा वाईच खरचटलं – रगात निगल – खरचाटलं तर त्ये बरं हुतं – रगात निगाल तर पुन्याच्यानं येतं—"

"पण मुद्दाम का—?"

"अन् म्या नसतो चडलों आज, तर बामना, तुला ह्यो बेलाचा पाला गा कसा गवसला असता ? अरं – रगात निगाल तर चोकून टाकावं. जरा खरचाटलं तर पाला चोळावा – कुटंबी घावतो—"

"कोणचा पाला ? मला दाखवून तरी ठेव—"

" अर त्यो माक्याचा पाला — कुटंबी असतुया — त्येची काय आप्रुपाई हाय ? अन् न्हाय घावला त्यो तर कनूचाबी मऊसूत पाला चोळावा – तुमी बामनाचीं पोरं लईच करत। — अक्शी नाजूक नार — आमचं काय, आमी वारा पितो रानचा जलमल्यापासनं— "

रंग्या बोलायच्या रंगात आला. रघू मंत्रमुग्धासारखा ऐकत होता. खेड्यातल्या वातावरणातला मनमोकळेपणा अन् अवखळपणा आपल्यांतही आहे असं तो समजत होता. पण रंग्याच्या बोलण्यानं तो किंचित् दुखावला — अन् रंग्याचं वर्म पकडावं म्हणून त्याला म्हणाला—

" तर तर ! काय सांगतोस रंग्या — म्हणे जन्मल्यापासनं रानचा वारा पितो. जसा कांहीं रानांतच जन्माला आलास— "

" तुला खरं न्हाई वाटत बामना ? अरं मागल्या सालालाच माझी आई पाटलाच्या मळ्यांतन भिम्याला घिऊन आली की— "

" खरं सांगतोस ? तुझी आई उघड्यावर बाळंतीण झाली ? "

" तशी पार उगड्यावर न्हाई रं. भांगलाया गेली हुती पाटलाच्या मळ्यात. पोटात वाईच कळ आली. तशा शेवऱ्यांत गेली अन् भात्यान हातरून पडली. अन् साजला भिम्याला पाटीत घालून घरला आली."

रघूला ही कथा नवीन होती. तो आश्चर्यानं थक्क झाला. रंग्याचं वर्म पकडायला म्हणून तो गेला अन् स्वतःच गुरफटला. आपण ब्राह्मण म्हणजे कुणीतरी श्रेष्ठ हा त्याच्यावर जन्मापासून झालेला संस्कार त्याला स्वस्थ बसूं देईना. त्याचा खरा खोटा अभिमान डिवचला गेला. कुठं तरी रंग्यापेक्षां वरचढपणा दाखवलाच पाहिजे या हव्यासानं त्यानं आपला ठेवणीतला विषय काढला—

" तें बाकीचं कांहीं असूं दे रंग्या — पण तूं असा जन्मभर म्हशी वळतच रहाणार का ? शाळेंत कां येत नाहींस ? "

" साळंत ? — अन् ततं येऊन माज्या म्हशी कोन वळायचा ? हतं मी मसराच्या पाठींत धोपाटी घालतुया त्यो साळंत येऊनश्यान मीच मास्तराच्या धोपाट्या खावाव्यात व्हय ? वा र बामना— "

" अरे पण शाळेंत शिकलास तर तुझाच फायदा होईल— "

" कशाचा फायदा ? तू काय करतुयास ? झाडावरनं ब्येलाचा पाला काडाया न्हाई येत तुला अजून -' तू शिकला असचील गवतातला ग – पर ह्ये पठ्या बादाचं सारंच्या सारं गवात कापतो – अन् मसर जोगावतो. तूंच साग कीं योक ' ग ' मोटा का सार गवात मोट्ट ? "

ह्या अडाणी पोराची कशी समजूत घालायची तें रघूला कळेना. बाधाचं ' गवत ' गवतातला ' ग ' पेक्षा मोठं म्हणून त्यानं रघूला निदान बोलण्यात तरी हरवलं होतं. चाकोरींतून शिक्षणाचे पाट घेणाऱ्या रघूजवळ असलेल्या तेव्ह्या व्यवहारज्ञानाला उत्तर नव्हतं. तो मुकाट्यानं बेल गोळा करून उठला. जणू गुदमरून टाकणाऱ्या रंग्याच्या भिन्न सस्कृतीपासून तो दूर व्हायला लागला होता. रंग्याच्या बोलण्यात कांहीं तरी चुकतं आहे, आपल्याला तें कळत नाही, म्हणून त्याचं आकर्षण वाटतंय, पण आपण आहों त्यात काहींतरी अधिक, वेगळं, चांगलं आहे या समजुतीनं रघूला घट्ट कवटाळलं होत.

—खाण्यासवरण्याच्या, शिवाशिवीच्या वरचेवर होणाऱ्या घरच्या—दारच्या उल्लेखांनी रघूच्या मनांत स्वतःच्या वेगळेपणाविषयीं, मोठेपणाविषयीं काही कल्पना पोसल्या होत्या; संस्कार रक्तात भिनून गेले होते ते त्याला नेहमीं जाणवत, जागवीत, सागत रहात, कीं तू रंग्या जाधवापेक्षा निराळा आहेस. पण हे निराळेपण बापू-बंडूच्या सहवासात, आटवर्गात विरघळायचं. तिथ त्याचं भटपण त्याला थिटं करायचं, काळवंडायला लागायचं – आणि या दुकलींचं आणि रंग्याच वर्तन याची तुलना तर त्याला खोड्यात पाडायची—बावचळून टाकायची—

× × ×

सातवीच्या वर्गात गेल्यावर कृष्णंभटांनीं रघूच्या माग आणखी एक व्याप लावून दिला. इनामदाराच्या इथ दररोज दुपारी पूजेला जायचं. त्यात त्याचा बोलायचा हेतु होता – आता हळूं हळूं चिरंजीवांनीं एकेक गोष्टीचं ज्ञान मिळवावं आणि आपल्याला वयोमानाप्रमाणं थोडासा विसावा द्यावा. सहजीं साधणारं होतं तें म्हणजे जास्तींत जास्त दिवस रघूचं एक वेळचं जेवण बाहेर पडेल आणि आपल्याला सकाळच्या बिजिकच्या डावांतनं रोजच्या रोज मधेंच उठून यायला लागायचं नाहीं. अगदींच सणावाराची किंवा श्राद्धपक्षाची तीथ असेल तेवढ्यापुरतं बघतां येईल.

बापू नसताना इनामदाराच्या वाड्यात जायला एका अर्थी रघूला फारशी अडचण नव्हती. त्याच्याशीं कुरापत काढायला कोणी तिथं नव्हत. पण दुसरी-कडून रघूला शंका आली आणि ती खरी झालीच. रघू पूजेला म्हणून इनाम-दाराच्या घरी जाऊ लागला तरी पूजेच्या आधींच्या आणि इतर अन्याच गोष्टी त्याला कराव्या लागू लागल्या. ऐन स्वयंपाकात असताना आत्याबाईंना गोड तेल, नाहींतर खोबर, वेलदोडे संपल्याचं आढळून यायचं, आणि रघूला सोंवळ्याच्या लगोटीनिशी उघड्या अंगानं वाण्याच्या दुकानात चक्कर टाकून यायला लागायचं. अन् हें पूजेच्या आधी झालं असलं तर आत्याबाईंनी " कुठं तरी वेंधळ्यासारख बघत चिर्धाचिंधीवर पाय दिला असशील " म्हणून त्याला पुष्कळ वेळा दुसऱ्यांदा अंघोळ करायला लावायची.

आत्याबाईंच्या कामाची ही पद्धति आणि हा वरचष्मा सगळ्याच्या परि-चयाचा होता पण अप्पा इनामदाराना आपल्या बिजिकच्या डावापुढं घरांत लक्ष घालायला सवड नव्हती आणि काहीं बाबतींत आपण ' जुन्या वळणाला धरून आहोंत ' हें सागणं त्याना सोयीचं वाटायचं. त्यापैकीं एक बाबत म्हणजे होतां होइतों बायकोशीं न बोलणं ही होती. त्यामुळें सहाजिकच सर्व व्यवहार आत्याबाईंच्या मार्फत आणि त्याच्या इच्छेप्रमाणं चालायचे. रघूला त्याचीच धास्ती वाटत होती. पण अप्पाचं मत होतं, सगळा घरचा गाडा आत्याबाई चालवतात त्यामुळं आपल्याला तेवढीच मोकळीक मिळतं. त्यानुळं आपल्या अभ्यासाची सबब रघूला त्याच्याजवळ सागता येत नसे. एक वेळ त्याच्या मनात आलं कीं, बापूच्या आईला सागून पहावं. पण इनामदारीणबाईंची स्थिति त्याच्या डोळ्यापुढं होतीच. कधीं आत्याबाई स्वयंपाकघरात गुंतलेल्या असताना किंवा देवदर्शनाला बाहेर गेल्यावर इनामदारीणबाईंनीं अप्पाच्या-जवळ एखाद्या विषयाचं बोलण काढलंच तर अप्पानी म्हणावं, " काय हवं नको तें आत्याबाईंना सागा. तेवढाच त्यांना मोठेपणा. नाहींतरी त्याचं काय आहे. सारा संसार तुमचाच आहे — तरीसुद्धां एवढ्या आपुलकीनं ती कष्ट उपसते — तिला न कळता कांहीं करायचं तुम्ही का मनांत आणावं ? तिनं मनात आणलं तर सासरकडनं वीस-पंचवीस रुपयाची पोटगी घेऊन कुठंही क्षेत्राच्या ठिकाणीं ' हरि हरि ' म्हणत दिवस काढील. मग तुम्हाला तिची किंमत कळेल—"

इनामदारीणबाईंची ही अवस्था गांवातल्या पोरासोरानासुद्धा ठाऊक होती. त्यातून रघू तर अधिक — उगा नेहमीच वाड्यात वावरणारा. पूर्वीच्या हकीकती सगळ्याच्या सगळ्या त्याला ठाऊक नव्हत्या अन् त्या त्याच्या आकलनाच्याही पलीकडच्या होत्या. तरी मधून मधून त्याच्या कानी मोठ्या माणसाची बोलणी यायचीं — त्यातले मधले मधले कळतील तेवढे तुकडे संदर्भान जुळवून त्यानं पाहिले होते. बापूची आई म्हणजे मोगलाईतल्या कुणा जहागिरदाराची तिसरी की चवथी मुलगी — तिच माहेरच नाव मनू. पेशवाईत नाव कमावलेल्या इनामदाराच्या वाड्यात त्या जुन्या भाग्यान येऊन पडली. तिला कळायला लागायच्या आधीच आत्याबाई माहेरी येऊन राहिलेल्या. अप्पा इनामदाराना लहानपणींच इनामदारीचं कर्तेपण मिळाल्यामुळ आणि त्या काळीं कांही न करता घरच्या कणगी भरत असल्यामुळें त्याच्या रिकामपणची एकुलती एक कामगिरी म्हणजे इनामदाराचा वंश वाढवण. त्यामुळं बापूच्या आईची पहिल्यांदा बाजेशी जी ओळख झाली तिचा लोभ काहीं त्या बाजेला सुटेना. सोळा वर्षांत म्हणजे तिशीची झुळूक् लागते न लागते तोंच इनामदारीण बाईची दहा बाळतपण झाली होती — त्यातून वाचली बापू अन् कमळी हीं दोघंच. पण त्यामुळ इनामदारीण बाईच्या स्थितींत काही फरक पडला नव्हता. उलट मूल जितक्या लवकर जाईल तितक्या प्रमाणात पुढची खेप जवळ यायची ! अशा स्थितीत लहानपणीं रघूला बापूच्या आईची ओळख राहिली ती नेहमी बाजेवर निजते ती बाई म्हणून. त्यावेळी ती बाई म्हणजे रघूला एक भयंकर आळशी आणि निरुद्योगी बाई वाटायची. त्यात तिच्या स्थूल थलथलीत बांध्यामुळं ती दिसायचीहा फार सुखावलेली तिचं आत्याबाईंनी केलेलं वर्णन ऐकून तर रघूला हंसूं आवरेनासं झालं होत. चौथीच्या भूगोलात त्यान सिंध — काठेवाडची माहिती वाचली होती. आत्याबाईंना हा भूगोल केव्हा कळला होता कुणास ठाऊक: पण त्यानींही नेमका त्यातला शब्द वापरला होता — त्या म्हणाल्या, " छपरातल्या आपल्या गावठी म्हशी — त्यांचं वेत दोन वर्षांनीं येतं. पण घरात ही कुठली हैद्राबादी का जाफराबादी आणली आहे तिच मात्र सारं वर्सावणी. "

—त्यावेळी अशा चरचर विनोदाचा विषय झालेली बापूची आई, समज येऊं लागला तशी रघूला तिच्याबद्दल आपुलकी वाटूं लागली — आत्याबाईंच

कांहीं तरी फटकळ बोलणं ऐकण्यापेक्षां आपल्याला काय हवं तें बापूच्या आईला मागितल तर तें लवकर मिळतं, निदानीं बोलणीं खावीं लागत नाहींत हें लहान-सहान प्रसगांनीं रघूला पटवून दिलं होतं. पूजेच्या वेळी एक-दोनदा बापूच्या आईकडं तडक रघू गेला होता. पण तिनें 'बघतें' म्हटलेलं एकदा आत्याबाईच्या कानावर आलं आणि मग बिजली कडाडली. "रघ्या, घरातलं काहीं पाहिजे असलं तर मला मागायचं हें का तुला ठाऊक नाहीं? उगीच कशाला बापूच्या आईला त्रास देतोस? — जसा काहीं आज नवीनच आला आहेस वाड्यात— "

तेव्हापासून रघूच्या तोंडाला खीळ बसली. रघू आत्याबाईशीं बोलायचा प्रसंग टाळतो हें इनामदारीणबाईच्या ध्यानांत आलं होत एवढ्याशा लहान मुलाला त्रास नको म्हणून म्हणा कीं आपली सात-आठ मुलं जगली नाहीत तर मुलं जगावीत किंवा जगायची नसली तर होऊं तरी नयेत यासाटीं देवाची सेवा आपल्या हातून घडावी म्हणून म्हणा, सुरवातीला उभी होती तोपर्यंत बापूची आई पूजेची तयारी करून, गंध उगाळून ठेवायची. आत्या-बाईचं बोलणंसुद्धा खाल्लं तिनं त्या पायांत. "एवढी तयारी कशाला करून द्यायला हवी त्याला. भटाचं पोरगं बोलून चालून पूजा करायला बोलावलं. म्हणजे नुसतं देवाच्या डोक्यावर पाणी का ओतायचं त्यान — त्याची त्याला घेऊं दे तयारी करून." पण हें सार बोलणं मनावर न घेता बापूची आई करायचं तेवढं करीत राहिली. आत्याबाईही एक-दोनदां बोलून गप्प बसल्या. कारण त्याना ठाऊक होतं की ही मिजास दोन-चार महिन्याच्यावर चालणार नाहीं. एकदा ही बाजेला खिळली कीं झकत भटाचं पोरटं सगळं आपल्या हातान करून घेईल. आणि जसजसे बापूच्या आईचे बाळंतपणाचे दिवस जवळ आले तसतशा आत्याबाईही रघूला जास्ती जास्ती काम सागून, कांहीं ना कांहीं सागून उणं काढून बोलून घ्यायला लागल्या.

बापूच्या आईच्या या बाळंतपणांत तर आत्याबाईनीं रघूला हाताखालच्या गड्यासारखं वागवायला सुरुवात केली. सारं काढ्याचं सामान, वाण्याच्या दुकानातलं अळीव-खोबरं, एवढंच नाहीं तर कुठला कुठला रानांतला बाभळीचा डिंक — सार आणायची कामगिरी. बापू असता तर जोडीला आला असता म्हणत म्हणत — रघूवर पडली. आणि चार-दोन पायल्याचं ओझं उरापोटीं

आणल्यावर त्याच्या हातावर एक किडकीशी खारीक पडली. भाग्या गडी घरांत असूनसुद्धां, त्याला ह्यांतलं समजायचं नाहीं म्हणून त्याची सुटका झाली होती. खारीक हातात पडल्यावर रघून न बघताच ती चड्डीच्या खिशात कोंबली. कारण भटाला 'वागांत कसल खारीक-खोबरं मिळतं' तें आता सरावानं ठाऊक झालंच होतं. पण त्याची तक्रार त्याबद्दल नव्हतीच. या साऱ्या उद्योगात वेळ मोडून त्याच्या अभ्यासाची खोटी व्हायची; अन् अभ्यास हेंच तर त्याच वर्म होतं.

पूजेचं करून मिळत होतं तोंवर रघूचा पूजेंत फारसा वेळ मोडत नव्हता. आता तो काळ जाऊन शिवाय भरीला ही वरची कामं आलीं आणि दररोज सरासरीनं दीड-दोन तासाचा वेळ जाऊं लागला तेव्हा रघूच्या मनावरचा बाध निघाला. तो कुणापाशीं काही बोलला नाहीं. पण कुणाला न सांगतासवरता त्यानं एक दिवस पूजेला जायचंच बंद करून टाकलं – संध्याकाळी शांतिपाठाच्या वेळीं कृष्णंभटाकडे आत्याबाईंनी तिखट मीठ लावून ' रपोट ' केला

" आतां तुम्हीच बघा गुरुजी, तसा लहान आहे अजून रघू, पण त्याला आता एवढं कळूं नये का ? घरात बाळंतीण आहे – माझी तारांबळ होते. इकडे तुम्ही काहीं कमी जास्ती न म्हणता शांतिपाठाला येताय् अन् आपलं दुपारच्या वेळेला देवांना तांब्याभर पाणी मिळूं नय ? "

" म्हणजे ? रघ्या आला नव्हता पूजेला आज ? मला ठाऊक नाहीं— "

" तसं त्याचं चुकल असं मी म्हणत नाही. बापूची आई उभी होती नंतर सारी पूजेची तयारी करून देत होती. त्याची पूजा लवकर आटपत होती. आता त्याचं त्याला करून घ्यावं लागतं सगळं – पण मी तरी कुठं कुठं पुरवणी पडणार ? अजून कळत नसेल. तसं पोरवयच आहे त्याचं— "

" म्हणून काय झालं – लहान आहे का गधडा – सगळं करायला पाहिजे वेळेला."

" माझं तरी दुसरं काय म्हणणं – पण आता कायशी त्याची परीक्षा जवळ आली वाटतं – सातारला जायचा आहे ना यंदा – अभ्यास फार असतो वाटत ? आम्हांला काय कळतंय त्यातलं. पण आपल देवाधर्माच पडलं. त्यातून घरात बाळंतीण— "

" कसले आले आहेत अभ्यास – चोचलेच झालेत फार – हीं रोजचीं कामं करायचीं नाहीत तर काय नोकर ठेवायचे ? – उद्यां पाठवून देतों त्याला."

—आणि शांतिपाठासनं परत घरीं गेल्याबरोबर भटजींनी रघूच्या पाठीला हात घातला. काही न विचारता त्याला यथेच्छ बडवून काढला. अन् मग त्याला बोलका केला. त्याचं म्हणणं काहीसं पटलं असलं तरी तसं दाखवायची भटजींची तयारी नव्हती. " मुकाट्यानं उद्यापासनं पूजेला गेलं पाहिजे. मला पर्वा नाही शाळेची न् त्या परीक्षेची. " अशी तंगटणी देऊन भटजी आपल्या उद्योगाला लागले.

× × ×

बापूच्या आईच्या या बाळंतपणाचाही शेवट टराविकपणें झाला अन् तिनं बाज सोडायच्या आत मुलानं इनामदाराचा वाडा सोडला. त्यावेळीं रघूच्या सातवीच्या वर्गात पूर्वपरीक्षेच्या तयारीची झिमड चालली होती; पण त्याच्या पाठीमागची इनामदाराच्या घरची पूजा सुटली नव्हती. त्यातल्या त्यात अभ्यासाला सवड मिळावी म्हणून रघू पूजेला जायला उशीर करू लागला. बापूच्या आईनं त्याला हलकेच विचारलं, " मुद्दाम उन करून का येतोस ? शाळा सुटल्याबरोबर अंघोळ करून यावं " रघूनं सांगितलं, " परीक्षेचा अभ्यास आहे. तो झाल्यावर आंघोळ करून निघतों. " बापूची आई अजून स्वयंपाकघर – देवघरात वावरायला लागली नव्हती तिनं दोन दिवस विचार करून आपल्याकडून तोड काढली. " रघू, तू शाळा सुटली की आंघोळ करून येत जा. मी कमळीला पूजेच करून ठेवायला सांगतें म्हणजे, तुझी चटकन् सुटका होऊन अभ्यासाला सवड होईल. "

दुसऱ्या दिवशीं कमळी सकाळच्या वेळीं आईच्या सांगण्याप्रमाणं देव-घरात लुडबुडूं लागली. आईनं तिला आदल्या दिवशीं काय काय करायचं, कसं कसं सारं सामान जुळवून ठेवायचं, याची माहिती दिली होती. कमळीनं आपल्या परीनं फुलाची परडी, तबकात कापूर, उदबत्ती, नीरांजन याची जुळणी केली. परकराचा काचा मारून गंध उगाळायाची तयारी झाली. कपाळावर चांगले घामाचे ओघळ लागेपर्यंत खसाखसा गंध उगाळलं अन् ते थाटींत भरून हात स्वच्छ धुतले. केसाची बट डाव्या हातानं कपाळावरनं

मागं सारली अन् सारं कांहीं आईनं सांगितलं तसं जमलंच अशा समाधानानं कमरेवर रखमाईसारख दोन्ही हात ठेवून ती साऱ्या सरंजामाकडं फुललेल्या चेहेऱ्यानं पाहूं लागली.

"अग आई ! मारंच मुसळ केरात – अजून नैवेद्याचं राहिलंच की. एवढ्यात तो आला तर –" असं आपल्याशीच आईच्या पोक्तपणानं म्हणत ती पळत पळत स्वयपाक घरात गेली.

"काय ग हा अवतार कमले ? – आणि हे शिनोडे कमले सगळ्या कपाळभर अन् परकरावर – कुठं उधळली होतीस सकाळच्या प्रहरी ?—" आत्याबाई चुलीशी डाळ वैरीत वैरीत एकदम उसळल्या—

"उधळले नव्हतें मी कांही ! असं काय ग बोलतीस आत्या ! उधळायला मी काय गोठ्यातली कालवड आहे ?"

"ती बरी तुझ्यापेक्षा ! एकदा दाव्याला बांधून घातली की गप्प राहते. पण तूं म्हणजे मुलखाची अवखळ झाली आहेस. शोभत नाही हें आतां – पोरीच्या जातीला. लहान कां आहेस. बारावं सरेल वैशाखात—"

"म्हणजे मी मोठी झालें होय ? वा ग आत्या – बापू माझ्यापेक्षा तीन वर्षांनी मोटा आहे – त्याला म्हणतेस, "माझं बाळ तें – एवढ्याशा वयांत परक्या ठिकाणीं राहिलयं." अन् सत्रा नवस बोलतेस—

"तर तर – त्याची बरोबरी करायला बघते – जशी कांहीं भाऊबंदीण. पण आक्काबाई, तो आहे मुलगा. दौलतीचा खांब आहे – तू जाशील पाय लावून आपल्या नवऱ्याच्या घरीं – ती एक काळजीच भरीला – अन् त्यातनं हा असला अवतार—"

"कसला ग अवतार आत्या. कांहीं तरी बोलणं काढतेस अन् त्यात कामाचं कुठल्या कुठं राहून जातं—"

"तर काय ? मोटी कामाची पडलीस कीं नाहीं ? कधी हाताखालीं सापडशील तर शप्पत. रामा-शिवा-गोविंदा—"

"आज नाहीं ऐकून घ्यायची तुझं बोलणं, बरं का आत्या – आज खूप काम केलंय मी—"

" काय दिवे लावलेस – कीं हें अंग अन् परकर एवढं बरबटून घेतलंस याची संपादणी करायला लागलीस ?— चार अक्षरं आली कीं तोंडानं चुरुं चुरूं करायला तेवढं तयार—"

" मी तुझ्याशीं बोलतच नाहीं. आईलाच— "

" हो. तेवढं निमित्त काढून तिला नको त्रास द्यायला – सांग काय असेल तें— "

" बोल तूं – बोल तूं ? आम्हीं एवढी पूजेची सारी तयारी करून ठेवावी अन् नेवेद्याला काय द्यायचं म्हणून विचारायला आलें तर— "

" कार्टे, तुला कुणी सांगितले होते हे नसते उपद्व्याप ? कशाला गेलीस कडमडायला त्या देवघरात ?– सारी शिवाशिवी करून ठेवली असशील— "

" उगीच बघायच्या आधींच कांहीं तरी बोलूं नकोस आत्या – मी अंग धुवून, लांब बसून सारं केलंय – गंध सुद्धां उगाळून ठेवलंय— "

" त्याचाच सारा राडा वाटतं हा अंगावरचा. जसं काही येतंय सारं ! कुणी सांगितलं होतं तुला ? घेतलं असतं त्या रघ्यानं उगाळून – का त्यानंच सोडला हुकूम तुला ? मेला भट तो भट पण त्याची फारच मिजास झालीय आतांशी – आता बोल कीं. गप्प कां खेटरं मारल्यासारखी – परधार्जीण कुठली !

" त्यानं कांहीं मला सांगितलं नव्हतं – उगीच कां त्याला बोलतेस कार्हींच्या बाहीं. मला नेवेद्याचं सांगतेस का आईला विचारूं "

" तर तर. त्याची कड घेतो आहे – कोण ग तो तुझा ? अन् म्हणे आईला विचारूं का– जशी कार्हीं तुझी आईच करती आहे सगळं– "

" बोल तूं – बोल हवी तशी – मी आपली आईलाच विचारतें– "

कमळी रडकुंडीला येऊन बाहेर जायच्या तयारींत होती. तेवढ्यात तो सारा गलका ऐकून तिची आईच तिथं आली अन् काय झालं याची चौकशी करूं लागली.

" शेवटीं आलंच ना तुझ्यापर्यंत ! मी तरी काय करूं बाई – ही तुझी लेक बघ – फार शहाणी झाली आहे आज. कुठं देवाच्या पूजेचं करीत बसली

होती. त्याचं काय म्हणा — चागलंच तें अन् यायलाही हवं — पण हा असा अवतार करून घेतलाय् म्हणून त्याच्याबद्दल जरा विचारलं तर त्या रघ्याची कड घेऊन माझ्यावर वसावसा ओरडायला लागली. संभाळ ग बाई हिला — आता लहान का आहे — या वयात आमच्या मंगळागौरी संपल्या होत्या — पण हिला काहीं सुमार नाहीं. कशाला निघाली त्या भटाच्या पोराच्या पुढं पुढं करायला कुणास ठाऊक— ”

“ काही तरीच आपलं — तिचं वय केवढं, ती केवढी — ती काय पुढं पुढं करणार आहे !—”

“ अग, तुला आपली लेक लहान दिसायचीच ! पण जगाला का ती लहान वाटणार आहे ! देवाला गेले तर मला विचारतात बायका — कमळीला न्हाण आलं का म्हणून ? लग्नाचा बेत कधींचा ? ”

“ इश्श — काय तरी विचारणं — त्याला ना आगा ना पिछा— ”

“ आगा — पिछा आणखी कसला असायला हवा — ही एवढी वाढलेली दिसते ना आहे ना गांवाला — मग लोकं विचारयचीच. अन् नाहीं विचारलं लोकानीं, तरी मी म्हणतें, आपलं आपण समजून नको का वागायला आता — काय हिचं अडलं होतं म्हणून गेली ते पूजेचं करून ठेवायला ? त्यानं सांगितलं असेल अन् लगेच लागली ही तो म्हणेल तशी नाचायला— ”

“ तो कुठला सागतोय — त्याची परीक्षा आली ना आता म्हणून मीच कमळीला सांगितलं होतं — तेवढं पूजेचं करून ठेवीत जा म्हणून हिलाही यायला हवंच कीं हें सगळं आता हळू हळू —”

“ काय ? तूं सांगितलंस ? मग माझं बोलणं खुंटलं. हिला यायला हवं म्हणून का हिनं भटाच्या पोराला पूजेचं करून द्यायचं ! म्हणजे चांगलीच राहील आमची शोभा ! आधींच बाप-लेक दोघंही वाटेल तसं वागता— बोलताहेतच. तो कृष्णंभट तर मेला तुझ्या बाळंतपणावरनं अप्पाना वाटेल तसं बोलला परवा — जणूं कांहीं याच्या पडशींतले डाळ-तादूळ मागत होतों आम्हीं तुझं पोट-पाणी पिकलं तर. अन् त्याचाच लेक तो रघ्या. मेला तोही अगदीं बापाच्या वर कडी — उर्मट आहे. त्याला ही कमळी पूजेचं करून देणार — नको ग बाई — त्याच्या परीस माझ्या हाताखालीं स्वयंपाकपाणी शिकूं देत— ”

" स्वयंपाकपाणी शिकायला हवच – शिकेल आपल्या हाताखालीं. पण रघू कांहीं तसा वाईट नाहीं हो – पोरगं इतकीं कामं करून अभ्यास करतं – हुशार आहे म्हणून निभतं त्याचं त्याला. आतां त्याची परीक्षा आली म्हणून तर— "

" घरचीच अशी सामील झाल्यावर मी काय बोलणार बाई ! पण सागून ठेवतें आपली – काळ्या दगडावरची रेघ समज – त्या पोटर्याच्या गरिबीच्या मुद्रेवर जाऊं नकोस – त्याचीं लक्षणं काही ठीक नाहीत— "

" आपल्याला काय करायचंय त्याच्या लक्षणाशीं – आपल्या इथं तो नीट वागतोय ना – आहे सध्या त्याची अडचण तेव्हा होईल तेवढं करावं. उचलून थोडंच देतोंय आपण त्याला— "

" कशी बाई तुला एवढी त्याची भुरळ पडली कोण जाणे ! पण माझं ऐकून ठेव – तो भट अन् त्याचं तें पोरगं – दोघंही अगदीं इब्लीस आहेत. उद्यां लग्न होईनासं झालं तर 'तुमची कमळी द्या,' म्हणायला कमी करायचे नाहींत बाप-लेक दोघंही; बरं का – सावध ऐस."

" कांहीतरी आपलं मनांत आणायचं – कमळे, तू कशाला मोठ्या माणसाची बोलणीं ऐकत उभी राहिलीस. तुला काय पाहिजे आता "

" मी कांहीं तुमचीं बोलणीं ऐकायला आले नव्हते – नेवेद्याला काय ठेवायचं तेवढं मला सांगा— "

" म्हणजे अजून ठेवलं नाहींस का ? – जा ठेव जा एक गुळाचा खडा डब्यातला— "

कमळी तिथनं निसटली. तिनं गुळाचा खडा देवघरात नेऊन ठेवला तेव्हा रघूनं देवांना पाणी घालून ते पुसायला सुरवात सुद्धा केली होती. आत आत्याचं अन् आईचं बोलणं चाललेल अजून ऐकू येत होतं – ' केव्हा आलास ' म्हणून रघूला विचारावं असं मनांत येऊनसुद्धा कमळी मुकाट्यानं गुळाचा नेवेद्य ठेवून तिथनं बाहेर पडली. तिच्या चेहेऱ्यावर एकदम लाज आली— आत्याबाईनीं सावध करायसाठीं म्हणून उच्चारलेल्या विचारानं कमळीला निराळ्या जगात आणून सोडलं. रघू – रघूशीं आपलं लग्न होईल काय ?— पण छे या विचारांत सरळ ती सांपडलं नव्हती. खेडेगांवच्या चालीप्रमाणं—

बोलण्याच्या वहिवाटीत लग्नाचा विषय येणं ही चीज कमळीला नवी नव्हती— पण ती त्यात सापडली ती तिरकसपणें – तिला शंका आली रघूनं आत्या-आईच बोलणं किती ऐकलं कुणास ठाऊक ? – त्यानं तें लग्नाबद्दलचं ऐकलं असल तर – खरच का तो कधीं आईला विचारील – हो आईलाच — कारण अप्पा – आत्याशीं तो बोलतच नाहीं – की त्याचे वडीलच अप्पांना सागून टाकतील – मग मात्र—

× × ×

स्टेशनपलीकडच्या टेकडीआड सूर्याचं बिंब बुडायला लागलं होत. माग-पुढ माणसाचा पायरव अजिबात ऐकायला येत नव्हता. कॅनॉलकाठच्या पाऊल वाटेवर अधार साकळायला लागला होता. रघूनं चमकून माग पुढ पाहिलं. फर्लांगाच्या दगडानं त्याला सागितलं, नुसत्या कॅनॉलचं अंतर दोन मैल काटलं होत. एकदम भानावर आल्यासारखा होऊन रघूनं तोंड फिरवल अन् उलट दिशेन तो घरीं परतायला लागला.

घराच्या दिशेनं रघू निघाला तरी घर म्हणताच त्याला वडलाची कोपिष्ट मूर्ति अन् श्राद्ध-पक्षाचीं आमत्रण याचीच आठवण झाली. अन् त्या श्राद्ध-पक्षाच्या जेवणासाठीं जायचे ते उजाड वाडे, पडकीं घरं – अन् ती लाचारी, अजीजी – काय हें असंच चालायच – सारखं सारखं हेंच करीत कायमचं रहायचं. हें नको होत रघूला याच्याहून कांहींतरी वेगळं होतं. पहिला नंबर मिळवणाऱ्या मुलाची उमेद निराळी होती – पण त्या उमेदीपाशींही उभे ठाकले त्याचे तेच कोपिष्ट वडील – एकटे नव्हे – त्याच्या पुढें ताड् ताड् बोलणारी आत्याबाई, दुस्वास करणारा बापू – याच्या घरात चोवीस न् चोवीस तास काढायचे – वर्षानुवर्षं काढायचीं —

भरकटतां भरकटतां रघूच्या डोळयांपुढून आठवणींत राहण्यासारखे होते तेवढे प्रसंग येऊन गेले तरी त्यांची तीव्रता त्याच्या भटकण्यांत व्यत्यय यावा इतक्या रीतानं जाणवली नव्हती. पण या सगळ्यांतून वर्षानुवर्षं आत्याबाईच्या हाताखालीं राहण्याचा विचार आल्यावर मात्र त्याचीं घरीं वळलेलीं पावलं-सुद्धां क्षणभर थबकलीं. रघूनं त्या दिवशींच आत्याबाईचं सारं बोलणं ऐकलं होतं. त्यावेळींच त्याच्या मनात आलं होतं, सरळ पूजा अर्धवट सोडून तरातरा

स्वयपाक घरात जाऊन अत्याबाईच्या पुढं उभं रहाव अन् त्याना ताड्ताड् बोलून घ्यावं — काय बोलून घ्यावं हें त्यानं ठरवल नव्हत — पण काहीं तरी — आत्याबाईच्यापेक्षाही जास्त आवाज चढवून बोलून घ्यावं असं त्याच्या मनात आलं — काय बोलायचं हें ठरवताना मात्र त्याच्या डोळ्यापुढ कृष्णंभटजी अन् त्याचा तो पाटीवर वळ उठवणारा मार आला. आपण काहीं बोललों तरी आत्याबाई कांगावा करणार — " कमळीला मागणी घातली — चक्क तिचा हात कीं हा धरला " असं म्हणायला आत्याबाई आणि तें खरं मानायला आपले वडील दोघंही मागं घेणार नाहींत. या भीतीनंच त्या दिवशी सगळं ऐकूनसुद्धां मनातल्या मनांत जळफळत रघूनं एकाग्र्यानं पूजा उरकली.

पण आता ती आठवण आल्यावर मात्र क्षणभर थबकून रघू जो पुनः चालायला लागला तो अंधाराची पर्वा न करता — त्यावेळीं कुणालाही वाटलं असतं काळोख पडल्यामुळं बामनाचं पोरगं घाबरून भराभरां निघालंय — पण त्याला भीतीचं किंवा कशाचं भानच नव्हतं — आपण आत्याबाईना काय बोलायचा बेत रचीत हातों याची आठवण होऊन तो नां रिंजूं लागला होता. सातवीच्या परीक्षेंत दोनदां नापास होणाऱ्या बापूपेक्षा किंवा त्याच्यासारख्याच दुसऱ्या एखाद्या इनामदारापेक्षां आपल्यासारखा हुषार नवरा कमळीला मिळाला तर तें निदान तिला सुखाचं होईल — पण ह्या जुळणींतलं कमळीचं सुख ही आपली बाबत नव्हे म्हणून तेवढा भाग रघू पुसून टाकायला तयार झाला होता. त्याला एवढच वाटूं लागलं कीं अशी काय मिजास या इनामदाराना लागून राहिली आहे कीं त्यानीं वेळीं अवेळी भटाचं पोरं म्हणून माझा पाणउतारा करावा अन् माझ्याशीं कमळीचं लग्न व्हायचं म्हणजे मोठं अरिष्ट मानावं. एवढा उणेपणा कसला आला आहे ? सारा उपहास अपमान गिळीन — कोरगावकर बुवानीं कीर्तनांत सांगितलं होतं ना कीं, शंकरानं विष पचवलं — तस सारं पचवीन अन् यांना समजून येईल कीं रघू म्हणजे कांहीं —

मधेंच एका वस्तीवरचं कुत्रं भुंकलं — रातकिड्यांची किर्रर्र आवाजी जोरात ऐकूं येऊं लागली कॅनॉलकांठची पायवाट संपत आल्याची रघूला जाणीव झाली. रघू म्हणजे कांहीं तसा स्वप्नाळू नव्हे पण शंकराच्या विषाच्या निमित्तानं कोरगांवकर बुवांची आठवण होताच त्याला अंबूवरनं बापूनं केलेल्या थट्टेची आठवण झाली — अंबू आणि कमळी — कमळी तर रोज घरांत राहणार, बापू पहारा

करणार आणि आत्याबाई कुभाडं रचणार. पुनः त्याचं मन धादरटासारखं घाबरायला लागलं. आपला सद्रा घामानं भिजतोय् कीं काय अशी शंका आली. त्या भरांत त्यानं छातीशीं हात नेला. जानवं हाताला लागतांच त्यानं एकदम चमकून डावीकडे पाहिलं. कॅनॉल संपून गाववाटेला लागलं कीं मधेंच एक जुनाट वड लागायचा. त्याच्याबद्दलच्या ब्ऱ्याच आख्यायिका होत्या. त्या वडाच्या जवळ आपण आलोंय हें ओळखून रघूनं हातांतलं जानवं फिरवून ब्रह्मगाट पकडली. अन् तोंडानं 'राम' 'राम' म्हणायला सुरवात केली.

वडाच्या पलीकडे आल्यावर रघूला आपले पाय भेंडाळून गेल्याची पहिल्यांदा कल्पना आली. जाता-येता सहा मैलांच्यावरची एकंदर मजल त्याच्या आंवाक्यांतली नव्हती. अजून जवळ जवळ एक मैल अंतर काटायचं होतं. आठाचा सुमार तरी झाला असेल. केव्हां एकदा घर गाठतोय एवढंच उरलं – तसतसा रघू पावलं मोजीत चालूं लागला. त्याचं मन स्वच्छ झालं— पार धुवून निघालं. उद्या काय होणार हें त्यानं ध्यानांतच घेतलं नाहीं. आतां या क्षणीं घरीं जाऊन पोंचायचं अन् दोन घास पोटांत ढकलून आडवं व्हायचं, एवढंच त्याला आठवत होतं—



## : २ :

शिवपुराच्या प्रथम दर्शनानं रघूच्या मनावर अनुकूल परिणाम असा कांहीं केला नाहीं. एका लहानशा कां होईना पण संस्थानाची राजधानी असलेलं तें गांव, पावसाळयाच्या पहिल्या तोडाला रघूच्या खेडेगांवाइतकंच गलिच्छ दिसलं. चिखलानं बरबटलेले रस्ते, त्यांच्या अरुंदपणांत भर घालायला आलेले शहरीपणाची मिजास दाखवणारे दिव्यांचे खांब, माणसा-जनावरांच्या अन् कडेच्या दुकानाच्या गर्दीनं कोंदटपणांत पडणारी भर, ह्या सगळ्यानीं रघूला अधिकच गुदमरून टाकलं. टांग्याच्या हादऱ्यांनीं बैलगाडीच्या धक्क्यांनाहि मागे पाडलं. अप्पानीं त्यांतल्या त्यात स्वस्त आणि सोयीची म्हणून बोळकंडीं-तली जागा बघितली होती. तिचा तडाखा टांग्यांतलीं ओझीं मोठ्या रस्त्या-पासून साऱ्या बोळभर वाहून नेताना रघूला बसला. पण त्याच्या पाठोपाठ शहरी माणसाच्या अगत्य-आतिथ्याच्या अभावानं आत्याबाईंची नागी नरम झाली. मुद्दाम परठिकाणीं आणून टाकलेला म्हणून बापू खट्टू होताच— अन् त्या दोघाच्या विरोधाला टिच्चून आलेली कमळी आपोआपच एकटी पडली होती.

एकंदरींत चौघांच्या चार तऱ्हा असा प्रकार इनामदारांच्या बिऱ्हाडांत झाला असला तरी त्याच्यात एक साधारणपणा कळत-नकळत येत होता. अपरिचित शहरी रहाणीच्या हिसक्यानं आत्याबाईंचा पहिला नूर पालटू लागला. त्यानतर त्याना चिंता उरली ती उचलल्या खर्चाची ! त्यांचं काळीज लखख व्हावं असा खर्च पावलोपावलीं होत होता. दहाची हिरवी नोट खेडेगावांतल्या इनामदारांनासुद्धा आपुर्वाईची चीज वाटायची—पण इथं तिची बोलबोल म्हणतां चटणी उडायची ! आत्याबाईंनीं आपल्या हातानं कैक बाया-बापडयांना 'एवढंस ताक' म्हणून तपेल्या भरून दिलेल्या — पण इथं ताकाचं तें फुळक-

वणी सुद्धां विकत आणायचं ? अशी आत्याबाईंच्या तोंडची यादी करायची तर ती एक कथाच होऊन बसेल. बापूच्या मनाविरुद्ध प्रत्येक गोष्ट घडत होती. आधीं दोन वर्षांचे स्नेही सोबती सोडून अन् तेंही बिऱ्हाडाचं लचांड घेऊन यावं लागलेलं. पण याच खापर तरी निदान अप्पांच्या माथीं फोडायला येत होतं. त्यानं होऊन बृहस्पतीच्या शहाणपणाचा आव आणून दोन्ही मोठीं हायस्कूलं सोडून खाजगी क्लासांत नांव घातलं – तें मात्र त्याचं त्यालाच अवघड झालं. पांचवीची परीक्षा पास व्हायची नाहीं हा हिशेब मुळांतच ठरलेला. पण या क्लासांत इंग्रजी शाळेची चव म्हणून नव्हतीच. सारीं मुलं खेडयावरनं आलेलीं आणि तींही पैसे – वर्षं वांचवा अन् शिकून घ्या म्हणून हांवरलेली – अगदीं गांवंढळ. शहरच्या वाऱ्यापासनं दूर. त्यांतल्या एकाशीं ओळख करावी अस बापूला वाटेना. कमळीनं तोंडाचा फटकळपणा कितीही दाखवला तरी मनांतून ती चरकूनच होती. आत्या – बापूशीं पटायचं नाहीं; रघूशीं कांहीं बोलायचं नाही. करावं तरी काय ? – अन् त्यांतनं खेडवळ पद्धतीनं केव्हा लग्नाची उचल घेऊन कुठं ढकलतील त्याचा नेम नाहीं.

—पण हे सारे इनामदारी ढंग झाले. रघूला त्याच्याशीं काहीं कर्तव्य नव्हतं. त्याला एकदां शिकायला मिळाल्यापासून त्यानं ह्या घरांतल्या बाबींकडे लक्ष द्यायचं नाहीं असं ठरवून टाकलं. त्याला असमाधानी व्हायचं तसं काहींच कारण नव्हतं. पण कुणाला कशाचं अन् कुणाला कशाचं – तर रघूला रिकामीच चिंता लागली. घरांतलीं पडतील तेवढीं कामं अन् नुसत्या इंग्रजीचा टीचभर अभ्यास, यांना पुरून त्याचा वेळ उरूं लागला. चार साडेचाराला दुपारचा चहा आवरला कीं पुढं रात्र पडेपर्यंत वेळ कसा घालवायचा हेंच त्याला कळेनासं होई. लहानपणापासून मित्रांच्या बाबतींत टक्केटोणपे खाऊन तो कांहींसा माणूसघाणाच बनूं लागला होता अन् नव्या ठिकाणीं आपल्या-सारखे मित्र तरी मिळताहेत सहजासहजीं थोडेच !

त्या रिकाम्या आणि आळशी अवस्थेंतून बाहेर पडण्यासाठीं रघूनं पुढ त्याचो संवय बनून गेलेली हुकमी युक्ति अंमलांत आणली. पांचाचा ठोका पडला कीं त्यानं बिऱ्हाडांतनं बाहेर पाऊल टाकायचं. खुणेसाठीं निरनिराळ्या अक्षरांत लिहिलेल्या पाटया वाचीत किंवा घरांच्या वेगवेगळया दरवाजांच्या

लकब्रा पहात तो एकेका रस्त्यानं रस्ता संपेपर्यंत किंवा पाय भेंडाळेपर्यंत भटकत जायचा. ही पाट्या वाचायची संवय तर त्यांच्या अंगीं इतकी भिनून गेली कीं कुठल्याही ठिकाणाचा पत्ता तो पाटीच्या खुणेनं सांगायचा. पुण्यात गेल्यावर त्याला अप्पा बळवंत चौक किंवा टिळक रोड यांनीं कांहीं बोध व्हायचा नाही पण मोडी पाटी किंवा डॉ. गुण्याचा रस्ता असलाच शब्दप्रयोग करून आपल्या मित्राच्या थट्टेचा विषय व्हायचा.

असाच भटकत भटकत रघू शिवपुरच्या मागच्या रस्त्यानं दूरवर गेला अन् चिंचेच्या बनांत जाऊन थाबला. तिथं एकदम माणसाचा पायरव वाढलेला दिसला म्हणून बनांत शिरून पायवाटेनं त्यानं पुढं जाऊन पाहिलं. चौकशी केल्यावर आपण तिथल्या प्रसिद्ध गणपतीच्या देवळापाशीं आलों हें त्याला कळलं — चागल्या ठाकठीक पोशाखातलीं सुशिक्षित माणसं भाविकपणानं गणपतीच्या दर्शनाला आलेलीं पाहून त्याला उगीचच गमत वाटली. तसं त्याच्या मनात देवाधर्माविषयीं अजून काहीं विपरीत आलं नव्हत — उलट भिक्षुकी वातावरणांत त्याची श्रद्धा पोसलेली होती. त्यानं अगदीं शुद्ध भावानं गणपतीचं दर्शन घेतलं. तरीसुद्धां त्याला कांहींतरी खटकल्यासारखं वाटतच राहिलं. काय तें त्याला समजेना—

तसं पाहिलं तर त्याला शिवपुरांत अनेक गोष्टी खटकल्या होत्या. शह-राच्या म्हणून त्यानं ज्या कल्पना केला होत्या त्याच्याशीं कशाचाच मेळ बसत नव्हता. गावात अजून विजेला ठिकाणा नव्हता. आपलं पहिलं ठिकाण यापेक्षां लाखपटीनं चांगलं हें बापूनं त्याला अनेकदा ऐकवल होतं — रघूच्या आयुष्यांत अजून दुसरं शहरच आलं नव्हतं — तरी त्याला आपलं कांहींतरी वाटायचं ! संस्थानची राजधानी म्हणून काहींतरी वेगळं दिसायला पाहिजे अशी आपली त्याची समजूत होती; पण इथं तर एका राजवाड्याशिवाय सगळा मामला खेडेगावीच दिसत होता. त्यानं भूगोलात इथल्या मिलचं नांव वाचलं होतं पण मुंबईच्या गिरण्याचीं चित्रं पाहिलीं होतीं त्याच्यासारखं इथं काहीं नव्हतं— शिवपूर म्हणजे त्याच्या हिशेबी कोरं पुस्तक होतं.

रघूला त्या गणपतीची झालेली माहिती त्याच्या उपयोगी पडली तीही अगदीं अचानकपणें. त्याला जी गोष्ट खटकत होती, तीच आत्याबाईना समाधान देत होती. तिथल्या भाविकपणाच्या एकंदर वातावरणानं आत्याबाईना

त्यांतल्या त्यांत बरं वाटायचं. श्रावणाचा महिना आला तसा त्या भाविकपणाला बहर आला आणि आत्याबाईनीं गणपतीला जायचा बेत ठरवला. नेहमींप्रमाणं बापूनं हुडूत् केलं. कमळीला भटकायला हवं होतं पण तिला तरी वाट कुठं ठाऊक होती ? रघूनं त्या दोघींना बागेंत गणपतीला न्यायचं कबूल केलं. आत्याबाईना तेवढंच बरं वाटलं

नाहींतरी अलीकडे रघू फारच निवळायला लागला होता. दुपारच्या वेळेला तो कांहीतरी संस्कृत पाठ करीत असलेला दिसायचा. त्यामुळं एकतर कमळीला लुडबुडायला वाव मिळायचा नाहीं आणि आत्याबाईच्या कानावर अनायासें देवाचीं चार अक्षरं पडायचीं. नाहींतरी उपाध्याचा – या खेपेला आत्याबाई भटाचा म्हणाल्या नाहींत – मुलगा आपल्या वळणावर गेल्याशिवाय रहायचा नाहीं. त्याच्या त्या पाठांतरानं कमळीला मात्र उगीच गुदमरल्यासारखं व्हायला लागलं. तेव्हां तिनं विचारलं, “रघू, तुम्हाला तिसरीतच संस्कृतचा अभ्यास असतो का रे ?” रघूनं सांगितलं, “अभ्यासासाठीं नाहीं, पण एक काम आहे म्हणून गीता पाठ करतों आहे” मात्र काय काम आहे याची त्यानं दाद लागूं दिली नाहीं. नियमानं गीतेचे तीन अध्याय पाठ करून रघूनं गीता–जयंतीच्या दिवशीं गीता पाठाच्या स्पर्धेंत भाग घेतला आणि शुद्ध वाणीनं आपला पाठ म्हणून एक गीतेचं पुस्तक आणि तीन रुपये रोख तो घरीं घेऊन आला.

स्वतःच्या कमाईचे ते पहिले तीन रुपये घेऊन येतांना रघूला आतिशय आनंद झाला. गीता-पाठ म्हणण्यांत रघूची धार्मिक भावना उचंबळून आली किंवा आपण उपाध्ये म्हणून हें त्याला करावंसं वाटलं अशांतला भाग नव्हता. त्याचं लक्ष वेधून घेतलं होतं तीन रुपयांच्या रोख बक्षिसानं. आपल्या शिक्षणाला असलेला इनामदारांचा आधार केव्हा एकदम सुटेल त्याचा नेम नाहीं अशी भीति नेहमीं रघूला वाटायची. आणि आपले वडील सध्यां देतात ते चार–पांच रुपयेसुद्धां इनामदारांच्या घराबरोबर सुटणार याविषयीं त्याला शंका नव्हती. असं झालं तर काय करायचं हें त्यानं ठरवलं होतं असं नाही. पण शिवपुरांत आल्यापासून आपण कांहींतरी पाय हालवीत असावं असं त्याच्या मनानं घेतलं होतं. दहा-अकराच्या सुमाराला “ॐ भवती” करणारीं बरोबरीचीं मुलं, दर रविवारीं ‘प्रभाते मनीं’ म्हणून

आश्रमांतून बाहेर पडून भिक्षा मागणारे विद्यार्थी यांच्याकडे पाहिलं कीं रघूला विलक्षण लाज वाटायची. यांच्यापेक्षां दोन वेळ आयतं जेवण मिळून आपण शिकतोंय् – तें किती सुस्थितींत. या स्थितीला जाऊनसुद्धां आपलं शिकणं पुरं करायची तयारी असायला पाहिजे – केवळ मिळतं आहे म्हणून स्वस्थ रहाण्यांत काय अर्थ आहे ? वयाला न झेपणारे हे विचार रघू पचवीत होता; अन् आपल्याला झेपेल तेवढं तरी करायला लागायचं हें त्यानं ठरवलं होतं. म्हणूनच गीतापाठाचं आपल्या आवाक्यांतलं काम केल्यावर मिळालेलं बक्षीस घेऊन तो खुषीनं घरीं आला.

" कसलं रे नवं पुस्तक आणलंस ? अन् पैसे कुठनं घेतलेस ? "

" बघ कीं ! पैसे देऊन नाहीं आणलं कांहीं. त्याच्याबरोबर पैसे पण आणले आहेत— "

कमळीला गंमत वाटली. पैसे न देतां पुस्तक अन् वर पैसे ! त्या बक्षिसाची हकीकत ऐकून तिनं आत्याला हांक मारली—

" काय म्हणतीस कमळे – पुस्तक ? मला काय त्यांतलं कळतय— ! "

" अग, रघूनं गीता आणली. त्याला बक्षीस मिळाली अन् पैसे पण— "

" बक्षीस ? – अन् आधीं नाहीं बोलला त्याच्याबद्दल— "

" आता तर मिळालं. आधीं कसं बोलणार— ? "

" बरं झालं – बापूला शीक म्हणावं असलं काहीं तरी – " आत्याबाई कधीं नाहीं त्या बापूच्या उलट आणि रघूबद्दल बरं बोलल्या—

" त्याला काय करायचंय् असलं शिकून— "

" त्यांत वाईट काय आहे ? चागलं देवाधर्माचं— "

" तें मला तरी कुठं कळतंय आत्याबाई – मी आपला बक्षिसाच्या आशेनं गीता पाठ करीत होतों झालं— "

" हात् मेल्या; केलं सवरलंस सगळं – आणि आतां असं बोलून आपल्या हातानं त्याच्यावर पाणी ओततोस होय ? सरळ आपला म्हणतोस बक्षिसाच्या आशेनं केलं— "

" मग त्यांत काय बिघडलं ? मला पैसे हवे होते – तेवढेच फीला उपयोगी पडतील म्हणून केली धडपड— "

" म्हणजे ! त्या तीन रुपड्यांसाठीं का एवढं रक्त आटवलंस — काय तरी अगोचरपणा — इथं काय तुला कमी पडलं होतं ! पण म्हणतात ना शेळी जाते जिवानिशीं— "

" तसं नाहीं आत्याबाई — तुम्ही सगळं करताहांतच. पण उगीच तरी किती म्हणून भार टाकायचा ? आपलं होईल तेवढं करावं— "

" आतां कर हवी तशी तोंडदेखली संपादणी. जा मेल्या; तूं असाच–"

पण रघूनं आत्याबाईचं हें शेवटचं बोलणं पुरतं ऐकलं सुद्धां नाहीं. तो आपल्याच नादांत होता. 'आपलं होईल तेवढं करावं' हें त्यानं आत्याबाईना समजुतीकरतां सांगितलं होत — पण त्याचा अर्थ या तीन रुपयांच्या बक्षिसापेक्षां फार वेगळा होता हें रघूशिवाय इतर कुणालाच ठाऊक नव्हतं. त्यान पोस्टाच्या बँकेंत पंचवीस रुपये शिल्लक टाकले होते हें रघूचं खास गुपित होतं खाजगी क्लासांत नाव घातल्यावर नादारी मिळण्याचा प्रश्न नव्हता. म्हणून एकदा नांव घालून झाल्यावर कृष्णंभटजींनीं कुरकुरत कां होईना रघूला फी पुरते चार-पाच रुपये दरमहा पाठवायला सुरुवात केली होती. पण ते पैसे जसेच्यातसे फीसाठीं म्हणून खर्चून टाकायचं रघूच्या जिवावर आलं होतं. त्यानं भीत भीत आपल्या मास्तराजवळ विषय काढून पाहिला. क्लासला जाऊन महिना होऊन गेला होता. रघूनं विचारलं त्याला आठ दिवस होऊन गेल्यावर त्याच्या मास्तरानी एक दिवस तो विषय काढला — " मग काय जोशी, क्लासची फी देणं तुला परवडणार नाहीं म्हणतोस ? "

" होय सर, वडलानीं सांगितलं होतं, नादारी मिळवून शिकणार असलास तरच शिकायला जा — "

" मग नांव घालायच्या वेळींच तसं सांगितलं असतंस तर तेव्हांच्या तेव्हां तुला सांगून टाकलं असत — खाजगी क्लासात रे कसली नादारी ? "

" नांव घालतांना तसं वाटलं नाहीं. मला तें ठाऊकच नव्हतं. "

" मग आता गेले कीं नाहीं तुझे पाच रुपये फुकट. आधीं विचारलं असतंस तर ते वांचले नसते का ? "

" हो पण— अं ... अं ... "

" का ? अडखळतोस का ? —बोल ना "

" पैसे वांचले असते पण शिकायचं राहिलं असतं ना— "

" तुला दोन्ही हवंय होय ? – पण फुकट कोण शिकवील ? माझा हा पोटाचा धंदा आहे— "

" हं मला वाटलं होतं मराठी शाळेंत माझा पहिला नंबर होता. तसाच इथं वर नंबर राहिला तर नादारी—"

" खरंच का तुला शिकायचं आहे – ? इथं नादारी नाहीं. पण तुला जर खरोखरीच शिकायची इतकी इच्छा आहे तर त्यासाठी कष्ट करशील ? "

" हो मला झेपण्यासारखे वाटेल ते कष्ट करीन."

" तर मग उद्यांपासून क्लासच्या आधी तासभर येऊन घरांत पाणी भरून ठेवीत जा. आमच्या इथंही अडचण आहे. तेवढं केलंस तर तुझ्याकडून फी घेणार नाहीं. "

" त्यांत काय अवघड आहे ! आमच्या गांवीं तर नदीचं पाणी आणावं लागतं – इथं नुसतं नळाचं भरायचं. पण तेवढ्यासाठीं तीन रुपये ? "

" जास्त चौकशी करूं नकोस; काम कर आणि शिकून घे. "

—आणि अशा रीतीनं रघून दरमहा तीन रुपये वाचवायला सुरुवात केली. पण ही गोष्ट त्यानं कुणालाच सांगितली नव्हती. इनामदारांच्या इथं कळलं तर बापू टिंगल करील; दुसऱ्याच्या घरचं काम धरल्याबद्दल आत्याबाई फाडून खातील अशी भीति होतीच. पण त्याशिवाय म्हणजे ही गोष्ट आपल्या वडलांच्या कानांवर जाऊन या निमित्तानं त्यांच्याकडून येणारे चार—पांच रुपये बंद व्हायचे. रघूला तें व्हायला नको होतं. त्यानं मुकाट्यानं बँकेंत पैसे ठेवायला सुरुवात केली. पण हे पैसे सांठवतांना आपण वडलांना फसवतों किंवा कमाई करतों अशी त्याला कोणतीच जाणीव नव्हती. घरचेच पैसे वडलांच्या ऐवजीं आपण ठेवतों एवढं तो मानी – त्यांत कमाईचं समाधान नव्हतं; तें त्याला गीता-पाठाच्या बक्षिसानं मिळवून दिलं. त्या समाधानांत बापूनं केलेली गीता-पाठाची थट्टाही रघूनं मनावर घेतली नाही. अंथरुणाला पाठ लावल्यावर रात्री त्याचे डोळे भरून आले. खूप वेळ झोंप आली नाहीं – आपण कांहीतरी करूं शकतों, कांहीं तरी करून दाखवणार आहोंत. नक्कीच आजपासून आपल्या नव्या पैलूला सुरुवात झाली. असं खूप खूप त्याच्या मनांत येत राहिलं—

× × ×

हायस्कूलच्या वातावरणांत आल्यावर रघूच्या जीवनाला शहरीपणाचा खराखुरा स्पर्श होऊं लागला. अर्ध्या फर्लांगावर घर असलं तरी सायकलशिवाय अडून रहाणारीं श्रीमंत, व्यापारी–अधिकाऱ्यांचीं मुलं, नादारीसाठीं उभ्या राहून इस्त्रनावारी पातळं वापरणाऱ्या मुली, तीन विषयांत कसेबसे पास होऊन क्रिकेट-फूटबॉलच्या जिवावर वरच्या वर्गांत चढणारे खेळाडू आणि यांपैकीं काहींही भांडवल जवळ नसतांना आगाऊपणा करून पुढं रहाणारे मीरवे–अशा निरनिराळ्या विद्यार्थ्यांच्या जगांत रघूला चुकल्याचुकल्यासारख वाटायचं पहिल्यांदा. याच्या उलट बापू मात्र खुषींत आला होता. आतां खर खरं शिवपुरांत राहिल्यासारखं वाटतंय अस म्हणायला त्यानं सुरुवात केली. पण त्यांतही थोडीशी फसगंमत झाली होतीच. मुली असलेल्या तुकडींत नांव घातलं गेल्यामुळं रघूला गुदमुरल्यासारखं व्हायचं तर बापू कांहींतरी खटपट लटपट करून आपलं नांव मुलींच्या तुकडींत बदलून घेण्यासाठीं आटापिटा करीत होता.

"रघ्या लेका, तूं माझ्या वर्गांत असतास म्हणजे बरं झालं असतं. आपण तुकड्याची अदलाबद्दल केली असती."

"हो. छान झालं असतं – पण तूं पडलास एक वर्षनं पुढं—"

कमळीनं मधेंच विचारलं. "एवढ काय गुपित चाललंय रे ?"

"कांहीं नाहीं. तुला काय कळतयं त्यांतलं—"

"तर तर. तुलाच सार कळतं जसं कांहीं – तूं सांग रे रघू"

"रघ्या, फोडायचं नाहीं बरं का"

"बरं आहे. मी पण येतें पुढच्या वर्षी तुमच्या हायस्कुलांत – मग तरी सगळ कळेल की नाहीं—"

"चल ! तुला कोण येऊं देतंय हायस्कुलांत – बरी आहेस त्या गर्ल्स स्कुलात आहेस तीच. उगीच मुलाच्या शाळेंत मिरवायला नको."

"पण बापू, अशा सगळ्याच मुली गर्ल्स स्कुलात गेल्या तर मग तुझं रे कसं व्हायचं ?"

"रघ्या, लेका, तुला काहीं अक्कल नाहीं. नुसता परीक्षेंत नंबर मिळव तूं. पण बाकी सगळं शून्य—"

" म्हणजे ? तुमच्या हायस्कुलात बाकीच्या मुली येतातच ना— ? मग मी पण येणारच पुढच्या वर्षी—"

" बरं बरं. बघता येईल पुढच्या पुढं— " म्हणत बापूनं पाय काढला.

" अन् रघू. काय म्हणालास रे तूं मघाशीं ? सगळ्या मुली गर्ल्स स्कुलांत गेल्या तर बापूचं कसं व्हायचं—म्हणजे रे काय ? "

" तूं लहान आहेस कमल – तुला नाहीं तें कळायचं—"

" वा ! वा ! आतां हायस्कुलांत गेल्यावर तूं सुद्धा बापूसारखं बोलायला शिकलास वाटतं रघू ? म्हणे मी लहान आहे ! म्हटलं मीसुद्धा आतां पातळ नेसायला लागलें आहें. आत्याबाई तर घरांतसुद्धा पातळंच नेसलीं पाहिजेत म्हणतात – एवढी मोठी दिसायला लागलें. अगदीं घोडी वाढले असं रोज म्हणतात वाटेल तें जसं – कांहीं तुला ऐकूच येत नाहीं—"

" आत्याबाईंना तूं मोठी दिसतेस. पण अजून—"

" मग काय तुला न् बापूला मी मोठी दिसत नाहीं—"

" तसं नव्हे ग. पण – पण तें तुला कळायचं नाहीं. "

" आणि तुला तेवढं कळायला लागलं वाटतं ? असा कितीसा मोठा आहेस तूं माझ्यापेक्षां ? पण तें राहूं दे – नसलं आम्हांला कळत तर नको कळूं देत. पण मी विचारते तें तर सांगशील ? "

" काय ? "

" तुमच्या वर्गांत मुली आहेत का रे ? "

" हो. आहेत कीं दोन—"

" केवढ्या ? माझ्याएवढ्या ? कीं 'तें' कळायएवढ्या ? "

" अं ? तुझ्यापेक्षा मोठ्या आहेत—"

" अन् बापूच्या वर्गांत ? "

" त्याच्या वर्गांत आहेत. पण त्याच्या तुकडींत नाहींत— "

" तरीच ! कळलं मला बापूला मुलींच्या तुकडींत जायचं असेल— होय की नाहीं ? – त्याचंच एवढं गुपित चाललं होतं वाटतं ? "

" पण तें तुला कसं कळलं ? "

" तूं नाहींना सांगितलंस – मग आतां कशाला विचारतोस ? "

" असं काय कमल ! साग ना – नाहींतर तूं त्याला चिडवायला जाशील अन् मींच तुला सगळं सागितलं म्हणून बापू माझ्यावर रागावेल— "

" पण तूं सांगितलं नाहींस तर तुला त्याची भीति का ? "

" जसं कांहीं बापूचं वागणं तुला ठाऊकच नाहीं— "

" मला कांहीं तुमच्या शाळेंतनं कळलं नाहीं. आमच्या वर्गात बापट नावाची एक मुलगी आहे. तिची बहीण हायस्कुलांत पाचवींत आहे असं ती म्हणाली. तेव्हां मीं पण सागितलं माझा भाऊ पाचवींत आहे म्हणून—"

" पण यानं तुला बापूचं गुपित कसं कळलं ? "

" आमच्या शाळेंतली बापट म्हणाली की, तिच्या बहिणीच्या वर्गात कोणी इनामदार म्हणून नवा मुलगा आलाय. तो दुसऱ्या तुकडींत नाव असतांना बहिणीच्या वर्गात येऊन अगदीं तिच्या पाठीमागच्या बाकावर बसला होता दोन-तीनदां. पण तो माझा भाऊ नसेल असं ती म्हणाली—"

" म्हणजे तो बापू नसेल असच तर ती म्हणाली ना— "

" हो, म्हणाली ती माझ्याजवळ तसं. पण मला एवढं कळत नाहीं होय ? – बाकी तूं नाहींच म्हणतोस बापूमारखं – पण माझ्याजवळ दुसरी एक गंमतसुद्धा आहे बापूची—" कमळी पटकन् बापूच्या वह्यांच्या कोनाड्या-कडं गेली आणि तिनं बापूच्या दोन वह्या हुडकून काढल्या. रघू नुसता बघत राहिला होता.

" हें बघ बापूच्या वहींत काय आहे. अशीच दिसते कारे ती बापट बापूच्या वर्गातली ? " वहींतलं एका मुलीचं चित्र दाखवीत कमळीनं विचारलं. रघून त्या चित्राकडं उगीच पाहिल्यासारखं केलं—

" छट् – हें तर इतिहासांतलं नूरजहानचं चित्र आहे. "

" मला बनवतोस होय – "

रघू कमळीला बनवत होता कीं नाहीं कोणास ठाऊक ! पण बापूच्या चित्रकलेचा तो नमुना पाहून रघू चकित झाला होता. त्या चित्राला नूरजहा-नचं म्हणा, मस्तानीचं म्हणा कीं यमू बापटचं म्हणा त्यामुळं कांहीं सुद्धां फरक पडला नसता. कारण एक माणसाचा वाटणारा चेहेरा आणि तो चेहेरा बाईचा आहे हें सांगणारे केस आणि कुंकवाचा टिळा यांच्याखेरीज त्यांत

दुसरं काहींच नव्हतं. पण बापू मुलींचीं चित्रं काढण्याच्या नादाला लागला, मुलींच्या तुकडींत जाण्याच्या आटोकाट प्रयत्न करूं लागला, आणि कमळीच्या म्हणण्याप्रमाणं म्हणजे मुलींच्या पाठीमागच्या बाकावर बसू लागला — या साऱ्याचं रघूला आश्चर्य वाटलं. अंबूच्या नांवाशीं दहा वर्षांच्या रघूची जोडणी करण्याची मस्करी करणारा बापू — तोच का बापू तीन वर्षे शहरात राहून वेगळा झाला होता ? इतका वेगळा झाला होता ? — छे ! कृष्णी बोरगांव-करणीच्या तमाशांतल्या लावण्या हावभावासहित म्हणणारा बापू सरळ रेषेंत चालला होता पण ती सरळ रेषा रघूच्या दृष्टींत आली नव्हती, त्यानं ध्यानांत घेतली नव्हती.

पण रघूला त्याच्याहिपेक्षा आश्चर्य वाटलं तें कमळीच्या ज्ञानाचं. 'मी आतां पातळ नेसायला लागलें' म्हणणारी कमळी, रघूला आपल्या इंग्रजी अभ्यासाच्या शंका विचारणाऱ्या निरागस कमळीहून निश्चित वेगळी होती. रघू—बापूंचं बोलणच काय पण त्याहून अधिक आपल्याला कळतं हें दाखवि-ण्यासाठीं तिनं बापूच्या वह्यांची घेतलेली दखल ही नुसत्या बहीण-भावांच्या स्पर्धेपेक्षां अधिक होती. सतत एकत्र रहाण्यानं तिच्या बाध्यांत पडूं लागलेला फरक जसा रघूच्या नजरेंत भरला नाहीं तसाच स्त्री—पुरुष भेदाच्या जाणिवेचा भाग तिच्या मनांत रुजला आहे हेंही रघूच्या भित्र्या, आखडत्या स्वभावाला कळलं नाहीं. आत्याबाईच्या पहाऱ्याची रेवडी उडवणारी कमळी नुसती आत्या-बाईच्या फाजील चिकित्सेखोरपणाला डिवचीत होती असं रघू मानायचा. त्यामुळें आत्याबाईनीं कमळीला कधीं "रघूला वरचेवर किती त्रास देतेस" असं म्हटलं कीं रघूनं सावरून घ्यायचं—

"त्यांत कसला आला आहे त्रास आत्याबाई — तेवढीच माझी उजळणी पण होऊन जाते—"

"पण एखाद्या वेळीं बापूला विचारावं — तोही इंग्रजी शिकतो ना ?"

"त्याला कधीं वेळ असतो का आत्या— ? तो कधीं सांगतो का मला कांहीं ? — शाळा सुटली कीं घराला पाय लावून जातो. जात असेल त्या —" कमळीनं बापूला चिडवायचं.

"कमळे, तुला माझी चौकशी करायचं काम नाहीं — तुला कांहीं इथं माझी जबानी घ्यायला ठेवलं नाहीं."

" बघितलंस आत्या ? – अन् ह्याला येतंय काय मला सागायला ? "

" चोंबडेपणा करूं नकोस – तुला काय कळतयं माझ्या अभ्यासांतलं ? "

" गणिताच्या पेपरावरचा भोपळा दिसतो म्हटलं आम्हाला – अन् मास्तरांनी बारे इनामदार म्हणून लिहिलंय तेंसुद्धा—"

" असूं देत जा ! कसली ती तिमाहीची परीक्षा अन् तिचे मार्क ! प्रत्येक वेळेला पास होऊन मला नादारी थोडीच मागायची आहे ? आपली वार्षिक पदरांत पडली कीं झालं—

—शेवटीं बापूनं रघूच्या नादारीला टोमणा मारलाच. पण तो लागला रघूपेक्षांही कमळीला. ती कांहीं तरी उसळून बोलणार होती. तेवढ्यांत आत्याबाईनीं अरे–अरे करून ती कळवडी सोडवली. पण रघूला हें सगळं जास्त जास्त अवघड वाटूं लागल. त्याचा कहर झाला गणपतीच्या दिवसात. बापू काही तरी निमित्त काढून गावच्या जत्रेला निघून गेला. कमळीला रात्रीच्या वेळीं मेळा कसला असतो तों पहायची हुक्की आली. आत्याबाईनीं घालायचा तेवढा मोडता घातला. पण रघूबरोबर येणार नसला तर चार घरांपलीकडच्या मैत्रिणींबरोबर एकटीनं जायची कमळीनं तयारी केली. आत्या-बाईनीं नाइलाजानं रघूला तिच्याबरोबर जायला सांगितलं. तोंडाला रंग फासून नाच – गाणीं – संवाद करणाऱ्या मुलामुलींचं दृश्य दोघानीही नवीन होतं. त्यांतलं अहिल्योद्धाराचं दृश्य पाहून तर कमळीला फारच गंमत वाटली अन् रात्रीं अकरा वाजता परत येतांना अधाऱ्या रस्त्यावर ठेंच लागली तेव्हां तिनं मला भीति वाटते म्हणून सरळ रघूचं बोट घट्ट धरलं.

त्याच वेळीं रघू अहिल्योद्धाराचं दृश्य आठवून जुन्या कवितेची ओळ गुणगुणत होता – ' अहिल्या शिळा राघवें मुक्त केली ' कमळीनं त्याचीं बोटं अधिक घट्ट धरीत विचारलं " खरंच का रे ? "

" अं ? काय ? "

" कुठं काय ? – तुझी तंद्री लागली वाटतं अजून. म्हटलं अहिल्येचं नाटक मधार्शींच संपून गेलं – कीं स्वतःच नांव रघू आहे म्हणून— "

" म्हणून काय ? "

" मला काय ठाऊक ? मी काय मेळ्यांतली तरी अहिल्या थोडीच आहें—? "

" काय बोलतीस तें कळतंय का ? "

" अंहं !— मला कुठं अजून कळायला लागलंय ?" या कमळीच्या शेवटच्या वाक्याबरोबर रघूच्या बोटांतनं शिरशिरी उठून गेली अन् तो आपलीं बोटं मोकळीं करायच्या नादाला लागला. पण कमळीची पकड अधिकच घट्ट झाली अन् ती म्हणाली " मला भीति वाटते ना— "

दुसऱ्या दिवशीं खूप उशिरा उठल्यावर मेळ्यात काय पाहिलं याची आत्त्याबाईनीं कसून चौकशी केली अन् सारं देवाधर्माचं होतं हें ऐकून त्यांना समाधान वाटलं. त्याचा फायदा घेऊन कमळीन लगेच विचारलं, " आत्या – आज पण जाऊं का आम्हीं मेळ्याला—"

" आज पुनः कशाला ? काल पाहिलंस ना एकदा ? "

" अग पण आज दुसरा मेळा बघूं. गणपती पुढच्या मेळ्यात सारं देवाचंच असतं – छान छान आख्यानं कीर्तनासारखीच— "

" आज मी नाहीं बुवा येणार – " रघून सागून टाकलं–

" का रे ? जानात का देवाचंच असलं तर – मीसुद्धां येईन—"

" अहं – रोज जाग्रणं करून अभ्यास बुडतो. उशिरा उठल्यावर मग सारा दिवस आळसांत जातो – अन् आत्याबाई, काल कमल भ्याली वाटेंत."

" होय ग कमळे ? – अन् मला सांगितलं सुद्धां नाहींस ? तरी मी म्हणत होतें एवढ्या न्हात्याधुत्या पोरींनीं रात्रीं – अपरात्रीं एकटं हिंडणं बरं नव्हे. "

" पण मी कुठं एकटी गेलें होतें काल ? "

" तरीसुद्धां भ्यालीस ना ? कांहीं नको जायला— "

" अग पण ठेंच लागली म्हणून "

" म्हणून काय झालं ? नुसतीच ठेंच असली म्हणजे बरं ! कुठं वाटेंत कांहीं असलं बिसलं तर. परकं गांव – आपल्याला नाहीं ठाऊक. " राम " " राम " तरी म्हणालीस का तोंडानं ? – आधीं मला लिंबू उतरून टाकूं दे— "

" अग मी नाहीं म्हटलं तरी रघू रामाचीच कविता म्हणत होता – अन् रस्त्याला कसली आलीत भुतं–बितं. रोज तर आम्ही तिथनं शाळेंत जातो."

" तुझं शाळेंतलं शहाणपण राहू दे – कांहीं नको जायला ! "

" आमचं आपलं सदा असंच ! " कमळीनं आत्याबाईंच्याकडे पाठ फिरवून रघूकडे विचित्र नजरेनं पाहिलं.

× × ×

कमळीच्या नजरेनं रघू घरांत गडबडून गेला होता. खरं म्हणजे इनामदाराच्या वाड्यात पूजा करताना आत्याबाईंनीं जीं मुक्ताफळं उधळलीं होतीं, आणि त्यावेळच्या तिरमिरींत तो आत्याबाईंना जें काहीं बोलून दाखवणार होता त्याच्या संदर्भात वास्तविक त्याला कमळीच्या पुढच्या पावलानं बरं वाटायला हवं होतं. भटाच्या पोराबद्दल इनामदारांच्या मुलीला वाटूं लागलेली आपुलकी ही त्याला संधि वाटायला हवी होती – पण रघूच्या वागण्यांत ही दृष्टीच नव्हती त्याला इनामदाराकडून होणारी अवहेलना नको होती, त्याची बरोबरी करावयाची होती पण ती बरोबरी प्रत्यक्ष व्यक्त होण्याचा संभव आंख तो गडबडला, त्याच्या न्यूनगंडानं त्याला गोगलगायीसारखं अंग डूयताचन घ्यायची संवयच झाली होती. आणि या संवयीनं त्याला अगदीं सामान्य बाबीसुद्धा असामान्य अडचणीच्या वाटायच्या. त्याच्या शाळेचंच पहा ना वास्तविक हायस्कुलातून खळ गॅदरिंग, दर तासाला बदलणारे शिक्षक या अगदीं सामान्य बाबी – पण त्याचंसुद्धां रघूला कांहींतरी विशेष, आपल्याला अपरिचित असं वाटायचं !

खेडेगावच्या संवयीप्रमाणं रघूला शाळा म्हणजे अभ्यास करायचं ठिकाण एवढंच वाटायचं. खेडेगांवच्या इतर मुलांनाही शेतीचीं, मजुरीचीं, घरचीं कामं असल्यामुळं शाळेंत अभ्यासाव्यतिरिक्त इतर कांहीं करायचं असतं याची फारशी जाणीव नव्हती. पण पहिल्या नंबराच्या अभिमानानं त्याला सर्वत्र आघाडीवर राहिलं पाहिजे असं नुसतं वाटायचं आणि तें जमायचं नाहीं; याचा जाणीव होऊन तो खंत करायचा. त्यांतून रघूच्या एका मास्तरांची अभ्यासाव्यतिरिक्त इतर गोष्टींची चौकशी करण्याची पद्धति रघूला फारच अडचणीची वाटायची. त्यावेळेला ' ही कटकट कशाला ' असंसुद्धां त्याला व्हायचं.

एका सोमवारीं रघूच्या त्या साने मास्तरांनीं इंग्रजीच्या तासाला पुस्तक टेबलावर ठेवून एकदम दुसराच विषय काढला. आदल्या दिवशीं वाडीच्या टीमबरोबर झालेल्या क्रिकेटच्या सामन्याच्या गप्पा सुरू करण्यांत आल्या—

" काय घाटे, काय खेळलास काल ! हायस्कुलचं नांव घालवलंस. "

" नाहीं सर – माझी जागा स्पिलची. मला उगीच लॉंगला ठेवलं पळाय-साठीं – म्हणून कॅच सुटला. "

" लॉंगला ठेवलं म्हणून कॅच सुटला – अन् बॅटिंग करतांना ? "

" खोटा एल्. बी. डब्ल्यू दिला अंपायरनं. "

" कशावरनं ? तुला संवय आहे पाय मधें घालून चेंडू अडवायची."

" पण काल मी मधें पाय घातला नव्हता सर – वाटेल त्याला विचारा "

" बघ हं – हरशील !—"

" मुळींच नाहीं – वाटेल त्याला विचारा—"

" काय रे जोशी – काल घाट्यानं मधें पाय घातला होता कीं नाहीं ? "

—रघू गडबडला. आवंढा गिळीत त्यान सांगितलं "मला ठाऊक नाहीं—मी काल मॅचला आलों नव्हतों. "

" मॅचला आला नव्हतास ? मग काय करीत होतास ? गजगे खेळत होतास?"

सारा वर्ग हशानं दुमदुमून गेला. रघूनं आपण अभ्यास करीत होतों, आपल्याला क्रिकेटमधल काहीं कळत नाहीं हें सांगण्याचा प्रयत्न केला. तेव्हा त्याची आणखी टिंगल सुरू झाली. नुसत्या पुस्तकी शिक्षणानं भागणार नाहीं हें पटविण्यासाठीं सान्याचे साऱ्या हायस्कुलला तोंडपाठ असलेले चुटके म्हणून झाले. त्या चुटक्यातल्या थट्टेचा विषय रघू जोशी झाला अन् त्याला ती थट्टा लागली. सान्याच्याविषयीं त्याच्या मनात अढी – नव्हे भीति घर करून राहिली—

तरी त्याला बाहेरचं जग पहायची इच्छा झाल्याशिवाय राहिली नाहीं. कालांतरानं रघूचा साने मास्तरांच्याविषयींचा ग्रहहि बदलला. त्यांनीं प्रसंगानं रघूची कितीहि रेवडी उडवली असली तरी आपल्या शाळेंत नांव काढणारा हा विद्यार्थी त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणांतून निसटला नव्हता. त्याला अधिकाधिक

घडवून साकार करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. त्यांच्याभोंवतीं, वर्गांतून बाहेर पडतांना नहमीं पाच-पंचवीस विद्यार्थ्यांचा घोळका असायचा. मॅट्रिकच्या वर्गांतून असेच एकदा बाहर पडल्यावर साने मास्तर रघूची निबंधाची वही मुलांना दाखवीत सांगत होते, " पहा – पहा, हे पांचवींतल्या मुलाचं अक्षर आणि इंग्रजी. तुम्ही अजून कुत्र्या-मांजराचे पाय काढता आणि ' ए ' कुठ घालायचं अन् ' दि ' कुठं, हें सागावं लागतं – एक दिवस त्याच्या निबंधाची कॉपी करायला सांगणार आहे मी सगळ्या मॅट्रिकच्या वर्गाला—"

—पण ही साने मास्तरांची सहानुभूति रघूला फार उशीरां कळली. त्याच्या आधीं परीटघडीचा शर्ट–कोट आणि ऐटबाज टोपी घालून रुबाबांत वावरणाऱ्या सान्यांच्यापेक्षां कळकटलेलं धोतर, विटलेला लांब, बंद गळ्याचा कोट आणि चिरफळ्या गेलेला रुमाल सांवरीत येणारे फाटक गुरुजी त्याला आवडायचे. फाटक रघूच्या वर्गाला मराठी शिकवायचे. त्यांचा मूळचा विषय गणित; पण मराठी हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय असतो याचा शोध अनेक शाळातून लागलेला नसतो. गणित, भूगोल इतकच काय, पण ड्रॉइंग–तालीम यांच्या शिक्षकांच्या शिलकी तासात मराठीला बसवायचं. या जमान्यांत फाटकांच्या माथीं रघूच्या वर्गाचं मराठी आल होतं. ते सरळ रघूला पुस्तक वाचायला सांगत – कुणी ' समजलं नाहीं ' म्हटलं तर आपण एकदा वाचून दाखवीत – पण तें गद्याचा धडा असेल तेव्हाच. पद्याचा सारा भार रघूवर पडायचा. [illegible] केकावलींतला उतारा तर रघूच्या कायमच्या आठवणींतला होऊन बसला—

" अजामिळ, अघासुर, व्रजवधू बकी पिंगळा
अशा गति दिली उरे तृण न भेटतां इंगळा. "

या पंक्तीशीं रघूदेखील अडखळला होता. बाकीच्या मुलांनीं अर्थाच्या नादीं लागण्यापेक्षां शेवटच्या ' इंगळा ' शब्दावरनं ' इंगळे ' नावाच्या मुलावरून बाकं बडवण्यांत वेळ काढला. रघू कोरगांवकरबुवांच्या कीर्तनांतली सारी शिदोरी विस्कटीत होता. अन् त्याची आठवण पुरती काम करूं लागेपर्यंत फाटक गुरुजी उपरण्यानं कपाळावरचा घाम पुशीत केव्हां एकदाचा तास संपतो याची वाट पहात होते.

खरं म्हणजे असल्या लहान सहान प्रसंगांची आठवण रघूला राहू नये. त्यानं वाचलेल्या कोणत्याही मोठ्या माणसाच्या चरित्रात असली हकीकत आली नव्हती. कदाचित् या क्षुल्लक प्रसंगाच्या स्मरणातच रघूचा सामान्यपणा साठवलेला असेल. त्याची उजळणी तो कधीं कधीं करायचा तेव्हां त्याची खूप थट्टा व्हायची. पण रघूचा आपला तिसराच पथ. तो या थट्टा करणाऱ्यानाही गंभीरपणे सांगायचा— "तुम्हाला नाहींच पटायचं. पण त्याचं कारण मी नव्हे. तुम्हाला कोणत्याही गोष्टीकडे पोटतिडकीनं अन् गंभीरपणें पहायची संवयच नाहीं. थट्टा करतां, हसता त्या वेळीं सुद्धा तुम्ही मनापासून थट्टा करता, हसता, कीं नाहीं हें तुमचं तुम्हालाच सांगता येणार नाहीं आमच्या बापूची तऱ्हा! मोठ्या ऐटीनं क्रिकेट खेळायला निघाला— पण काय केलं त्यान ? – पहिला चेंडू शिवण धरून जोरात फेकायचा, दुसऱ्या खेपेला बोटं वेडींवाकडीं फिरवून ब्रेक पडतोय् कीं नाहीं तें पहायचा अन् पाच मिनिटानी पॅड् बांधून विकेट-कीपिंगचा ढंग करायला लागायचा— अशा वृत्तीनं भरलेल्याच्या समुदायात कसलीही पोटतिडीक असणारा मनुष्य विक्षिप्त ठरायचाच. मला त्याचं काहीं वाटत नाहीं आता — "

पण त्याच्या या विक्षिप्तपणाचा उद्धार त्याच्या आवडत्या फाटक गुरुजींनीं सुद्धा केला होता. केकावलीच्या 'त्या' ओळींचं स्पष्टीकरण परीक्षेच्या पेपरात लिहिताना रघून सबंधच्या सबंध पिंगळा नायकिणीची कथा उतरली होती. तिच्याबद्दल फाटकांनीं रघूला चांगलंच सुनावलं होतं. एकतर रघूला सारासार विचार नव्हता. त्यान चार मार्कांसाठी आठ ओळी लिहायच्या सोडून उगीचच इतका मजकूर भरकटला होता. नुसता वेळेचा अपव्यय आणि त्यातून शाळेतल्या मुलानं, पिंगळा असली म्हणून काय झालं, नायकिणीची गोष्ट लिहिणं हा तर अक्षम्य अपराध होता.

× × ×

मॅट्रिकच्या आदल्या वर्षी रघूला कांतिलाल नांवाचा नवा स्नेही अचानक मिळाला. कांतिलाल नापास झाला होता अन् त्याचं उट्टं त्याला काढायचं होतं. प्रत्येक विषयाची मिळतील तितकीं गाइड्स् अन् नोट्स विकत घेणं, चार प्रमुख विषयांच्या शिकवण्या ठेवणं, स्वतःचा ऐसपैस बंगला असतांना बोर्डिंगांत

अभ्यासासाठीं स्वतंत्र खोली घेणं – असा विस्तृत आराखडा आखून कांतिलाल अभ्यासासाठीं हुशार जोडीदार शोधीत होता. त्यानं रघूला हेरलं. किरकोळ मदतींत आपली निदान पुस्तकांची अडचण मिटते आहे हें पाहून रघूनं त्याच्याबरोबर अभ्यास करायचं कबूल केलं.

नुसतीं वाचायला पुस्तकं मिळतील ही रघूची कल्पना खोटी ठरली. नव्या वर्षाबरोबर नवीं पुस्तकं हा कांतिलालचा सोपा हिशेब असल्यानं त्यानं सारीं जुनीं पुस्तकं रघूला बक्षीस देऊन टाकलीं. त्याच्या नोट्स उतरून घ्यायला सोपं पडावं म्हणून डझनभर नोटबुकं 'जादा' विकत घेऊन दिलीं. रघू या औदार्यानं पार थक्क झाला. कांतिलालच्या खेळत्या व्यापारी वैभवानं बापू इनामदाराची साठवणीची श्रीमंती पार फिकी पडली. चार दिवस अभ्यास केल्यावर पांचव्या दिवशीं कांतिलालला कंटाळा आला अन् त्यानं रघूला ओढून आपल्याबरोबर सिनेमाला नेलं.

आजपर्यंत रघून इनामदारांच्या मंडळींबरोबर दोन-चार खेळ पाहिले होते. पण ते सारे धार्मिक आणि तीन आण्यांच्या पिटाच्या जागेंत बसून. आज कांतिलालनं त्याला नेलं तें एकदम गादीच्या खुर्चीवर. बारा-बारा आण्यांचीं तिकिटं काढून – धमाल हाणामारीचा 'प्यारी मोहब्बत' हा फियरलेस माधुरीचा चित्रपट पहायला. हाणामारीच्या प्रसंगाच्या वेळीं कांतिलाल मुठी वळून 'वार ! पठ्ठे !' म्हणून शाबासकी देत होता. नटीच्या अंगोपांगाच्या दर्शनाचा प्रसंग आला कीं मुद्दाम पुढें वाकत 'मस्त,' 'चक्क' असं कांहीं उच्चारीत होता. नाचणाऱ्या बाईनं हीरोच्या दोस्ताला डोळे मारीत गिरका घेतली अन् ओठाचा चंबू करीत ती त्याला बिलगली तेव्हा कांतिलालनं स्वतःच्या हातांनीं आपलीच छाती घट्ट आवळून धरली. एकदम दिवे लागले तेव्हा जणूं आपल्या आलिंगनात खरोखर असलेली नटी निसटून गेली इतक्या कळवळ्यानं कांतिलाल रघूला म्हणाला "साले, ऐन वेळेला लाईट पाडून पिक्चर संपवतात—"

रघूनं त्या रात्रीं कांतिलालच्या खोलींत बोर्डिंगांतच झोंपायचं असं अगोदर ठरलेलं होतं. रस्त्याच्या वळणावर येतांच कांतिलालनं खोलीची किल्ली रघूच्या हातांत टाकून सायकल बंगल्याकडे वळवण्याची तयारी केली, तेव्हा

रघूला हा असं कां करतो तें कळेना. शेवटीं कांतिलालनं या अजागळ किंवा वेड पांघरणाऱ्या स्कॉलरची समजूत पटविली. 'असला मस्त चित्रपट पाहिल्यावर बोर्डिंगातल्या ब्रह्मचारी खोलींत झोंप येणं शक्य नसतं जोशीबुवा. आज मी बंगल्यांत जाणार. माझी बायको वाट पहात असेल — '

रघूला कातिलाल हें एक नवं कोडं वाटलं. कातिलालनं आपल्या आयुष्यातले वाटेल ते तपशील रघूला चार दिवसांत ऐकवले होते, पण त्यांत लग्न झाल्याची वार्ता नव्हती — उलट ही शंकासुद्धां येऊं नये अशा रीतीनं तो शाळेंत वागायचा. मुलींच्या बाकावर 'ओ मिस्, गिव्ह मी अ किस्' या चालीची वाक्यं लिहिण्यात त्याचा हातखंडा होता. खोलींत त्यानं खास दोस्ताकारिता म्हणून आपलं फ्रेंच फोटोंचं पाकीटही उघडून दाखविलं होतं — लग्न झाल्यामुळं या मुलाची वृत्ति अशी झाली असेल का ? — रघूला शंका आली. मनांत तुलना होऊं लागली. रघूच्या खातीं कातिलाल आणि बापू दोघेहि श्रीमंतच. पण बापूचा ढंगसुद्धा कातिलालच्या पुढं फिका पडला. यमू बापटवर मनोमन एकतर्फी 'प्रेम' करणारा बापू, खुषींत असला म्हणजे रघूला शंका विचारायचा "पण ती पडली कोकणस्थ अन् मी देशस्थ — हें कसं जुळायचं रे ? असली वेडगळ शंका कातिलालनं कधींच उच्चारली नसती.

—कांतिलालच्या या साऱ्या लफड्यांतून त्याच्या बरोबर अभ्यास करणं हें एक दिव्य होतं. त्यातून त्याला मागच्या दोन वर्षांतल्या गोष्टी समजावून द्याव्या लागायच्या. त्यातूनही वेळ काढून थोडा स्वतःचा म्हणून अभ्यास करायचा बेत रघूनं केला, कीं पैशाचा चहापाण्याचा हात थोडा आणखी सैल सोडून रघूला 'दोस्ताखातर' बरोबरीनं अभ्यास करायचा आग्रह — हट्ट कांतिलालनं धरायचा अन् उपकाराच्या ओझ्याची जाणीव असलेला रघू त्या हट्टाला बळी पडायचा—

याचा परिणाम व्हायचा तोच झाला. सहामाहींत रघूचा नंबर तिसरा गेला अन् त्याची स्कॉलरशिप गेली. अन् पुढारलेल्या जातिबाहेरचा, सर्व विषयांत पास होणारा एकमेव विद्यार्थी म्हणून कांतिलालला राखीव स्कॉलरशिप मिळाली. रघूला धक्का बसला. बंगल्यांत रहाणाऱ्या कातिलालची जन्मजात आणि भिक्षांदेही करणाऱ्या रघूची जन्म-जात याचा प्रत्यक्ष परिस्थितीशीं

कसलाच मेळ नव्हता हें डोळे उघडे असणाऱ्या कुणालाही समजलं असतं— समजावं ही रघूची अपेक्षा होती. पण त्याच्या आवडत्या साने मास्तरांनी- सुद्धा त्याला ' तुझं बरोबर आहे. ' असं म्हटलं नाहीं. ' चुकल कुठें ' तेंहि त्याना सांगतां येईना. त्यानीं सगळा प्रकार थट्टेवारी नेऊन फुंकर घालण्याचा प्रयत्न केला. स्कॉलरशिप गेली तर नादारी मिळेल हा दिलासा – पण तो जखमेवरच्या मिठासारखा झोंबणारा अन् शेवटीं, " गो, एन्जॉय युवर दिवाळी " म्हणून त्याला जवळजवळ या विषयात पुनः बोलूं नको असंच सुचवलं—

" गंमती कर – गो – एंजॉय् " हे साने मास्तराचे शब्द खिन्नपणें घोळवीत रघू आपल्या गांवीं आला. चार वाजायची वेळ. कृष्णंभटजी हमखास इनाम- दारांच्या इथल्या बिजिकच्या अड्ड्यांत रंगलेले असणार तेव्हां फारा दिवसांनीं आपण आईशीं मनमुराद बोलूं, आपल मन उघडं करू, असा बेत रघू आखीत होता. दाराशीं त्याचं पाऊल वाजलं आणि ' कोण आहे ? ' म्हणून कृष्णंभटजींचा करड्या सुरातला प्रश्न त्यानं ऐकला. रघू चरकला. हातपाय स्वच्छ धुवून तो आला तेवढ्यात कृष्णंभटजी पुनः कडाडले – " परीक्षा होऊन इतके दिवस झाले – काय दिवे लावीत होतात मागं राहून ? शहरांत खुशाल उंडगायची संवय झाली असेल. पाठीमागं कांहीं घरची काळजी ? इकडं आईबाप जिवंत आहेत कीं— "

" आताच आलाय ना तो – त्याला काय ठाऊक इकडचं ? नाहीतर मुळींच राहिला नसता – असेल कांहींतरी शाळेचंच, म्हणून राहिला असेल चार दिवस. " क्षीण स्वरांत रखमाबाईचा आवाज आला.

" तर तर, साऱ्या परीक्षा आवरल्यावर मुद्दाम याच्यासाठीं कामं काढलीं असतील शाळेनं – कीं रंगरंगोटीच्या कामावर देखरेख करण्यासाठीं मुकादम नेमलं होतं तुमच्या चिरंजीवांना—? "

" आई, कुठं आहेस तूं ?—काय होतंय तुला ? "

" वा ! फार लवकर आठवण झाली मातोश्रींची. हो ! – फारच लवकर. कृष्णाबाईवर पोंचायच्या आत—"

" दादा — " रघू एकदम ओरडला. असा ओरडला कीं, रघू नसून

दुसराच कोणी तर घरात शिरला नाहीं ना असं वाटावं. त्याच्या त्या विचित्र ओरडण्यानं कृष्णंभटजीसुद्धा एकदम गप्प झाले.

" ये बाळ रघू, दमला असशील – बैस इथं माझ्याजवळ – उन्हातनं आलास त्यानं दिसत नसेल. इथं आहे मी कोपऱ्यात—"

चांचपडत रघू अंधाऱ्या माजघरातल्या शेवटच्या खांबापाशीं पोंचला. त्याच्या शेजारीं अंथरुणावर रखमाबाई पडली होती. रघूनं तिच्या अंगाला हात लावला अन् ' काय हा ताप ' म्हणून चटकन् मागं घेतला. रखमाबाईच्या जवळ रघू गेला तेव्हाच कृष्णंभटजींनीं माजघरातलं आपलं पाऊल बाहेर काढलं. " मी आता बाहेर जाऊन येतों " एवढंच त्यानीं सोपा उतरताना हवेंत सांगून टाकलं. थोडा वेळ रघू तिथं सुन्न बसून होता. आपलं मन उघडं करायचं बाजूलाच राहिलं – आता हे सगळं टीक होईपर्यंत शिवपुराची आठवणही येऊन उपयोगी नाही हें त्यानं ओळखलं. आपला अशक्त हात त्याच्या पाठीवरून फिरवीत रखमाबाई म्हणाली, " तू दमून आलास, पण तुलाच सांगायचं आलं – शिंक्यावर लाह्याची पुरचुंडी आहे, त्यांतल्या लाह्या घेऊन खा आणि थोडासा चहा कर – तुझ्य बरोबर मीही घेईन. " चहा पितां पिता रघूनं विचारल, " आई किती दिवसापास्नं ग ताप येतोय ? मला पत्र पाठवून कळवलं कां नाहीं ? —मी आलों असतों ताबडतोब. "

" अरे, त्यांत काय कळवायचं ? तुला उगीच काळजी कशाला ! तुझी परीक्षा आहे म्हणून पत्र आलं तेव्हां नुसती कणकणी येत होती. ऐन परीक्षेच्या वेळेला माझं अंथरुण पडलं. असेल मेला साधाच. होईल बरा – त्यांत काय आहे ? "

" असं कांहीं तरी सांगू नकोस आई – माझ्या परीक्षेच्या आधीपासनं म्हणजे चांगले बारा–तेरा दिवस झाले कीं, औषध तरी कुणाचं देताहेत ना ? आणला होता का डॉक्टर ? "

" एवढ्याशा दुखण्याला डॉक्टर रे कशाला ? अन् त्याची आणखी उसाभर कोणी करायची ? आठ दिवस घरांतनं बाहेर पडायलासुद्धां झालं नाहीं – काय जेवणापुरतं वाड्यांत जायचं तेवढंच—"

" म्हणून आतां मी आल्याबरोबर गेले वाटतं ? अन् तेवढ्यासाठीं माझ्यावर राग. पण तूं इतकी आजारी असतांना औषधाची काहींसुद्धा चौकशी नाहीं ना ! असंच आहे—"

" अरे असं काय बोलतोस. उतरेल आता ताप – तूं आल्याबरोबर मला हुशारी वाटायला लागली बघ. पड थोडा वेळ. दमचा असशील— "

" मी पडेन संध्याकाळीं. मला काय झालंय ? आधी तुझ्या औषधाचं काय तें सांग – काहींच कां घतलं नाहींस अजूनपर्यंत ?— "

" अरे नाहीं कस ? – बापूच्या आईन मात्रा दिली दोन दिवस. त्यानं काहीं उतार पडेना, तसा कासाराकडचा काढा आणलाय आज चार दिवस— "

" त्याला काय औषध म्हणायचं ? – तो कासार सगळ्या तापावर आपला एकच काढा देतो. बरं, त्यानं काही गुण पडता तर गोष्ट निराळी. पण ह्याना सगळं बिनपैशाचं अन् बसल्या बैठकीला हवंय ना ? तें काहीं नाहीं. मी जातों उद्या सकाळीं अन् घेऊन येतों डॉक्टर—"

" रघू, बाळ, माझ्याजवळ बोललास तेवढं पुरे. ह्याच्याजवळ असलं काही तरी म्हणशील अन् उगीच बोलणीं खाशील. ह्याची नाहीं श्रद्धा त्या डॉक्टरा–फिक्टरावर. उगीच काय करायचं खर्चात पडून—"

" डॉक्टर नको असला तर निदान चागला वैद्य तरी आणायला हवाच. हवा तर वैद्य आणीन; पण मी उद्या जाणारच—"

" बघू उद्यांचं उद्या – आता आधीं दमून आलायस्, त्यात आणखी डोक्याला त्रास करून घेऊ नकोस अन् त्यानाही आठ-दहा दिवस माझं सारं करावं लागलं – त्यानं चिडचिडे झालेत. उगीच आजच्या आज आणखी भर घालूं नकोस—"

दुसऱ्या दिवशीं रघूला डॉक्टर आणायला जायचं जमलं नाहीं. एक तर तो उठलाच थोडासा उशीरान. आणि त्याचीं नित्यकर्म आवरायच्या आत कृष्णंभटजींचा पाय बाहेर पडला. रघू कसंबसं जेवण उरकून रखमाबाईच्या जवळ येऊन बसला. तिच्या तापांत उतार न पडता उलट तलखली वाढली होती. रघूनं आरोग्यशास्त्राच्या सामान्य शालेय ज्ञानावरनं अनुमान काढलं होतं कीं

हा ताप कांहीं साधा नाही बहुशः दोषी ताप — टॉयफाइड असावा. त्याबद्दल हयगय करून भागणार नाहीं. त्याला असं वाटायला लागलं तसा त्याला आपल्या वडिलाच्या एकंदर बेपर्वाईबद्दल आणि आपण आल्यापासून बाहेरबाहेर रहाण्याच्या वृत्तीबद्दल मनोमन अतिशय संताप आला. पण आईला त्रास व्हायला नको म्हणून, धडा करून सौम्यपणानं आपलं म्हणणं त्यानं कृष्णंभटजींच्या कानावर घातलं. भटजींनीं नेहमींच्या पद्धतीनं त्याला शहरात राहून 'शिंग फुटल्याचा' खुलासा केला आणि वर 'उठल्या बसल्या डॉक्टर आणायला कुबेराचा खजिना घरात येऊन पडला नाहीं' हेंही ऐकवलं. रघूनं आपल्या परीनं काळजी घेतली होती तरीही कृष्णंभटजींची वाणी रखमाबाईच्या कानांवर आदळून तिच्या काळजाला भिडली. तिनं एक वेळ रघूला गप्प बसायला सांगितलं; पण एवींतेवीं आईला सारं कांही कळलंच हे समजल्यावर रघूही हट्टाला पेटला. "तुम्ही पाहिजे तर माझ दरमहाचे पाच रुपये बंद करा — पण या वेळीं मी डॉक्टरला घेऊन येणारच —" त्यानं वडलाना निक्षून सांगितलं. कृष्णंभट रागानं बाहेर पडले. रघू ओटीवर फेऱ्या घालूं लागला—

त्या रात्रीं रखमाबाईच्या अंगाची तगमग होऊ लागली. रघून घाबरून कृष्णंभटजींना जागं केलं. त्याना काय वाटलं कुणास ठाऊक? — रात्रीं बारा वाजतां पाय धुवून कृष्णंभटजी हातात राखेची चिमूट घेऊन देवापुढं बसले. अर्ध्या तासानं त्यानी तो अंगारा रघूच्या हातीं रखमाबाईच्या कपाळाला लावला. पहाटें पहाटें मायलेकरांना थोडीशी झोंप लागली. सकाळीं उठल्याबरोबर रघू कांहीं न बोलता कपडे करून तयार झाला. आणि त्यानं दारांतनं बाहेर पडतांना 'डॉक्टरला घेऊन येतों' एवढंच वडलांना सांगितलं

संध्याकाळीं डॉक्टरानीं टॉयफाइडचं निदान पक्कं करून इंजेक्शन दिलं. रघूनं त्याच पावली आणखी एक फेरी करून औषधं आणि मोसंबी आणलीं. जाता-येताच्या दोन खेपात मिळून चाळीस मैलांची सायकलची रपेट होऊनही रघूला दमल्यासारखं मुळीच वाटलं नाहीं. रात्री मात्र दोन घास पोटांत जातांच तो मरगळून पडला.

चार दिवस डॉक्टरी औषधाचे सगळे सोहाळे झाले. त्यात कृष्णंभटजींनीं कांहीं लक्ष घातलं नाहीं. आणि होय—नको काहींच बोलले नाहींत. औषधाच्या बाटलीबरोबर मोसंबीं—मनुका बघितल्यावर त्यांनीं चूपचाप गरगरा डोळे

फिरवले आणि रघूच्या माघारी ' श्रीमंती चोचले आले ', ' खर्च वाढला ' असले रखमाबाईला ऐकूं जातील असे शब्द पुटपुटूं लागले.

इनामदारांच्या अड्डयांत गेल्यावर बापूच्या आईनं रखमाबाईची चौकशी केली तेव्हां " आतां चिरंजीव आलेत, कर्ते झालेत, सगळं काहीं करताहेत, आम्ही खेडवळ ठरलोंय् " असं कांहीं तरी तिरसटपणें सांगितल्याचं रघूला पुढं खूप दिवसांनीं कमळीकडून समजलं.

—पण त्या वेळीं चार-सहा दिवस औषध घेऊनसुद्धा रखमाबाईच्या दुखण्याचा काहीं मागला कटा दिसेना. एकवीस दिवसाची मुदत वाढून बेचाळीस दिवसावर जाते कीं काय अशी शंका येऊं लागली. रखमाबाई अगदीं निपचीत पडून होती. रघूच्या तोंडचं पाणी पळालं. त्यान आपला हेका गुंडाळून वडलाना कळवळून विचारलं, " दादा, आतां कसं करायचं ?— अजून आईचा ताप उतरत नाहीं—-" कृष्णंभटांनीं त्याला उत्तर दिलं नाहीं. पण पायांतला जाडा काढला आणि अड्डयांत जायचा बेत रद्द केला. त्यांच्या बोलण्यात नसली तरी वागण्यात सहज दिसेल अशी चलबिचल झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यानी स्वतःच पूजेची सारी तयारी करून देवाला अभिषेक केला. संध्याकाळपर्यंत उतार पडलेला दिसेना, तेव्हां ते बाहेर गेले अन् परत आले ते कसलीशी पुडी घेऊन — ती पुडी त्यानीं रघूला मधांतून रखमाबाईला चाटवायला सांगितलं.

दोन तासांनीं रखमाबाईनं रघूला हांक मारली. आईच्या हांकेनं रघू खुलून चटकन् उठला. आईला घाम आलाय् हें कळल्यावर त्याला आणखी बरं वाटलं. कृष्णंभटजी शेजारीं येऊन उभे राहिले. रघू उत्साहानं घाम पुसूं लागला. एक — दोन — तीन करतां करतां पाठीखालच धोतर, पांघरूण, अंगावरचे सारे कपडे चिंब होऊन गेले. घरांतले होते तेवढे पंचे — धडपे पिळून काढले तरी घाम हटेना. रखमाबाई पुनः चिप्प पडल्या. घाम आल्यामुळं झोंप लागली असेल असं एकदा वाटलं. पण तोंडावरची कळा बदलूं लागली. रघूला काय होतंय तें समजेना. कृष्णंभटजी घाबरून गेले. घामाला खळ म्हणून पडेना. रात्रीच्या वेळीं जायचं तरी कुठं ?

अखेरीं भटजींनीं गांवांतला टाणाटोणा वैद्यकी करणारा कासार आणि बापूची आई यांना घेऊन यायला रघूला पिटाळला; आणि तिथंच पाट घेऊन

ते माळेचे मणी ओढूं लागले. कासाराशीं झालेल्या बोलण्यावरनं रघूला कळल कीं, ' घाम येण्यासाठीं ' म्हणून एक खास पुडी गांवातला शिकलगार देतो याची माहिती मिळवून भटजींनीं ती पुडी रखमाबाईला घाम येण्यासाठीं दिली होती आणि तिचा परिणाम असा विपरीत झाला होता. बापूच्या आईनं अखेरीचा उपाय म्हणून रखमाबाईच्या डोळ्यात अंजन घालून पाहिलं आणि पळीनं दांतखीळ उघडून सूतशेखराची मात्रा चोळतां येईल तितकी जिभेला चोळली. त्या वेदनेनं रखमाबाईच्या तोंडून आवाज निघाला— त्यानं साऱ्याना बरं वाटलं.

—त्यानंतर रखमाबाईला शुद्ध आली नाहीं. पहाटेच्या सुमाराला भिंतीला टेकून बसल्या बसल्या न कळत रघूचा डोळा लागला होता. त्याला काहीं विचित्र स्वप्न पडायला सुरुवात झाली. सानेमास्तराशीं तो वाद करीत होता. विचित्र विषय होता – काय होता तें रघूच्या ध्यानात आलं नाहीं— त्यांत आपली आई कशाला आली ? गलका कोण करतंय ? – कुणीतरी त्याच्या खांद्याला धरून हळूंच हलवलं – जागा झाल्यावर निमूटपणें सदऱ्याच्या बाहीला डोळे पुसून तो ' पुढच्या तयारींत ' सामील झाला—



## : ३ :

" आज जेवणं झाल्यावर गणपतीच्या बागेंत फिरायला जायची आठवण आहे ना ? " कमळीनं स्वयंपाकघराच्या दाराशी उभं राहून म्हटलं—

" अं ? काय ? मला कांहीं म्हणालीस ? "

" छान ! दुसरं कुणी आहे तरी का घरात ? "

" बापू अन् आत्याबाई कुठं गेलींत ?—"

" त्याचासुद्धा पत्ता नाही का ? बापू गेलाय शिकवणीला चार वाजतांच अन् आत्या उपास सोडायच्या आधीं देवदर्शन करून यायला गेली आहे—"

" अरेच्या ! माझ्या ध्यानांतच आलं नाहीं."

" कसं येईल ?—स्कॉलर लोक ना ! आतापासून आपलं युनिव्हर्सिटीला कळवून ठेवलं पाहिजे — साऱ्या बक्षिसांची अन् स्कॉलरशिपाची पुरचुंडी बांधून ठेवायला — म्हणजे मागाहून त्या बिचारीची धादल व्हायला नको." कमळीनं रघूची खूप थट्टा करण्याचा प्रयत्न केला. पण खरं म्हणजे ती मनांतली भीति लपवायला पहात होती. आईच्या मृत्यूपासून रघूच्या मूळच्या गंभीर आणि आंखडलेल्या वृत्तींत एका तऱ्हेच्या गूढतेची भर पडली होती. तो कोणाशींच धडसा बोलायचा नाहीं. एखादा नाद घेऊन बसला म्हणजे त्याला बाकी कशाची शुद्ध राहायची नाही. वास्तविक ' आई वेगळं पोरं ' म्हणून आत्याबाईसुद्धां त्याच्याकडं पूर्वीइतक्या करडेपणानं पहायच्या नाहींत. बापू परीक्षेला न बसल्यामुळं त्याचा जोडीदार झाला होता अन् सहाजिकच त्यालाही रघूची अभ्यासांत थोडीफार मदत होत होती. कमळीची मूळची माया सतराव्या वर्षाच्या मुग्धतेनं मोहरत होती — पण हें सारं कांहीं आपल्या कक्षेबाहेरचं आहे अशी रघूची वागणूक होत होती. जणूं आईच्या मृत्यूनं त्याचे आपल्या

गांवाशीं असलेले सारे पाश तोडले होते. वरवर सारं पहिल्यासारखं चाललेलं दिसत होतं तरी तें तसं नाही याची निश्चित जाणीव कमळीला होती; आणि तिलाच ती आता विशेष करून टोंचीत होती—

कमळीच्या त्या थट्टेवर रघू नुसता पोकळ हसला होता. त्याला आपण कांहीं उत्तर दिलं पाहिजे असं वाटलं नाहीं कीं त्या थट्टेत गुदगुदल्याही झाल्या नाहींत – तेवढ्यांत आत्याबाई आल्या म्हणून तो विषय आपोआप संपला एवढंच. जेवण झाल्यावर कमळीनं आत्याला सहजीं म्हणून विचारलं,—

" आत्या, आज सोमवार आहे तेव्हा आम्ही बागेत जाऊन येऊं काय ?"

" मी येणार नाहीं हं कमळे. उगीच मला गोवूं नकोस—" बापून आत्याबाई बोलायच्या आत सागून टाकलं—

" तुला कोणी ये म्हटलंय ? संवयच आहे मधें नाक खुपसायची— " कमळीन टोमणा मारला—

" मग विचारलंस कशाला आत्याला आम्ही जाऊं का म्हणून ? "

" पण आम्ही म्हणजे मी अन् तूं असं कोणीं सागितलं तुला—"

" अस्सं – आज जोडीनं बागेंत जाऊन नवस बोलायचा आहे वाटतं— तरीच आज माझी अडचण झाली—"

" बाप्या – तुझ्या जिभेला काहीं हाड ? – जातीय् आपली पोरगी देवाला रघूच्या सोबतीनं तर—" आत्याबाईनीं बापूला चापला.

" आता आम्हीं वाईट झालोंय. यंदा ती दोघं पास झालीं अन् मी आपला परीक्षेला बसलों नाहीं ना—"

" त्याला लोकानीं काय करावं ! "

बापूनं आणखी कांहीं बोलायच्या आंत कमळी घरांतून बाहेर पडली अन् रघूलाही मग बाहेर पडावंच लागलं. गावाच्या बाहेर पडेपर्यंत मागें वळून न पाहता कमळी पुढं चालली होती, अन् रघू जेवण अंगावर आल्यासारखा रेंगाळत हळूहळू चालला होता. ओढ्याच्या पुलावर गेल्यावर कमळी हुश्श करीत कठयावर बसली. रघू तिथं येऊन पोंचला तरी तिनं उठायची कांहीं हालचाल केली नाहीं.

" बाग अजून दीड मैल आहे आणि तिथनं परत घरीं यायचं आहे— याची आठवण आहे ना ? " रघूनं उभ्याउभ्या विचारलं.

" पण मी म्हणतें दीड मैल जा आणि पुनः तितकंच परतून या. " एवढा व्याप हवा कशाला ?

" बागेंत जायचा बेत माझा नव्हता—"

" मग माझा होता तो माझ्या मनासारखाच होऊं दे कीं. बागेचं आपलं निमित्त होतं फिरायला जायला मिळावं म्हणून. इथंच बसू या थोडा वेळ अन् मग जाऊं परत—"

" छान ! म्हणजे माझी चागलीच होईल – आधीं बापूनं काडी लावून दिलीच आहे.—"

" पण सांगतंय कोण घरांत—? "

" वा ! आत्याबाईनीं प्रसाद आणायला पैसे दिले आहेत ना. अन् मी म्हणतों एवढं खोटं कशासाठीं ? "

" त्यात काय झालं – म्हणच आहे ना ऑल इज् फेअर—"

" तें काहीं मला कळत नाहीं. तुला यायचं नसलं तर थांब इथंच. मी येतों ताड् ताड् जाऊन—"

" त्याच्यापेक्षां मी बरोबर नको असं सरळ सांगितलंस तर—"

" असं कधीं मी म्हटलंय ? तुझ्याच मनांत यायचं दिसत नाही—"

" हो. पुनः खापर माझ्यावरच. चालवा आतांपासून हुकमत—"

" तूं काय म्हणतीस तें मला कळत नाहीं — "

" कळेल कशाला ? वेड घेऊन पेडगांवला गेल्यावर—"

" आता मात्र तुझ्या या उखाण्यापुढं हद्द झाली ! म्हणणं तरी काय तुझं ? "

" सगळं रामायण ऐकलं तरी रामाची सीता कोण हें आहेच—"

कमळीशीं वाद करण्यात अर्थ नाहीं असें समजून रघू चालूं लागला. कमळीही त्याच्या बरोबरीनं चालूं लागली. परतून निघेपर्यंत दोघंही कांहीं बोलली नाहींत. पुलाजवळ आल्यावर कमळी रडकुंडीच्या सुरांत म्हणाली; " माझं चुकलं का ? रागवायच नाहीं ईं—"

" हें तूं काय चालवलयंस अलीकडं ? माझ्याशीं बोलतांना अधांत्री हवेंत बोलल्यासारखी काय बोलतेस – तुझ्या मनांत तरी काय आहे ? कमल— तुझ्या बोलण्यानं मला गुदमरल्यासारखं होतं—"

" याच्यापेक्षा उघड मला कसं अन् किती सागतां येईल ? – पण मला वाटलं—"

रंघू अधिकच गुदमरला. त्याला कमळीचं म्हणणं कळलं नव्हतं म्हणून नव्हे तर तिला स्पष्ट बोलायला सागून आपली सुटका करून घेता येईल असं वाटत होत तें साधलं नाही म्हणून. आता हा वाढता कुंटपणा नको या विचारानं त्यानं निराळा मार्ग स्वीकारला आणि तो कमळीकडं रोखून पहात तिला म्हणाला—

" कमल, मला तुझं आश्चर्य वाटतं. शाळेंतला अभ्यास करीत आनंदात दिवस काढायचे सोडून तूं असले विचार डोक्यांत का आणावेस ? तुला आठवतं ? – बापूनं आपल्या वहींत यमू बापटचं चित्र काढलं ती ' गंमत ' मला दाखवताना तूं किती सरळ आणि शुद्ध होतीस ? तो सरळपणा आणि मोकळेपणा सोडून तूंही असल्या फदांत पडशील असं मला वाटलं नव्हतं. या वयांत लग्न–प्रेमाचे विचार, हे चाळे कशाला करायला हवेत ? तूं सुद्धां अशी बापूसारखी पोखरून जाशील अशी कल्पना तरी आली असती का कुणाला ? "

" हीच ना माझी किंमत ? मी सुद्धा बापूसारखी पोखरून गेलेली ठरलें ना ! बापूनं यमू बापटचं चित्र काढलं तेव्हा तो केवढा होता अन् आता मी केवढी आहें ? पण मीच वेडी, पोखरलेली— " कमळीनं आपलं रड कसबस आवरून धरल होत.

" रागाऊं नकोस कमल. तुला पोखरलेली म्हटल तें लागटपणें – तुला दुखवाव म्हणून नाहीं. तो शब्द तूं मनावर घेऊ नकोस. पण तू माझा विचार करीत नाहींस – तुमच्या घरीं मी आश्रित म्हणून राहिलों आहें. माझ्याबद्दल नुसती शका कोणाच्या मनांत आली तरी माझी स्थिति काय होईल ? बिस्तरा गुंडाळून रस्त्यावर उघडं पडावं लागेल. वर अपवाद येतील ते वेगळेच. आधींच बापूची नजर उणं पहायला टपलेली असते – हें काय तुला ठाऊक नाहीं ? "

" पण – पण, आतांच कोण याची जाहिरात करतंय ? – नुसतं आपण दोघंच असताना मनसुद्धा मोकळं करायचं नाही का ? "

" तेवढं सुद्धां मला झेपणार नाहीं कमल – सुदैवानं तुला माझ्या स्थितीचा अनुभव नाही – तें तुला कळत नाहीं हेंच चागलं— "

—यानंतर दोघंही काही न बोलतां घरीं परतलीं कमळीशीं बोलताना रघूनं असहायता आणि भीति याचा उच्चार केला होता – तो खोटा नव्हता. त्याच्या स्वभावातच, व्यवहारी जगाला हवा असतो तितका, कामा-पुरतासुद्धा खोटेपणा नव्हता. किंबहुना आजच्या कमळीच्या बोलण्यानं त्याचं त्यालाच एक सत्य कळून चुकलं. " उद्या लग्न होईनासं झालं तर तुमची कमळी द्या म्हणतील." अशा अर्थाच्या आत्याबाईच्या प्रहारानं तिरमिरी आलेला रघू आपण कमळीशीं लग्न करण्याच्या योग्यतेचे ठरूं अशी जिद्द एकेकाळीं बाळगून होता. त्या वेळीं फक्त आपला अपमान करणारी इनामदार मंडळी त्याला दिसत होती. जेव्हा जेव्हा तो प्रसंग त्याला आठवायचा तेव्हा तेव्हा त्याच्या डोळ्यांपुढं कांहीं चित्रं तरळायला लागायची. या साऱ्याच चित्राचा एक विशेष असा होता कीं त्यांत त्याला कमळी आपली बायको झाली असून आपण मोठ्या ऐटबाजपणें संसार करतों आहोंत असं त्याला दिसायचं. पण या साऱ्याची सुरुवात कुठं अन् कशी होते याचा मात्र मागमूस नसायचा. पहिलीं पानं फाटून गेलेल्या कादंबरीसारखी ही हकीकत त्याला सुखद वाटायची !

आजच्या प्रसंगानं त्याला नवी जाणीव झाली ती सुरवातीच्या मागमूस नसलेल्या भागाबद्दल ! हा विचार आपण कधींच कसा केला नाहीं याचं त्याला आश्चर्य वाटलं. या वर्षांत कमळीनं त्याची नेहमीपेक्षा अधिक कळकळीनं चौकशी चालवली होती, त्याची प्रत्येक गरज ती आधीं जाणून घेण्याचा प्रयत्न करीत होती; याची जाणीव रघूला नव्हती असं नाहीं. पण त्यानं या साऱ्याचा एकच अर्थ केला होता. गतवर्षीपर्यंत आपण नुसते आश्रित होतों; यंदा आईवेगळं पोर ही आपल्या स्थितींत भर पडली म्हणून – म्हणून हें सारं होतंय. आणि या अनाथ संगोपनाच्या सहानुभूतीनं तो थोडाफार आतुरला होता. कमळीच्या कळकळीचा अर्थ आपण केला त्याहून वेगळा आहे हें कळल्यावर मात्र त्याची

स्थिति विचित्र झाली. व्यवहारतः हें बिंग फुटल तर त्याचं सारं खापर आपल्या माथीं फुटेल ही अस्फुट असलेली भीति आज कमळीशीं बोलतांना सहजीं व्यक्त झाली—

तत्वतः त्यानं स्वत.ला प्रेमाच्या 'चाळ्या'पासून अलिप्त ठेवलं होतं. त्याला कांहीं विशेष प्रयत्न करावा लागला अस नाही. अबूच्या नांवानं झालेल्या थट्टे-पासून त्याच्या मनांत या विषयाची एक तऱ्हेनं अढी बसलेलीच होती. शिव-पुरांत आल्यावर अभ्यासाच्या चाकोरींत स्वतःला जुपून घेतल्यावर त्याला मोकळा वेळ फारसा मिळतच नव्हता. अभ्यामान आपल्याला कांहीं तरी मोठ प्राप्त करून घ्यायचं आहे अशी एक समजूत मनाशीं बाळगून तो एकमार्गी रहाणीनं रहात होता.

कमळीबद्दल किंवा स्त्रीबद्दल त्याच्या मनात विचारच येऊं नयेत अशी विकृति त्याच्यात नव्हती. पण त्या विचारात स्त्रीप्रेमापेक्षां स्वतःच्या स्थितीची उन्नति हा भागच अधिक प्रभावी ठरायचा. कमळीसंबंधींची जुनी जिद्द आठवली तरी तिचं वळण बदललेलं होतं. त्याला कमळी हवीशी वाटली तरी ती तिच्या स्वतःच्या इच्छेखातर नव्हे. बापू—आत्याबाई या इनामदारीच्या अर्कांतल्या मंडळींनीं त्याला कमळीबद्दल विचारलं असतं तर – पण पांच वर्षं इनामदाराच्या घरांत राहून त्याला एवढं कळून चुकलं कीं त्या आढ्या-खालीं राहूनसुद्धा बापूची आई अन् कमळी ही दोन नुसतीं मुकीं जनावरं आहेत – आपल्या ढळढळीत दरिद्री भटकीपेक्षां त्यांची मिळमिळीत इनाम-दारी जास्त भयानक आहे. अशा स्थितींत कमळीनं मन मोकळं करणं याला काय अर्थ होता ? – तिच्या त्या विचित्र स्थितींत रघूला कमळीबद्दल सहानु-भूति, करुणा वाटायची पण तिच्याबद्दलची जिद्द वितळून जायची !—

नाहीं म्हटलं तरी त्या दिवशींच्या कमळीच्या बोलण्यानं रघूला पेंचांत टाकलं होतं. आपल्यासारखीच पिचून जाणारी व्यक्ति म्हणून, तिच्या गोडव्यानं, तिच्या आईपासून चालत आलेल्या मायेच्या वृत्तीनं, रघूचं मन कमळीकडं ओढ घ्यायचं. कशाला उगीच भट—इनामदार, गरीब—श्रीमंत यांच्या वांध्यांत पडावं, आपल्यापुरतं जेवढं जुळेल तेवढं करून टाकावं असा एक विचार यायचा. पण दुसरीकडे बापूचं टोंचून बोलणं, कांतिलालची

स्कॉलरशीप, असल्या गोष्टी आठवल्या कीं त्याला वाटायचं आपण एक माणूस—कुठल्या झाडाचा पाला. कुठंही कसाही झडून गेला, पायदळीं तुडवला तरी त्याची काय चिंता आहे. कशाला स्वतःला नुसतं एक व्यक्ति म्हणून महत्त्व द्यायचं—जेवायचं अन् जगायचं काम काय जनावरं करीत नाहींत— ? त्यांत कसलं स्वारस्य आहे ? — माणुसकीनं आपल्या स्थितीची जाणीव ठेवून तिच्यांतून वर येण्याची धडपड केली तरच आपल्या शिक्षणाला, हुशारीला कांहीं मोल येईल. अशा तऱ्हेनं पेंचांत पडल्यावर रघू हतबुद्ध होऊन जायचा. हें कीं तें, याचा निकाल त्याला करतां यायचा नाही अन् मग त्यातून सुटका करून घ्यायसाठीं — पण याला तो सुटका करून घेणं म्हणायचा मात्र नाहीं— चालू घडीचं आपलं काम फक्त अभ्यास करून रहायचं अशी समजूत करून घ्यायचा—

× × ×

फक्त अभ्यास करीत रहायचं असं रघूनं ठरवलं तरी तें त्याला जमण्यासारखं नव्हतं. मॅट्रिकच्या वर्गात आल्यानंतर रिप् व्हॅन् विंकलप्रमाणं अभ्यास या चीजेची जाणीव होऊन खडबडून जागे होणारे बापूसारखे अनेक विद्यार्थी असतात. त्यांच्या भाषेंत बारा तास, चौदा तास अशी अभ्यासाची मोजदाद सुरू होते. जाग्रणाचा मोसम म्हणतात तो चालू होतो — पण रघूला या सगळ्याचा पत्ता असण्याचं कारण नव्हतं. वर्गात होणाऱ्या अभ्यासाला वेळच्या वेळीं जुजबी उजळणीची जोड देऊन त्याचं काम भागत असे. त्यामुळ घरचीं 'लफडीं' विसरण्यासाठीं अभ्यासांत डुबून जायच असा बेत केला तरी तो पार पडत नव्हता.

रिकाम्या वेळेचा उपयोग कसा करायचा याच्या चिंतेंत असतांना रघूला लहानपणची लवणानंद स्वामींची एक गोष्ट आठवली. लहानशा जखमेपासून कुठल्याही मोठ्या आजारापर्यंत साऱ्या आधिव्याधींवर मिठाचा उपाय सुचवणाऱ्या त्या स्वामीबद्दल रघूला लहानपणीं मोठं कौतुक वाटलं होतं. असा एखादा सर्वंकष उपाय आपल्यालाही सांपडला तर ? — त्याच त्यालाच हसूं आलं — जखमेवर मिठाचा उपाय सुचवणारे स्वामी आणि जखमेवर मीठ चोळणं ही म्हण सुचवणारा व्यवहार — यांत आपल्याला सामान्यांच्या व्यवहारा-

वरच विश्वास ठेवला पाहिजे हें सांगायला नको होतं. पुढं कॉलेजांत असतांना वासुदेवराव पटवर्धनांच्या 'वेडे व्हा' या शब्दप्रयोगाची माहिती झाल्यावर त्याला आपल्या सामान्याच्या निर्णयाचंही असंच हसूं आलं होतं – पण या वेळीं आपल्याजवळ अशी कांहीं तरी जुडीबुट्टी असावी असा मोह व्हायचा.

—पण रघू विचाराच्या आहारीं फार दिवस गेला नाहीं. मनात कांहीं खळबळ झाली कीं दूरवर फिरून यायचं हा त्याचा बिनपैशांचा उपाय ठरलेला होता तो आपोआप लाब लाब फिरायला जाऊं लागला – फिरण्यात चांगले दोन अडीच तास मोडायचे अन् शिवाय पाय भेंडाळून दमून आलं म्हणजे रात्रीं निवात झोंप लागायची. त्याच्या या फिरण्याच्या वेडाची 'आख्या'च होऊन बसली. बापूनं सुरवातीला त्याला "काय पेन्शनरा-सारखा फिरायला जातोस" म्हणून चिडवलं आणि त्याचा परिणाम होत नाहीसं पाहिल्यावर बापूच्या थट्टेला नेहमीचं वळणं लागलं—"फिरायला जाऊन हल्लीं डोळ्याचा व्यायाम घेतोस वाटतं?" या वाक्याच्या भरीला तो डोळे मिचकावीत कमळीला म्हणाला, "बघा बहिणाबाई, असा बाहेरच्या व्यायाम घ्यायची संवय झाली म्हणजे लाबचं पाहून त्याला 'दूर दृष्टि' येईल अन् जवळचं दिसेनासं होईल – बाकी आमच्या दृष्टानं तें कांहीं वाईट नाहीं म्हणा – पण तुमचा आपला नवस तो—"

आपल्या फिरण्याचाही असा अनर्थकारक संबंध जोडतां येतो याची रघूला गंमत वाटली. त्यानं बापूला उत्तर द्यायचंच सोडल आणि आपला क्रम चालू ठेवला. त्याच्या कानीं आलं होतं कीं एका कॉलेजचे प्रिन्सिपॉल गावांतून कॉलेजला चार मैल रोज चालत जात असत. तेवढंच डोक्यात घेऊन त्यानं रोज चालत जायचा सराव करायचा असं टरवलं. संध्याकाळचा त्याचा मोर्चा मोठ्या रस्त्याकडे वळला. बरोबर कोणी नसलं तरी वाटेंत एखादा ओळखीचा विद्यार्थी भेटून त्याच्या भिडेखातर अलीकडे थाबायला लागायचा प्रसंग एक-दोनदा आल्यावर त्यानं मुख्य रस्ता सोडून दिला अन् तो आडवाटेनं शेतातून चालत जाऊं लागला. दररोज तो चार मैलाचा टप्पा गाठून मागं परतायचा.

तसं पाहिलं तर मॅट्रिकच्या वर्गात जायच्या आधींपासूनच रघूच्या डोक्यांत कॉलेजचे विचार येऊं लागले होते. मॅट्रिकपर्यंतचं शिक्षण खेडेगांवच्या मुलालाच

काय पण मोठ्या मोठ्या माणसांना सुद्धां मोलाचा टप्पा वाटत असला तरी शहरच्या वातावरणांत त्याला कांहीं किंमत उरत नाहीं हें रघूला कळून चुकलं होतं. खेडयांतल्या मुलानं सहजीं व्ह. फा. ची परीक्षा द्यावी तितक्याच सहज-पणें शहरांत मॅट्रिकची परीक्षा होऊन जाते. तिला काहीं महत्त्व उरत नाहीं. खेड्यांत मुलाला ही परीक्षा पदरात पडायला उचलून खर्च करावा लागतो, त्याची फेसाटी उडते; हा विचार नोकरीच्या किंवा लायकीच्या क्षेत्रात बसत नाहीं. म्हणून हा जादा वाटणारा भुर्दंड हिशेबांत न घेणं अवघड वाटलं तरी कटु सत्य म्हणून पचवलं पाहिजे याची जाणीव रघूला झाली होती. त्यामुळंच मॅट्रिक झाल्यावर आपण शतकृत्य करणार या पाच वर्षांपूर्वीच्या स्वप्नांतून जागा होऊन तो खडतर वस्तुस्थितीला तोंड देण्याच्या तयारींत होता. काहीं झालं तरी मॅट्रिकपाशीं न थाबता पुढं जाण्याची हिंमत बांधायची या विचारानं तो मनाशीं आखणी करीत होता पण " हे कसं जुळणार ? " हा प्रश्नच त्याच्या-पुढं मारखा उभा रहायचा.

' कसं जुळणार ? ' हा प्रश्न मनांत वागवीत रघू परत फिरायचा तेव्हां मात्र तो खरोखरी स्वप्नाळू व्हायला लागायचा. कोणातरी मोठ्या माणसाशीं ओळख होईल, त्याच्याकडून आपल्या हुशारीमुळं आपण होऊन मार्गदर्शन होईल. ' मदत करा ' म्हणायची वेळ आपल्यावर यायचीच नाहीं. मात्र हें कसं घडेल याची चिकित्सा न करतां रघू समाधानानं घरांत पाऊल टाकायचा.

प्रिलिमिनरी परीक्षा झाल्यावर तो या स्वप्नांतून जागा झाला. आपले वडील परीक्षेच्या फीसाठीं एक रकमेन वीस रुपये नुसत्या पत्रावर पाठवतील असं त्याला वाटेना. म्हणून परीक्षेनंतरच्या रिकाम्या आठवड्यात तो आपल्या गावीं आला. आई गेल्यापासून त्याला स्वतःचं घरसुद्धां परकंच वाटूं लागल होत. तसं वाटायला रघूच्या वाटणीच्या आलेली त्याच्या वडलांची करडी वागणूक आणि आईच्या आजारातली त्याची आरंभींची बेपर्वाई हीच केवळ कारणीभूत नव्हती. गांवातले शिष्ट लोक रघूच्या कानी जाईल अशा बेतानं, त्याच्याबद्दल सहानुभूति दाखवीत कुजबुजत असत—" कृष्णंभटजी भाकरीचीं सोय व्हावी म्हणून मुलगी मिळाली तर दुसरं लग्न करणार आहेत. चार-पांचशें रुपये द्यायची तयारीसद्धां आहे त्याची " आणखी वर मायेची पांखर घालण्याच्या मिषानं भर घालीत— " आतां हा रघू आलाय् लग्नाला – चांगला

शिकला सवरलेला मुलगा – त्याला हुंडा देऊन मुली येतील – पण तें सोडून या पन्नाशीच्या घरात आलेल्या म्हाताऱ्यानं—" रघूनं ही सारी कुजबूज मनावर घेतली नव्हती. वडलांची अशी माया त्याला कधीं लागलीच नव्हती कीं दुसरं लग्न केलं तर ती दुरावेल अशी धास्ती पडावी. पण त्याला आतां ही कुजबूज आठवली तीं अगदीं वेगळ्या संदर्भात – खरोखरच वडलाच्या मनात लग्नाबिग्नासाठीं चार-पाचशें रुपये खर्चायचे असले तर आपल्या फीचे पैसे ते सहजासहजीं द्यायचे नाहींत. नुसत्या पत्रावर तर मुळींच पाठवायचे नाहींत म्हणून तो तातडीनं गांवीं आला.

रघू घरीं आला त्यावेळीं कृष्णंभटजी कसली तरी पोथी वाचीत घरांतच बसले होते. बाकी आता त्यात काहीं विशेष नव्हतं. घरात भटजी अन् रघूचा धाकटा भाऊ – बाळ होता. रघूच्या आईन तो इंग्रजी शाळेंत शिकायला गेल्यावर या बाळाला जन्म दिलेला. त्याच्या जन्माबरोबरच आईला दुखणं लागलेलं— पण तिनं तें कुणालाही मरेपर्यंत कळूं दिलं नाहीं बाळ तर जन्मतः रोगी. त्याच्या खस्ता काढण्यात कृष्णंभटजींना घर सोडतांच येत नव्हतं. कधींकधीं त्राग्यानं ते म्हणायचे देखील – " नसती पीडा कुणीं सांगितली होती ? – एकदा संपूनहीं जात नाहीं ! " पण असं म्हटलं तरी भटजी बाळची होईल तितकी काळजी घ्यायचे. त्याला जवळ झोपवूनच ते पोथी वाचीत बसले होते.

परीक्षेला जवळ जवळ दोन महिने अवकाश असतांना रघू असा अचानक आलेला पाहून भटजींच्या काळजांत चरकलं. मुकाट्यानं पोथी मिटून त्यांनीं आपल्या हातानं – आयुष्यात पहिल्यादाच – रघूला चहा करून दिला. तेवढ होईपर्यंत भटजींच्या मनांत अनेक शंका आल्या होत्या. आई गेल्यापासून रघूचीं हाड दिसायला लागलींच होतीं. ऐनवेळीं प्रकृति बिघडून परीक्षेचा फॉर्म मिळत नाहीं म्हणून तर हा परत आला नाहीं ना ? आणि याच्याही पुढची भयानक शंका म्हणजे यानं आई गेल्यावर अभ्यासच टाकला नाहीं ना ? मागच्या वर्षी थातुरमातुर करून वर चढला असेल पण यंदा भाडं फुटून गेलं असेल का ? त्याला एकदम गांगरून टाकायला नको म्हणून भटजींनीं अगदीं सौम्यपणें विचारलं—

" असा एकाएकीं कां आलास ? पत्रबित्र न पाठवतां ? तूं मॅट्रिक व्हायला

पाहिजे. कशाची काळजी करूं नकोस. यंदां अभ्यास झाला नसला तरी मनाला लावून घेऊं नकोस—"

" तसं नाहीं दादा—"

" तूं कांहीं लपवूं नकोस. मी पंचांगात पाहिलंय; आपली साडेसाती आहे सध्या. येईल त्याला पाठ दिली पाहिजे. तुझ्यावर तर आतां सारं कांहीं आहे—"

रघूला तें बोलणं समजेना. त्यानं एकदम सांगून टाकलं " फॉर्मचे पैसे न्यायला आलोंय मी. मधें एकदा घरीं यावंसं वाटलं — "

" ये कीं – पण तुला फॉर्म मिळाला ना ? "

" अजून मिळाला नाही. पण त्यात काय आहे. पहिला नाहीं तर दुसरा नंबर येईल माझा. निकाल लागल्याबरोबर पैसे भरायला हवेत मग वेळ मिळायचा नाही म्हणून आधीं आलों—"

" बरं झालं आलास तें. अलीकडे बाळ तुझी आठवण काढतो—"

आणि दुसऱ्या दिवशी रघूनं भीत भीत फॉर्मसाठीं वीस रुपये मागितले तेव्हा भटजींनी त्याच्या हातावर पंचवीस रुपये ठेवले " आतां ऐन परीक्षेच्या वेळी तब्बेतीचे हाल करून घेऊं नकोस. दूधबिध घेत जा. त्या घरांत तुला काम पडत असलं तर या दोन महिन्यापुरती वेगळी खोली घेऊन रहा अन् खानावळींत जेवून अभ्यास कर. मी पैसे पाठवीन." रघूचे डोळे पाणावले. त्याला कळेना आपण कुणाशीं बोलतों आहोंत. चटकन् तोंड फिरवून त्यानं नाक पुसण्याचं निमित्त केलं अन् मग तो अडखळत म्हणाला,

" तिथं काहीं त्रास नाहीं. खानावळींतल्या जेवणानंच प्रकृति बिघडेल एखादवेळीं. चागलं चाललंय माझं. आणि त्यानीं आतां इतकीं पाच वर्षं केलंय तर उगीच दोन महिन्यासाठीं त्यांना अन् आपल्याला अपवाद कशाला ! तुम्ही काहीं काळजी करू नका दादा."

परत जातांना रघू एका निराळ्या जगांत वावरत होता. वडलांच्या अचानक सहानुभूतीनं त्याला अस्मान ठेंगणं केलं होतं. कॉलेजांत कसं जायचं ही शंका आतां त्यानं डोक्यांतून काढून टाकली. आपण कॉलेजांत जाणारच. फक्त कोणत्या हाच प्रश्न उरलाय. अशा आनंदांत गुरफटून तो शिवपूरच्या हद्दींत शिरला.

परीक्षा संपल्यावर तो आठवणीनं कांहींजणांना भेटला. त्यांत अर्थातच सानेमास्तर होते. त्यानीं स्वभावाप्रमाणं रघूची थट्टा केली.

" आतां कसली तक्रार आहे ? गणिताचे पेपर दीडशें मार्कांचेच कां असतात ? संबंध मार्क मिळवायला आणखी पेपर हवे होते ? "

" आतां तक्रार नाहीं कसलीसुद्धां— "

" मग ? सो व्हॉट् ? आता शाळा संपली. शाळेतल्या मास्तराकडे का आलास ? नाऊ गो टु प्रोफेसर्स. पुढं जावं; रेंगाळतोस कां ?

" पण पुढं कुठं जायचं ? मी गरीब आहें—"

" हात् रड्या ! नो गरीब – तुला कोण थाबवणार आहे ? चल नीघ इथनं. पुनः इथ परत येऊं नकोस. "

" इथं परत येऊं नकोस म्हणून सांगताय् सर – पण कुठं जाऊ तें मात्र सांगत नाहीं— "

" ती कोपऱ्यांतली काठी इकडं आण बघूं "

" कशाला ? मला मार द्यायला ? "

" तुझी काय भीति आहे का मला ? पण मार कशाला द्यायचा ?— तुझ्या हातातच देतो ती काठी – अजून तुला आधार हवासा वाटतोय्. कुठं जायचं तें दुसऱ्यांनीं सांगायला हवंय – अन् म्हणे स्कॉलर पहिल्या नंबरचा ! नो गुड् – नो गुड्. "

—त्या वेळेला तिथल्या कॉलेजांत उणींपुरीं तीनशें मुलं होतीं. एवढ्याशा लहान कॉलेजांत आपल्या स्कॉलरनं जावं असं सान्याना वाटत नव्हतं. पण त्यांच्या सांगण्याची तऱ्हा निराळी होती. " अरे आपल्या हायस्कूलनं या कॉलेजच्या क्रिकेट टीमला मारा दिला. तिथं तूं जाणार ? अन् किती दिवस ? गणिताचा विद्यार्थी तूं. तुला तर सायन्सकडेच जायला हवं. मग दोन वर्षांनीं जायचं तें आतांच कां जात नाहींस ? पुण्याला तुला भरपूर स्कॉलरशिप मिळेल. नवं वातावरण आढळेल. इथं वासरांत लंगडी गाय ठरतोयस्. तिथं दंड थोपटावे लागतील. जा. पुनः येऊं नकोस इथं— "

आणि पुनः परत यायचं नाहीं अशा हव्यासानं त्यानं पाच वर्षांपूर्वी ज्या उत्साहान शिवपुरात प्रवेश केला होता त्याच उत्साहानं बाहेर पाऊल टाकलं.

× × ×

जुलैची पंधरा तारीख उलटून गेली तसा रघू अधिकाधिक अस्वस्थ होऊं लागला. अजून स्कॉलरशिपचा निकाल बोर्डावर लागला नव्हता. त्यानं धीट-पणानं ऑफिसांत चौकशी केली तेव्हां तिथल्या अपरिचित कारकुनानं 'बोर्डावर लागेल तेव्हां पहा' असं त्याला पूर्वीच बजावलं होतं. घरून कृष्णंभटजींची दोन-तीन पत्रं येऊन पडलीं होतीं. अजून निकाल लागला नाहीं हाच मजकूर त्यांना पुनः पुनः कळवतांना रघूच्या जिवावर येत होत. कृष्णंभटजींची काळजी एक तऱ्हेची होती; रघूची दुसऱ्या तऱ्हेची होती. "शिवपुरांत राहिलास तर थोड्या खर्चात कसं तरी करता येईल. मी निमतील तितके पैसे पाठवीन" असं कृष्णंभटजींचं म्हणणं होतं तर 'पुण्यात जास्त सवलत मिळून सोय होईल' असं सागून रघूनं ठरल्याप्रमाण आपला पुण्याला जायचा बेत तडीला नेला होता.

पुण्यांत पाऊल [illegible] रघूला पावलोपावलीं मयसभेची अन् लंकेंतल्या सोन्याच्या विटाची आठवण होत होती पुण्याला जातोस तर उतर-णार कुठं, रहायची सोय काय हे प्रश्न वडलानीं विचारले तेव्हा रघूला उगीचच अडचणीत टाकणारे वाटले होते. स्टेशनवर उतरून कॉलेजच्या जवळ झाल्यावर त्याची जागेसाठी भ्रमती सुरू झाली. त्यावेळेला कॉलेजच्या आसपास पाच पंचवीस बगले तरी केवळ विद्यार्थ्यांसाठीं खोल्या भाड्यान देणारे असे होते. पण त्यांतून हिंडतां हिंडता तीस रुपये — चाळीस रुपये टर्म ही भाड्याची भाषा ऐकून रघूची छाती दडपली होती. याच पावलीं परतून शिवपूरला जावं असंसुद्धा त्याच्या मनात आलं. अखेरीं त्याला एक ओळखीचा चेहरा दिसला. आपल्याकडे निरखून पहाणारा हा गबाळा मुलगा कोण म्हणून तो तरुणही खोलीच्या दाराशीं थबकला; अन् तो थावलेला बघून रघूनं धाडस केलं—"तुम्ही सांगलीचे ना हो ?"

"हो ! काय पाहिजे तुम्हांला ? इथं नवीन आलाय का ?"

"हो. आतांच येतोंय; खोली हुडकायची आहे. पण आता टांगेवाला थांबायला तयार नाहीं. थोडा वेळ माझं सामान ठेवूं का तुमच्या खोलींत ?"

"ठेवा ना. इथं खोल्यांना तोटा नाहीं. हवं तर आता खोली मिळेल तुम्हांला याच बंगल्यांत—"

" तशा खोल्या पाहिल्यात मीं. पण माझं थोडं वेगळं आहे—"

" ठीक आहे. ठेवा तुमचं सामान इथं—"

खोलींत सामान ठेवून, तिथंच चहा घेतां घेतां त्यांनीं एकमेकांची ओळख करून घेतली. आपल्या केंद्रातून पहिल्या आलेला जोशी तो हाच हें कळल्यावर चंदू बापटला गंमत वाटली. " मग तुम्हो आमच्या शाळेचेच विद्यार्थी तर ! हवं तितके दिवस इथं रहा – तुमच्याबद्दल पुष्कळ ऐकलंय मीं— "

रघूला मात्र मोठ्या रस्त्याला फिरायला जातांना कधीं मधीं दिसणाऱ्या तरुणाच नाव चंदू बापट आहे यापेक्षा अधिक सुगावा लागला नाहीं. त्याला आपल्याबद्दल पुष्कळ ऐकायला कुठून मिळालं हे तर मुळींच समजलं नाहीं. चंदूचं बोलणं थट्टेवारी न्यावं म्हणून तो म्हणाला, ' पुण्यान जाहिरात लवकर होते अस म्हणतात; पण स्टेशनवर उतरताच ती होईल असं वाटलं नव्हत—"

" ही जाहिरात पुण्यातली नाही. शिवपुरांतलीच आहे. अन् तिचं श्रेय माझ्या बहिणीला आहे. "

" पण माझी तर तिथल्या एकाही मुलीशीं ओळख नाही— "

" तुम्ही खोटं बोलताय् असं मी पहिल्या भेटींतच तरी म्हणत नाहीं; पण मला वाटतं. तुम्हाला यमू बापट निदान नावानं तरी ठाऊक आहे. "

" त्या तर आमच्या वर्गांतच होत्या गेल्या वर्षी—"

" मग झालं तर. तिनंच तुमच्याविषयीं आमच्या घरात सांगितलं होतं. तुम्ही अडचणींतनं मुद्दां कसा वर नंबर राखीत होतात हें आमच्या इथं सगळ्यांना ठाऊक आहे— "

" मला मात्र तुमची कांहींच माहिती नव्हती. केवळ रस्त्यावर पाहिलेलं— एवढ्याशा धाग्यानं मी तुम्हाला त्रास देतों आहें. पण तुम्ही एकटेच आहांत इथं ? "

" मग ? अहो, आता माहिती झाल्यावर तरी सरळ विचारा कीं – यमू शिवपुरातच कॉलेजात जाणार आहे – तिला काय करायचं इथं येऊन ? "

" तसं नव्हे – मी म्हणणार होतों खोलींत तुम्ही एकटेच आहांत काय ? एखादी भार्डी आहेत इथं – माझ्यासारख्याची पंचाईतच––"

" ह्या बंगल्यांतल्या खोल्या त्यांतल्या त्यांत स्वस्त आहेत. जिमखान्याच्या बाजूला गेलं म्हणजे बारा-बारा, पंधरा-पंधरा रुपये दरमहा घेतात खोलीला. तुम्ही इथं अडचण मानूं नका. मला भाडं देणारा जोडीदार घेतलाच पाहिजे असं नाहीं. तुम्हांला वाटलं तर इथंच रहा. तुमच्या अभ्यासाला अडचण होणार नसली तर माझी कांहीच हरकत नाहीं–– "

" निदान दुसरी सोय होईपर्यंत तरी इथं रहातों. स्कॉलरशिप मिळाली की माझ्या वाटणीचं भाडंसुद्धा देईन. तसाच नाहीं रहाणार मी–– "

" तें काय तुम्हाला हवं तें करा. स्कॉलरशिप मिळेपर्यंत आणखी काहीं हवं नको झालं तर संकोच न मानतां सागत चला—"

तेव्हांपासून रघू, चंदू बापटाच्या खोलींत रहात होता. विद्यार्थ्यांच्या खोलीचे म्हणून जे नियम होते त्यामुळं रघूला हातानं स्वयंपाक करण्याचा बेत सोडून द्यावा लागला. काय करायचं याची चिंता बापटनं दोघाचा डबा चालू करून साडवली होती. रघूला महिनाभर मुकाट्यानं रहावं लागल अजून स्कॉलरशिपचा निकालसुद्धा नाहीं. खोलीचं भाडं सोडलं तरी निदान खाल्लेल्या अन्नाचे पैसे द्यायला हवेत ही रुखरुख त्याला टोचीत होती. अन् चंदू बापट त्याबद्दल एक अक्षरानं बोलत नव्हता म्हणून रघूची रुखरुख वाढली होती अन् स्कॉलरशिपचा निकाल बोडावर लागत नव्हता.

× × ×

रघूच्या आवडीचा विषय गणित. बायनॉमियल् थिअरम आणि नाइन पॉइंट सर्कल यासारख्या रुक्ष आणि अडचणीच्या वाटणाऱ्या भागांशीं तो मोठ्या हुरूपानं समरसून जायचा. बुद्धीचे कडे–कंगोरे घासून काढायला गणितासारखा विषय नाहीं म्हणून त्यात रमण्यातला आनंद घेण्याची त्याला मौज वाटायची. अत्र्यांच्या 'प्रेमवीर' सिनेमांतलीं विनोदी समीकरणं पाहूनसुद्धां त्याचा गणितावरचा लोभ ढळला नाहीं. अशा स्थितींत त्याचं लक्ष काव्या–वाङ्मयाकडे वळलं तें निराळ्याच कारणानं. शाळेंत असतांना

इंग्रजी आणि शास्त्राखेरीज बाकीच्या सगळ्या विषयांचा मराठींतनं अभ्यास करतांना त्याची एक पद्धत बसून गेली होती. सारेच विषय इंग्रजींतून करण्याची पाळी आल्यावर ती पद्धत निरुपयोगी ठरली. त्यांतल्या त्यात इंग्रजी आणि संस्कृत या विषयांनीं त्याचं डोकं फोडलं. सहामाहींत इंग्रजींत कसेबसे पासापुरते आणि संस्कृतात स्कॉलरला लाजिरवाणे वाटणारे पन्नास टक्के मार्क पाहिल्यावर रघूला हादरा बसला. संस्कृतच्या इंग्रजीकरणाला तर कांहीं धरबंधच नव्हता. ' मदिराक्षी ' आणि ' रंभोरु ' सारखीं स्त्रीचं रमणीय वर्णन करणारीं विशेषण इंग्रजी भाषांतरांत " वाइन आईड वन् ॲण्ड् प्लॅन्टेन् थाईड टू " असल्या हास्यास्पद शब्दप्रयोगांनीं व्यक्त केल्याशिवाय त्या शब्दाचा अर्थ कळला असा परीक्षकाला पुरावा मिळत नाहीं हा शोध वाङ्मयाचं अगदीं जुजबी प्रेम असलेल्यालासुद्धा हैराण करणारा होता. पण तो पचवल्याशिवाय गति नव्हती. इंग्रजीची सामग्री कॉलेजच्या मानानं कमी पडणारी होती. तिची भरपाई करण्यासाठीं एफ्. वायच्या दुसऱ्या सहामाही-पासून नियमितपणें रघू कॉलेजच्या लायब्ररींत जाऊं लागला.

सर्वसाधारणपणें इंग्रजीचं ज्ञान वाढावं म्हणून रघूनं अवांतर वाचन करायला सुरवात केली. कॉनन डायलपासून सुरवात करून दररोज कमीत कमी शंभर ते दीडशें पानं वाचायचींच अशा हव्यासानं तो रेटून बसूं लागला. कॉनन् डायलची गोडी लवकरच संपली. तरी वाचनाचं क्षेत्र कादंबऱ्यांचच राहिलं — डिकन्सच्या ' टेल ऑफ टू सिटीज् ' ची संक्षिप्त आवृत्ति रघूनं मॅट्रिकच्या वेळीं रॅपिड रीडिंगच टेक्स्ट म्हणून वाचली होती. त्या धोरणानं त्यानं डिकन्सला हात घातला. पिकविकच्या गंमतीनं त्याची डिकन्सची गोडी वाढली. पण त्याला खरं वेड लावलं तें डेव्हिड कॉपरफील्डनं. लहानपणीं सावत्रपणाच्या चरकांत सापडलेली, पावाच्या तुकड्यासाठीं वणवण हिंडाव लागणारीं, कोवळ्या वयांत कारखान्यात राबणारी डिकन्सच्या कादंबऱ्यांतलीं अनाथ मुलं — त्यांचं तें जीवनचित्रण वाचून रघूला लाज वाटली. आपण गरीब, हालांत दिवस काढणारे असं स्वतःला म्हणतों, पण यांच्या पासंगाला तरी आपले हाल पुरतील का ? स्वतंत्र देशांतल्या मुलांचीसुद्धां अशी स्थिति असूं शकते तर — कीं पारतंत्र्यानं आपल्याला इतकं परावलंबी करून ठेवलंय ? या पराव-लंबनांत एवढीशी खोट पडली कीं आपल्याला अन्याय — अन्याय म्हणून

भुई धोपटावी लागते ? पांच वर्षे इनामदारांच्या कुटुंबांत आणि आतां चंदू बापटाच्या खोलींत राहून आपल्याला जो विषाद वाटतो त्याला कांहीं कारण आहे का ? इतक्या सहजपणें आपली जी भलीबुरी सोय होत आली आहे तिला गरिबींतले हाल म्हणणं हें कितीसं योग्य ठरेल ? आपला ब्राह्मणी पिंडच आयतोबाचा आणि स्वास्थ्याचा आहे म्हणून तर ही आपल्या मनाची उलाघाल होत नाहीं ? असा विचार करायला लागलं कीं रघूला सुचेनासं होई आणि हा विचारच नको म्हणून तो आणखी खूप वाचायला लागे. पण वाचन सुरू झालं कीं असे विचार मनांत आल्याशिवाय रहात ना म्हणून त्यानं त्राग्यानं डिकन्स मधेंच टाकून दिला !

गॉल्सवर्दीच्या आधुनिक कादंबऱ्याचं आकर्षण रघूला का वाटलं कोणास ठाऊक ? कदाचित् ' फॉर्साइट सागा ' च्या प्रचंडपणांत त्याचं मूळ असू शकेल. मॅन् ऑफ प्रॉपर्टी वाचतांना रघू रागानं हिरवानिळा झाला. त्यातला तो आकर्षक म्हातारा, त्याची करुणामूर्ति सून आयरिन् यासारख्या रमणीय चित्रांचं भानच त्याला राहिलं नाहीं. कादंबरीच्या नावाशीं एकरूप झालेला सोम्स तेवढा रघूच्या मनावर ठसला. श्रीमंतीच्या जोरावर प्रत्येक गोष्ट आपली करूं पहाणारा, तिच्यावर आपला हक्क प्रस्थापित करणारा सोम्स म्हणजे रघूला आपल्या परिचयातला खेडेगांवी इनामदार वाटला. हीं मग्रूर माणसं — पैशाशिवाय कांहीं न ओळखणारीं माणसं, याना माणसं तरी का म्हणायचं ? सोम्सच्या जीवनाचं वर्णन वाचल्यावर रघूला वाटलं संस्कृत कवि भोळे तरी म्हटले पाहिजेत किंवा लाचार तरी म्हटले पाहिजेत. शृंगारचेष्टा करून सवरून नंतर मात्र शकुंतलेला न ओळखणारा दुष्यन्त — महाभारतकारानं त्याचं केलं तेंच वर्णन खरं — कालिदासानं उगीच त्याच्यावर दुर्वासाच्या शापाचं पांघरूण घातलं. कथा—कादंबऱ्यांच्या जगातनं रघू नकळत प्रत्यक्षात आला आणि त्याला अचानक आपल्या बंगल्याची एक आख्यायिका आठवली. त्या बंगल्यांत हल्लीं एक एकाक्ष इसम माळ्याचं अन् विद्यार्थ्यांच्या हरकाम्याचं काम करीत होता तो कुणालाही एवढ्यातेवढ्यावरून टाकून बोलायचा अन् त्याच्या बोलण्याचं पालुपद असायचं " कां ? लई माज आलाया पैक्याचा ? " त्या पालुपदाच्या बुडाशीं ती आख्यायिका होती. या एकाक्षाच्या आधीं एक बाई बंगल्यातलीं कामं करीत असे. तिथं रहाणाऱ्या

पंचविशी उलटून एक-दोन मुलाचे बाप झालेल्या बाप्या विद्यार्थ्यांना कुणीं सांगितलं — निदान ते तसे म्हणत होते म्हणे — की या बंगल्यांतून बायका कामं धरतात तीं ' अवांतर ' कमाई करायसाठी. त्या माहितीनं या उपाशी बाप्यातला उपाशी पुरुष जागा झाला आणि त्यानीं त्या बाईला रात्रींचीं भांडीं सकाळीं बिघडतात तेव्हा तीं रात्रींच्या रात्रीं घासून टाक म्हणून सांगितलं आणि नंतर थोड्याच दिवसानीं पन्नाशी उलटलेली ती बाई या बाप्यांच्या खोलींतून शंख करीत बाहेर आली. त्यावेळीं एका हातानं तिच्या हातात नोटा देत दुसऱ्या हातानं तिचं तोंड बंद करण्याचाही प्रयोग झाला. अन् तेव्हां-पासून हा उर्मट एकाक्ष माळी बंगल्यातल काम पाहूं लागला. साम्स आपल्या बायकोवर अत्याचार करतो ही हकीकत वाचताना रघूला आठवली ती या म्हाताऱ्या माळणीची हकीगत. पण हें चित्र फार थोडा वेळ टिकल ज्या इनामदारी वातावरणाशीं आपण याची सागड घातली होतीं तें वातावरण कां विसरावं याची त्याला खंत वाटली. आयरिन्चं दुसऱ्यावर प्रेम होतं म्हणून सोम्सच्या वागणुकीला अत्याचार म्हणायचं ? वर्षानुवर्ष इनामदाराच्या घरची वाज अडवणारी बापूचा आई तरी काय वेगळी होती ? साऱ्या जन्मात नवऱ्या-शिवाय दुसऱ्या पुरुषाचा वारा न लागलेली ती बाई — तिची स्थिति आयरिन्-पेक्षाही करुणास्पद नव्हती का ? आणि ही सारी ईश्वरी कृपा म्हणून अंग झाडून मोकळे होणारे अप्पा इनामदार — सोम्सच्या कडवटपणापेक्षा हा इनामदारी गुळचटपणा अधिक भयानक होता. बापूची आई भरल्या कुंकवानं जगत होती ती मरण येत नाहीं म्हणून. यापेक्षा जिवंत मरण म्हणतात तें वेगळं काय असूं शकणार ? प्रत्येक मनुष्यच स्त्रीला अशी ' संपत्ती 'ची बाब समजत नाहीं का ? असल्या विचाराचं तुबळ सुरूं झालं कीं रघूला वाटायचं कुठून झक मारली आणि या कादंबऱ्याच्या नादाला लागलों.

—अशी अवस्था झाली तरी रघूच्या वाचनाचा परिणाम व्हायचा तोच झाला. अतिवाचनानं डोळे दुखूं लागले आणि त्या दुखऱ्या डोळ्यांनींच इंटरच्या सहामाहीचे पेपर कसेबसे लिहून तो घरीं परत आला. इंग्रजी सुधारण्यासाठीं म्हणून जो नाद त्यानं लावून घेतला त्यानं त्याच्या नेमलेल्या अभ्यासाचं खोबरं केलं होतं. सुट्टींत बाकीचे विद्यार्थी जादा अभ्यासाला म्हणून पुण्यांत राहिले असतांना, रघूला मात्र मागं पडलेला अभ्यास भरून

काढावयाचा विचारसुद्धां बाजूला टाकून, डॉक्टरी सल्ल्याप्रमाणं सक्तीची विश्रांति घेणं भाग पडलं होतं. त्याच्या येण्यान कृष्णंभटजींना आश्चर्य तर वाटलंच; पण ते थोडेसे खट्टूही झाले.

× × ×

आश्विनाचा दुसरा पंधरवडा म्हणजे भटजींना गर्दीचा असायचा. पाहूं मागाहून, करूं सवडीनं म्हणून मागं टाकलेले पक्ष घाईन उरकण्याची या वेळीं रीघ लागलेली असायची. पण रघू आल्यावर आठवडा झाला तरीं भटजीच्या-कडे कोणी आलं नाही. त्याचा सारा वेळ घरात बाळाचं करण्यात आणि जुन्या पोथ्या वाचण्यांत जायचा. इनामदाराचा अड्डा बंद झाला होता. कृष्णं-भटजी संध्याकाळच्या वेळीं बाहेर पडलेच तर कृष्णेवर संध्या उरकून येण्या-पुरते बाहेर रहायचे. रघूशीं बोलताना ते कांहीं संबध नसताना " तूं पुण्याला गेलास तेंच बरं झालं " असं म्हणाले. पण आपल्या बदललेल्या स्थितीविषयीं त्यानीं अक्षर उच्चारलं नाहीं. रघूलाही विचारण्याचें धाडस झालं नाही. जुनी स्थिति राहिली नसली तरी एखादवेळीं " तुझा बाप गेला नाहीं अजून घरची काळजी करायला " हे शब्द ऐकायला मिळतील अशी रघूला भीति होती. किरकिऱ्या बाळानं मात्र एकदा रघूला सांगितलं होतं, " दादा भांडले; खूप खूप मोठ्ठं भांडले. " पण कुणाशीं तें त्याला सागतां आलं नाहीं. इनामदाराचा बापू एक दिवस अंगावरनं गेला तरी त्यानं रघूकडं पाहिलंच नाहीं अशा ढंगानं पुढं चालायला सुरवात केली.

हळूहळू दिवाळी आली तशी भटजींची उलाघाल वाढली. रोजचा भात उकडायचं किंवा भाकरी भाजायचं काम अंगवळणीं पडलं असल तरी सणाला काय करायचं तें त्यांना समजेना. रघूच्या दुखऱ्या डोळ्यामुळं त्यानं चुलीपाशीं जाण्याचा प्रश्नच नव्हता. बाळाचा हट्ट पुरवण्यासाठीं त्याला चार आण्यांची दारू आणून दिली तर त्याचा दिवाळीच्या फराळासाठीं हट्ट चालू झाला. " दिवाळीच्या मुहूर्तानं सारं विसरून जाऊं. तुम्ही फराळाला इकडं या " असा निरोप इनामदारांच्या अन् मास्तरांच्या घरून भटजींना पोंचला होता. पण त्यांचा पीळ कायम होता. बाळाचा हट्ट आवरण्याच्या पलीकडे तो जाऊं लागला तेव्हां भटजींनीं आपल्या ठेवणींतला एक रुपया काढून रघूला

सांगितलं, " बाहेर जाऊन त्याला कांहीं तरी खायला घेऊन ये " बाळानंही आपला हट्ट पुढं चालवला, " मला बिस्किटं – मुरंबी नकोत – दिवाळीचं हवंय. " " आण जा त्याला काय हवं तें – पण निदानीं ब्राह्मणाच्या हॉटेलांतलं तरी आण " भटजींनीं हतबुद्धपणें रघूला सांगितले. ते हॉटेलांतले चिवडा लाडू भटजींच्या घरात आले. आणि मुलाच्या हट्टाखातर भटजींनीं आपलं तोंडसुद्धा विटाळलं

—त्यानंतर मात्र त्यानीं रेचक घेऊन तीन दिवस कडक उपास केला. शंकराला महारुद्र केला हॉटेलचं खाण्यांत जें काही पाप घडलं असेल तें धुवून निघावं म्हणून करायचे तेवढे सोपस्कार केले. हा सारा प्रकार पाहून रघूनं धाडस करून विचारलं, " गांवात काय बिनसलयं ? "

" अरे चालायचंच ! त्यात काय विशेष आहे ? तूं कशाला लक्ष घालतोस ? "

" परवा बापू अंगावरनं गेला तरी बोलला नाहीं – इतकं काय झालंय ? "

" व्हायच काय ? तो तरी इनामदाराचाच पोरगा ना. वाडा आहे. सारं घर पोकळ झालं तरी अजून मिजास उतरत नाहीं— "

" आपल्याला त्याच्या इनामदारीशीं अन् पोकळपणाशीं काय करायचं आहे ? "

" कांहीं नाहीं – आतां त्याच्याशींच काय पण साऱ्या ब्राह्मण आळीशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. "

" मला अजून समजत नाहीं. बाळ म्हणत होता. तुमचं मोठं भांडण झालं. कुणाशीं अन् कशासाठीं ? " रघूच्या मनांत वेगळीच शंका आली. कमळीनं किंवा बापूनं काहीं घोटाळा करून आपल्या नावाशीं तर चिकटवून दिला नसेल. अन् त्यांत इनामदारांना अपमान वाटला असेल. खाल्ल्या घरचे वासे मोजल्याबद्दल त्यांनीं भटजींना बोल लावला असेल अन् वडलांनीं तिरीमिरीनं इनामदारांच्या पोकळपणाचा फुगा चार माणसांत फोडला असेल. आपणच का या साऱ्याचं कारण ?

—रघूचा अंदाज सपशेल चुकला होता. त्याची बुद्धिमत्ता कितीही तीव्र

असली तरी एका गोष्टींत त्याला कधींच अंदाज बांधता आला नाहीं ते म्हणजे स्वतःचं महत्त्व किंवा गौणपणा. एखादी विपरीत गोष्ट घडलेली दिसली की त्याला शंका यायची, हें आपल्यामुळं तर झालं नाहीं ना ? स्वत.च्या महत्त्वाच्या बाबतींत त्याचा अंदाज असा चालायचा तर एखादी विशेष नावाजण्यासारखी गोष्ट घडली कीं तिच्यात आपला कांही संबंध असणं शक्य नाही हें त्याच ठरलेलं मत असायचं. मॅट्रिकच्या वेळींच 'हायस्कूल'चा विद्यार्थी पहिला आला एवढं कळाल्यावर त्याच्या डोळयापुढं नांवं आलीं होतीं, ती गोखले आणि भावे या आपल्या प्रतिस्पर्ध्यांचीं. रघू जोशी सुद्धा पहिला येऊं शकेल हें वर्तमानपत्रांत वाचल्यावरही त्याला लवकर पटल नव्हतं — एवढच काय पण आपले अंदाज चुकतात हे कळल्यावरही चुकीच्या अंदाजांनीं गोंधळून जायचं हा त्याचा धर्मच झाला होता.

कृष्णंभटजीनीं सांगितल्यावर त्याची खात्री पटली. साऱ्या ब्राह्मणआळीशीं भटजीनी आपण होऊन असहकार पुकारला होता; आणि तोही एका वेळेवर आणलेलं जेवण सुद्धा दुसऱ्याच्या घरी जाऊन जेवण्याची पाळी आली होती अशा वेळीं. कॉलेजात शिकायला राहिला तरी रघूनं भटजींच्याकडून पूर्वीच्या पाच रुपयापेक्षा अधिक मदतीची अपेक्षा केली नव्हती. पण त्याच्याच मनानं घेतलं; वेळ-वखत आहे, कमी अधिक पैशाची गरज लागेल. दुसरा मुलगाही वाटेल त्याक्षणीं डॉक्टरला आमंत्रण देणारा ! त्यासाठीं पैसा हवा, म्हणून त्यानी एकच गोष्ट केली. साऱ्या ब्राह्मणआळीकडे आपल्या बाकीची मागणी केली.

—त्याच्या या मागणीत लाचारी, उणेपणा किंवा काहीं विपरीत नव्हतं. इनामदारापासून महारा-पोरापर्यंत भटजींनीं कुणाकडेही धर्मकृत्य केलं तरी ते त्याबद्दल जेवढी कमींत कमी असेल तेवढीच दक्षिणा सांगीत. पण गेल्या पांच-सहा वर्षांत असं व्हायला लागलं होतं कीं ही कमींत कमी दक्षिणा सुद्धां भटजींच्या पदरात पडेनाशी झाली. त्यांनीं विचारलच तर "देऊन टाकूं एकदम वर्ष अखेरी गुऱ्हाळावर; रोख पैसा दिसतोय् कुठं ?" असं कांहीं तरी उत्तर मिळूं लागल. रखमाबाई जिवंत होती तोंवर विरोधीभक्तीनं म्हणा, घरचं पहावं लागत नव्हतं म्हणून म्हणा कीं तशी मोठीशी गरजच पडली

नव्हती म्हणून म्हणा, भटजींनीं या बाबतींत अवाक्षर उच्चारलं नव्हतं. पण रघूच्या शिक्षणासाठीं पै-पैची काळजी करावीशी वाटूं लागली अन् मग भटजींनीं साऱ्या ब्राह्मण आळीची सभा घेऊन आपल्या बाकीची गोष्ट काढली.

" मागली बाकी ! भटजी, तुम्ही अगदी कच्छ्या – मारवाड्याची भाषा बोलायला लागलात कीं – तुम्ही काय धर्माचा असा विक्रा करता ? " मास्तरांनीं आपलं ज्ञान उपयोगांत आणलं.

" जाऊं द्या हो " इनामदारांनीं सारवासारव करीत म्हटलं, " भटजी, नड असली तर पांच-पचवीस रुपये मागा. तुमचा रघू पुण्याला राहिलाय् तें आम्हाला ठाऊक आहे – पण ही असली भाषा वापरून गुरुमुख विटाळूं नका. "

' तें काय म्हणून ? ' असं म्हणत भटजींनीं आपल्या चोपडींतून नाव-निशीवार बाकीचें आंकडे वाचायलाच सुरवात केली. प्रत्येकाची अब्रू अशी वेशीवर आल्यामुळं तोंडं उतरली तरी एका भटाचा हा उर्मटपणा सहन करायला जमलेले ह्रळांच्या मुळीचे धनी तयार नव्हते बोलणं वाढत गेलं तसं भटजींनीं निक्षून सांगितलं " मागची सारी बाकी चुकती झाल्याशिवाय कुणाच्याही घरांत धर्मकृत्याला पाय टाकणार नाहीं. " त्याचं रहातं घर एका ब्राह्मणाचं होतं तें सुद्धा सोडून ते विठोबाच्या देवळांतल्या ओरींत बिऱ्हाड घेऊन राहिले.

आपल्या वडलांच्या स्वाभिमानाचा आणि हिशेबी वृत्तीचा अभिमान धरावा कीं, क्षुल्लक भांडण काढून उगीच गांवच्या ब्राह्मणाशीं वाकडे होऊं नका असं त्याना सांगावं, हें रघूला उमगेना. कांहीं तरी विचारायला पाहिजे म्हणून तो म्हणाला, " पण दादा, इतक्या पायरीला यायला अशी बाकी तरी किती निघाली ? "

" थोडी नाहीं – झाली चुकून वसूल तर तुला कुणाकडं तोंड न वेंगडता सारं शिक्षण पुरं करतां येईल. हाडाचीं काडं नाहीं करावीं लागणार. चांगली नऊशें रुपये बाकी आहे पंध्रा घरांची मिळून – अन् तीसुद्धां वरचेवर ' पुढं बघूं ' असं म्हणायला लागले तेव्हां मी टिपून ठेवायला लागलों तिथपासूनची. आधींची सारी झालीच आहे कृष्णार्पण !—"

" नऊशें रुपये ? चांगला सावकारीसारखा आकडा दिसतोय् कीं—"

" त्याला मी काय करूं ? मी काय सावकारी केलीय् की व्याज आकारलंय ? या अप्पा इनामदाराकडेच चारशें रुपये नक्त आहेत. त्या आत्याबाईंची व्रतं केलीं त्याचा पैसा दिला नाहीं. सारे श्राद्धपक्ष उधार – अनंताच्या पूजेला तासभर उशीर झाला तर ठणाणा करतो; पण ताम्हनात कधीं ताबडा पैसा ठेवीत नाहीं. न्हाव्या–भटापासनं याची उधारी. आपल्या इनामदारीचा तोरा मात्र मिरवायला हवा—"

" पण निदान त्याची तरी बाकी काढायला नको होती दादा. नाहीं म्हटलं तरी पाच वर्षं त्याच्या घरीं राहिलोंय मी—"

" हो – अन् मीसुद्धा जेवलों दोन वर्षं ते विसरलों नाहीं मी – अन्नाची हरामी करायइतका माजलों नाहीं मी रघू— "

" मग असं कसं केलंत— ? "

" हें तूं विचारतोस ? त्या आत्याबाईच्या हाताखालीं पांच वर्षं काढल्यावर ? ती नसताना इथला नमुना काय होता तो मी पाहिला आहे. घरच्या अड-चणींत इनामदारानं जेवायला बोलावलं म्हणून मी जाऊं लागलों तेंच चुकलं— लाब राहून जो चांगुलपणा होता तो गमावला. घरच्या हरकामाचा गडी करून टाकला त्यानं मला. रानात मळणीकडे जा, वाण्याकडच सामान आणा, म्हशीच्या धारा काढा – काय वाटेल तीं कामं करून घेतलीं माझ्याकडनं. त्या कामाचा हिशेब धरला असता एक गडी दोन वेळचं जेवून वरखर्चाला पगार घेतल्याशिवाय राहिला नसता. पण तें काढायच नाहीं ? – कां तर ' गुरुजी ' ' उपाध्ये ' हीं नावं गोड लागतात म्हणून. पन्नाशी उलटल्यावर इथं माझी ही अवस्था तर तिकडे तर काय तुला अन्नाच्या एकेका कणासाठीं नाचवलं असेल. पण तीं कामं अन् तीं जेवणं – आपल्या भटकीच्या बाहेरची म्हणून विसरून जायचं एवढंच ! त्याचा उच्चारच करायचा नाहीं."

" पण ते तरी उच्चार करणारच ना ? "

" अजून राहिलेत असं तुला वाटलं काय ? अत्याबाईनं त्याचं करायचं तेवढं रामायण केलं – तूं पुण्याला शिकायला गेलास म्हणून माझे हात आभाळाला लागलेत म्हणण्यापर्यंत मजल गेली."

" त्याचा याच्याशीं काय संबंध— ? "

" खरं दुखणं तेंच आहे रघू – तूं मॅट्रिक होऊन थांबला नाहींस. कुठं नापास न होतां पुढं निघालास, भटाचा मुलगा असूनसुद्धां. अन् हे इनामदार जमीनदार – याचीं मुलं शिकवण्या ठेवून, बिऱ्हाडं करून, कर्ज काढून ऐटींत राहून सुद्धां कशींबशीं दोन वर्षांत एकेक यत्ता वर चढतात. त्यामुळं तर सारा जळफळाट अन् झाला बाकीशी त्यांचा संबंध जोडला. ' आमच्यावर भटकीच्या बाक्या काढून आता काय पोराला विलायतेला पाठवणार आहे वाटतं. अशीं मुक्ताफळं उधळलीं."

" कसली कुचकीं मन आहेत इथलीं. भट आणि गृहस्थ, देशस्थ आणि कोंकणस्थ – साधे ब्राह्मण म्हणून मिरवणंसुद्धा आजच्या काळांत शोभत नाहीं तिथ हे असले बारकावे डोक्यात घेऊन बसतात. पायाखालचं दिसत नाही."

" पायाखालचं दिसायला नजर खालीं असावी लागते रघू – याचे डोळे फिरतात आभाळात. पायाखालीं आहेच बापजाद्यांनीं मिळवून ठेवलेली हरळीची मुळी ! याना काय कारण चिंता करायचं ? "

" त्यांच्या चिंतेशीं आपल्याला काय करायचंय म्हणा ! पण आतां तुम्ही कसं करणार दादा ? हीं सारी घर सुटल्यावर— "

" नाहीं तर याच्या उधारीवर माझं चालणार आहे थोडच ? गावची जोसकी आहे. शेतकरी अडाणी पण तो आठवणीनं नव्याचं शेर मापटं आणून देतो. पंचागात नुसता पेरणी मळणीचा बरा दिवस पाहिला तर त्याबद्दल तो पैसा सुपारी द्यायला विसरत नाहीं. मला कांहीं कमी पडायच नाहीं. तुझं शिक्षण सपेपर्यंत दोन–तीन वर्षं कशींही निभवून नेईन मी. तूं मात्र इकडची कांहीं काळजी करूं नकोस— "

× × ×

कृष्णंभटजींनी रघूला इकडची कांहीं काळजी करूं नकोस म्हणून सांगितलं होतं तरी पुण्याला आल्यावर त्याच्या डोळयापुढं देवळाच्या ओरींतलं आपलं घरकुल उभं राहिलं. जिद्दीनं मिळेल त्या पशा–पावशेरावर एकभुक्त राहून जगणारे वडील, कशाचीच जाणीव नसली तरी आजारान हैराण झालेला बाळ

—आपल्या शिक्षणावर बांधलेल्या त्यांच्या आशा – त्या दडपणानं प्रवृत्त्या दबलेला दुबळा रघू वास्तविक खचूनच जायचा. पण त्यानं हिंमत बाधली. आपल्या दुखऱ्या डोळयाची पर्वा न करतां मोठ्या उमेदी बाळगल्या. सारी हयात इनामदारांच्या अड्डयावर घालवलेल्या आपल्या वडलांच्या स्वभावांतल्या जाणवलेल्या पालटानं, त्याच्या जिद्दीनं, स्वाभिमानानं, पिळानं रघूला अवसान चढलं. त्या भरांत डॉक्टराच्या सल्ला त्यानं धुडकावून दिला— ''

महिनाभर रघूनं नेटानं नेमलेल्या पुस्तकाचा अभ्यास केला, अवातर वाचन बंद केलं. डोळयापुढं अक्षरं नाचलीं तरी आपोआप झोंप लागेपर्यंत वाचत रहायचं हा त्याचा क्रम होऊन बसला. झोंपता झोंपता पुस्तक हातातनं गळून पडायचं. मिटलेल्या डोळयातनं पाण्याच्या धारा वाहायच्या हा प्रकार पाहून बापटानं त्याला एक-दोनदां त्याच्या दुखऱ्या डोळयांची आठवण करून दिली. पण रघूनं त्याकडे लक्ष दिलं नाहीं. व्हायचा तोच परिणाम झाला. डोळे दिवसा चुरचुरायला लागले. बापटानं त्याच्या हातातलं पुस्तक फेकून त्याला दवाखान्यात नेला. चष्मा घेतला पाहिजे हें तर आलंच; पण निदान महिनाभर तरी वाचन पूर्णपणें बद ठेवलं पाहिजे असं डॉक्टरानीं निक्षून सागितलं. बापटानं त्याना रघूचा हट्टीपणा सागितला. त्यानीं सरळ डोळयात ॲट्रोपिन घालून रघूला परत पाठवला आणि दररोज तोच प्रयोग करण्यासाटीं बापटाजवळ ट्यूब देऊन ठेवली.

रघूचा पराभव झाला. वाचन बंद झाल्यावर विचारानं त्याचं डोकं भणभणूं लागलं. बापट बिचारा सीनियरला होता तरी वेळात वेळ काढून त्याला तासभर इंटरचीं पुस्तकं वाचून दाखवूं लागला. या कोवळ्या मुलाच्या मनावर परिणाम होऊं नये म्हणून कुणाची पर्वा न करणारा पाडुरंग सावत-सुद्धा मधून मधून त्याच्याशीं इकडच्या तिकडच्या गप्पा मारू लागला.

या सहानुभूतीनं रघू जास्तीच हळवा झाला. बापटाचा पुष्कळसा वेळ प्रॅक्टिकल्मुळ कॉलेजात जायचा. पण सावत मात्र ऐन मोसमातसुद्धा रघूजवळ हवा तितका वेळ बसायला तयार असे. रघूनं विचारायच्या आधींच त्यानं सांगून टाकलं "माझ्या टर्म्स मागच्याच वर्षी भरलेल्या आहेत. मला कॉलेजांत गेलंच पाहिजे असं नाहीं." रघू नको नको म्हणत असतांना सुद्धा

त्यानं रघूला आपल्या रतिबातलं दूध द्यायला सुरुवात केली. त्याची स्थिति गरिबीची आहे हें रघूला ठाऊक होतं. त्यामुळं तो जास्तच बुचकळ्यात पडला. पाडुरंग सावत रघूचं समाधान करण्यासाठी त्याला सांगू लागला—

" जोशी – तुम्ही आता काळजी करायचं सोडून द्या. काळजी करून का आता कांहीं होणार आहे ? शक्तीचा अपव्यय करून एकदा डोळे बिघडवून घेतलेत एवढ्यावरनं शहाणे व्हा — "

" पण मी तरी काय करूं ? इंग्रजी कच्चं पडलं – स्कॉलरशिप जायची भीति वाटली. त्यामुळं जास्त वाचन कराव लागलं. याला तुम्ही वेडेपणा म्हणाल काय ? "

" अगदी शुद्ध वेडेपणा – " पांडुरंग सावताचा मूळचा पिंड उसळला. " जास्त वाचन केलंत अन् त्याचा परिणाम काय झाला तो तुम्हीच पहा ना ! तुम्हीं ताकदीच्या बाहेर श्रम करायला नको होते. "

" मग मीं काय करायला हव होतं ?—आता असा पंगु होऊन पडलों आहें तेव्हां मी चुकलों असं प्रत्येकजण म्हणणारच – पण माझं काय चुकलं आणि काय बरोबर झाल असत हें मात्र सागणारं भेटणार नाहीं. " रघूच्या स्वरात चिडकेपणापेक्षाही असहायता अधिक होती.

पाडुरंग सावंताचा स्वर पुनः बदलला. तो समजावणीच्या सुरात सागूं लागला, " तुम्हाला जें बरोबर वाटलं तेंच तुम्हीं केलत जोशी. पण तुम्ही खोलात शिरला नाहींत – तो तुमचा दोष नाहीं, तुमच्या ब्राह्मणी पिंडाचा दोष आहे अस म्हटलं तर तुम्हाला कडू वाटेल, हा सावंत अखेर जातीवर आला असं सुद्धा तुम्ही उघड नाही तरी मनात म्हणाल. पण मी सांगतों तेंच खरं आहे. उदाहरणानं सांगायचं तर मी म्हणेन तुम्हा ब्राह्मणांना नुसतं जमिनीवर डोलणारं पीक आणि त्याचं मोजमाप ठाऊक असतं, त्यासाठीं करावी लागणारी जमिनीची नांगरट – मेहनत – तिच्या पोटात शिरण्याची किमया ठाऊक नसते. "

" तुमचं उदाहरण बरोबर असेल – पण मी पडलों ब्राह्मण तेव्हा या उदाहरणापेक्षां सरळ मुळांत तुम्हांला काय म्हणायचं आहे तेंच सागा ना—"

" हेंच पहा – मी इतकं सांगितलं तरी माझं उदाहरण कांहीं तुम्हांला

आवडलेलं दिसत नाहीं जोशी. तुम्हाला हवं तें सुद्धां मी सागेन पण कुणास ठाऊक तें तरी तुम्हांला पचेल कीं नाहीं—"

" नाहीं पचलं तर तुम्ही सक्ति थोडीच करणार आहात— "

" तुमचं वाचनाचं वेड, स्कॉलरशिप टिकवण्यासाठीं इंग्रजी सुधारण्याची धडपड, या साऱ्या गोष्टी आपण बाजूला ठेवूं – तुम्हीं कधीं असा विचार केलात का ? आपलं इंग्रजी कच्चं राहिलंच का ? " सावंतानं क्षणभर रघूकडं पाहिलं – तो गप्प राहून नुसता ऐकत होता त्याला धक्का देण्यासाठीं सावंत एकदम म्हणाला—" जोशी, या साऱ्याच मूळ दारिद्र्यात ! "

" हें तुमचं नेहमींचं तत्त्वज्ञान आलं. मला तें अर्थकारण – राजकारण कांहीं नको. दारिद्र्याचा आणि इंग्रजी कच्चं राहण्याचा संबंध काय ? "

" संबंध आहे, पण तो कधीं तुम्हीं ध्यानांत घेतलाच नाहीं. म्हणून मी म्हणालों तुम्ही खोलांत शिरला नाहीं. अहो, तुमचं इंग्रजी कच्चं राहिलं, कारण सातवी होईपर्यंत तुमच्या डोक्यात इंग्रजी शिकायचा विचारच आला नसेल. नंतर तुम्ही घाईनं एका वर्षात तीन यत्ता केल्यात पण आधीं तीन वर्षं इंग्रजी शाळेच्या वातावरणांत राहून, सावकाशीनं इंग्रजीचा पाया पक्का करणारे दुसरे अनेक होते त्यांना ती अनुकूलता होती. आणि तुमच्या दारिद्र्यामुळं तुम्हांला नव्हती – म्हणून हें तुलनेनं जाणवणारं अंतर आतां एकदम उठून दिसायला लागलं. तें भरून काढायसाठीं तुम्हीं अति श्रम केलेत आणि आणखी संकटात पडलात. म्हणून मी म्हणतों याचं मूळ दारिद्र्यांत आहे हें विसरून तुम्ही नुसती वरवरची इंग्रजीपुरती मलमपट्टी करायला निघालात हें चुकलं. "

" समजा, तुमचं म्हणणं खरं मानलं तरी त्यावर उपाय काय ? "

" दारिद्र्याविरुद्ध झगडायला ताकद वाढवायच्या ऐवजीं ती गमावणं हा तरी खास नव्हे. तुम्हां-आम्हा गरिबांना जगात रहायचं असलं तर निदानीं आपली शरीरप्रकृति धड ठेवल्याशिवाय कांहींहीं करता येणार नाहीं. तेंच आपलं हक्काचं भाडवल. "

" त्यालाही पैसा लागतो अन् तिथंच सारं नडतं. हें व्हिशस् सर्कल—घातचक्र आहे. यांतून उपाय निघत नाहीं सावंत – " रघूनं खिन्नपणें

अनुमान काढलं. सावंत गप्प राहिला. रघूच्या मनोवृत्तींत त्याला कांहींही सांगितलं तरी तो आपल्या मूळपदावर आल्याशिवाय रहायचा नाहीं हें सावतानं ओळखलं अन् तेवढ्यापुरतं तें बोलणं संपलं. शेवटीं आपलंच म्हणणं खरं टरलं याचं वाटायचं तेवढं समाधान मात्र रघूला लाभलं.

जानेवारीच्या सुरुवातीला डोळ्याना चष्मा लावून रघून जुजबी वाचन सुरू केलं. पण जुजबी म्हटलं तरी परीक्षेची तारीख समोर दिसत असताना रघू-सारख्याकडून व्हायचा तितका अतिरेक होत राहिलाच. बापटनं त्याला एक-दोनदा सांगून पाहिलं. पण तो याच्यापेक्षां अधिक कांहीं करण्याच्या वृत्तींतला नव्हता. पांडुरंग सावंतानं मात्र आपला स्वतःचा खास उपाय योजला. त्यानं रघूचीं पुस्तकच उचलून आपल्या ट्रंकेंत कुलपांत ठेवून दिलीं रघू अगदींच अजीजीला आला तेव्हा त्यानं रघूची थट्टा करायला सुरुवात केली—

" असं रडूं रडूं काय करतांय जोशीबुवा ! यंदाची परीक्षा तुम्हाला लाभत नाहीं असं समजा कीं. "

" समजून वर्ष काहीं भरून येत नाहीं. "

" हात्याच्या ! एका वर्षासाठीं इतकी मुळमुळशाही ! राव तुम्हांला आता मातर या सावंताची शिकवणीच धरायला पाहिजे. "

" ती कशाची ? "

" कशाची ? तुम्हांला काय एक म्हणून शिकवून भागणार आहे. गप बसा राव – तुम्हाला टाऊक आहे इंटर सायन्स होऊन मला चार वर्षं झालींत. पण अजून माझी एस्. ई. चालली आहे तुमच्यासारखं हळहळत बसलों असतों तर मागच्या वर्षीच इंजिनियर झालों नाहीं म्हणून रडून रडून माझे डोळे फुटले असते—"

" तुम्हाला असेल तशी सवड— "

" वा जोशीबुवा ! माझी नव्यानं ओळख झाल्यासारखं बोलतांय् कीं ! मी तर खानदेशांतला मोटा कपाशीचा जमीनदारच पडलोंय् कीं – नाहीं का ? दिसेल तें शिवार आमचंच. फकस्त आमच्या आई–वडलाना त्या शिवारांत रोजानं काम करावं लागतं, एवढंच ! अन् त्यांनीं मला बँकेंत खातं उघडून दिलंय् – पण तिथं चेक वटत नाहींत त्यांतच सारं नडलंय ! "

" खरंच का सावंत तुमचे आई-वडील शेतमजूर आहेत ? मग तुमचं चालतं तरी कसं ? " सावंतानं कडवट विनोदानं सांगितलेल्या हकी-कतीनं रघू स्वतःला विसरला. आपल्या तात्या चाभाराहून फारशा वेगळ्या स्थितींत नसलेल्या, पण आरामात रहाणाऱ्या सांवतानं त्याला खेंचलं.

" चालतं कसं ? असं वळणावर या कीं. चालवायचं ठरवलं म्हणजे सगळं चालतं. उगीच नाहीं तुमच्या कॉलेजातल्या पाटलाचं कॅन्व्हसिंग केलं मागच्या वर्षी. दोन महिने त्याच्या नांवावर क्लबातलं जेवण सुटलं— "

" पण तेवढ्यानं काय भागणार ? "

" तेवढ्यानं ? चार महिन्याच्या दुधाचे पैसे निघाले. पण तो आपला एक भाग झाला. मॅट्रिक झाल्याबरोबर श्रीमंताची मुलगी सागून आली. साऱ्या शिक्षणाचा खर्च करायच्या अटीवर मुलगी न बघता लग्न करून टाकलं. अन् शिक्षण संपेपर्यंत त्यांनी आपली लेक संभाळली पाहिजे हें पण त्यांना सागितलं."

" तें तुमच्या समाजात शक्य असेल. प्रत्येकाचं अस जमणार आहे थोडंच ? तुम्ही नशीबवान् आहांत त्या बाबतींत. "

" इतकी घाई नको जोशीबुवा. मी नशिबाला पुरून उरलोंय्. मागच्या सालीं नापास झाल्यावर सासरा म्हणायला लागला ' आम्हीं पाच वर्षं खर्च केला – आमची जबाबदारी संपली ! पण सासरा वकील असला तरी मी त्याचा जावई होऊन राहिलेला. मी सागितलं शिक्षण संपायची अट आहे. ती पुरी झाली तर ठीक. नाहींतर माझं मी बघून घेईन. पण मग तुमच्या मुलीचा मी कोणी नव्हे. "

" पण असं करणं बरं का ? त्या मुलीचा काय अपराध ? "

" तें मला ठाऊक नाहीं. लग्नाच्या आधीं कुठं मीं तिचं रंगरूप बघितलं होतं तर आता अपराध बघायला जाऊं ? जोशीबुवा, जगात अडचणींत पडलेलीं माणसं खूप असतात. त्या साऱ्यांच्या अडचणींतनं आपण वाट काढू असला मीपणा कशाला हवाय ? सासऱ्याचं भाडण झालं अन् माझा त्या घराशीं संबंध उरला नाहीं. "

" मग आता यंदा काय करताय् ? "

" यंदा करायचं काम ? नशिबवान् आहे ना मी ! नशिबाला वळवायचं

काम माझं. आमच्या मराठासमाजाच्या एक-दोन संस्था आहेत त्यांच्याकडे वशिले लावले. चार दोन, रावसाहेब–रावबहादूर होऊन बसलेले लठ्ठ पगाराचे अधिकारी गाठले, अन् प्रत्येकाला सांगितलं ‘ तुमच्याकडून मिळेल तेवढीच मदत ’ – असे बक्कळ दोन वर्षं पुरतील इतके पैसे काढले. त्याच्यावर चालू आहे आमचं नशीब. ”

“ पण अशी मदत मागण्यात तरी लाचारीच नाहीं का ? ”

“ लाचारी ? – गरिबाला लाचारी नसते उगीच काहीं तरी वेडगळ कल्पनांनी डोकं बिघडवून घेऊं नका. त्यात फायदा तर काहीं नाहींच अन् यांत हो कसली लाचारी ? ह्या संस्था, हे रावसाहेब, रावबहादूर ह्यांनीं तरी पैसा आणला कुठनं ? यांच्या घरीं काहीं पैशांचीं झाड नाहींत. तुमच्या – आमच्यापाशीं नाहीं तो पैसा याच्याजवळ जमून किडत पडलेला आहे. त्यांनीं तरी घाम थोडाच गाळलाय् ? कुठंतरी वशिल्यानं नोकरी मिळवून किंवा कंत्राट साधून यानीं आयता मिळवलेला पैसा. आपणही त्यांच्याच पावलावर पाऊल टाकून आयता मिळवायचा. पैसा सांठवायचा जितका त्याना हक्क तितकाच तो त्याच्याकडून काढायचा आपला हक्क. हक्कात कसली लाचारी ? ”

“ छेः ! मला हें काहींच समजत नाहीं. ”

“ समजत नाहीं म्हणून तर तुमचे असे हाल होतात. गरिबी आहे म्हणून असं कुढून, आंखडून भागत नाहीं जोशी. तुमच्यासारखा राहिलों असतों तर यावेळपर्यंत मी हॉस्पिटलांतच काय पण ओंकारेश्वरावरसुद्धां पोंचलों असतों. पण मी ठरवून टाकलंय. सारा खटाटोप करायचा आपल्या सुखा-साठीं; तर तें मिळायला आधीं प्रकृति धड ठेवली पाहिजे. म्हणून शेरभर दूध घेतों रोज मी. तुमच्यासारखा विचार करीत रहायचं म्हणजे अनेक मध्यमवर्गीय कुटुंबांनासुद्धां दररोज शेरभराचा रतीब परवडत नाहीं म्हणून हळहळायचं. पण माझ्या हळहळण्यानं ना त्यांना दूध मिळणार ना माझी प्रकृति सुधारणार, म्हणून पैसे आहेत तंवर व्यवस्थित रहायचं अन् ते संपले कीं मिळवायच्या – म्हणजे श्रीमंत कूळ गांठायच्या–उद्योगाला लागायच. असं राहिल्याशिवाय निभाव लागत नाहीं जोशीबुवा— ”

" निभाव लागत नाहीं याचा तर मी अनुभवच घेतों आहे पण तुमच्या पद्धतीनं वागायला सुद्धां मनाची तयारी असायला पाहिजे. "

" असायला पाहिजे ! ती करावी लागते तुमच्या सारख्यांना. तुम्हा पांढर-पेशांत आणि आमच्यात फरक आहे तो हाच जोशीबुवा. तुम्हाला वेळेला जेवायला कमी पडलं तरी डबा वाढवायला तुम्ही काहीं बापटाला मागणार नाहीं. कां ? तर तो वेळच्या वळीं पैसे मागवतो आणि तुम्ही स्कॉलरशिप आल्यावर आपल्या वाटणीचे पैसे देता म्हणून ? असं का ? तुम्हा पांढरपेशाची ही संवयच आहे. पोटांत आग पडली तरी बाहेरून मेजवानीच जेवण झाल्याचा आव आणायचा. आमच्यांतले शाण्णव कुळीचे, गोषा पाळायसाठीं उजाडा-यच्या आंत पाणी भरतात त्यातलाच प्रकार ! तुम्हाला वाटत यानं दर्जा रहातो. सहाजिक आहे म्हणा – अन्नाच्या घासासाठीं घाम गाळून तो मिळवलाय कधी तुम्हीं ? दरिद्री म्हणता पण वेळेला खुर्पे–दोरी हातात घेऊन शेतात जायचो कधीं ताकद झालीय् तुमची ? तुमच दारिद्य आहे तें आयतं खाण्यात आहे. खऱ्या उपाशी पोटी निस्संग व्हायची वेळ कशी येते ती तुम्ही पाहिलेलीच नाहीं – पहायची रग नाहीं तुमच्यात— "

या वर्षावानं रघू थिजून गेला. डिकन्सच्या कादंबऱ्या वाचून वाटलेली हळहळ त्याला आठवली. त्या पुस्तकाहून हें जिवंत जिणं काय वेगळं होत ? आपल्या शेजारचं हें दृश्य आपण अजून पाहिलेल नाहीं याची त्याला खंत वाटली तो थोडाफार शरमूनच म्हणाला, " सावंत – खरं आहे तुम्ही म्हणतां तें. अशी अवस्था सुदैवान म्हणा माझ्या कीं दुर्दैवान म्हणा, टप्प्याच्या पली-कडची आहे. पण तुम्हीं हें सगळं पाहिलं आहे. अनुभवलं आहे. तुम्ही काय कराल ? – काय करणार आहांत या दारिद्र्यावर तोडगा ?—"

" मी ? – मी तोडगा करणार ? " सावंत खो खो हसूं लागला. " जोशीबुवा, बोलतांनासुद्धा तुमच्या तोंडीं 'तोडगा' येतो. पण या गोष्टीवर देवा तोडगे नसतात. उपाय असतात – निदान आहेत असं म्हणतात. पण मी त्या वाटेला जाणारा महापुरुष किंवा द्रष्टा पुढारी नाहीं. माझी कुवत मला ठाऊक आहे – माझ्यापुरतं मी ठरवून टाकलय्. तिसऱ्या वर्गात पास होऊन पदवी पदरांत पडली कीं माझी वाट मोकळी झाली, त्यानंतर चांगली

नोकरी मिळवून, आजपर्यंतचं सारं विसरून जायचं एवढंच माझं काम—तितकीच माझी ताकद."

" निदान तेवढं तरी तुम्हांला शक्य आहे. आधीं इंजिनियरला नोकरी चटकन् मिळते अन् त्यातून तुम्हांला जातीचा फायदाही मिळेल."

" माझ्या जातीचा भाव आतां तुम्हांला आठवतोय् जोशी. पण त्याच्या-बरोबर हेंही ध्यानांत टेवा कीं भर बाराच्या खानदेशी उन्हात अजून माझे आई-बाप कोरड्या चटणी-भाकरीसाठी राबतात तेही माझ्या जातीचे आहेत म्हणूनच पांढरपेशे असते तर कमींत कमी मधुकरी मागून, नाहीं तर भिक्षुकी करून राहिले असते. त्याच्या या कष्टाचा फायदा मला मिळेल असं कधीं तुम्हाला वाटेल का? मी त्याना या सगळ्या आठवणी विसरायला लावणार आहें. त्यासाठीं मला मिळेल ती ऐशीं-नव्वद रुपयांची नोकरी पत्करून भागणार नाहीं. निदान दोन-अडीचशेची तरी मिळवली पाहिजे. तेवढ्या-करता आतांपर्यंत पाहिलीं तशीं आणखीन् दहा-वीस रावबहादूर—दिवाण-बहादूरांचीं घरं पाहीन — वशिले लावीन. पण मला हव तें मिळवल्याशिवाय रहाणार नाहीं."

" मिळवाल बुवा — अगदीं शक्य आहे." एवढंच रघू म्हणाला. सावतानं सहजीं बोलताना केलेला भिक्षुकीचा उल्लेख खोलवर जाऊन त्याला झोंबला होता. तो सुन्न झाला. सावंताला चमत्कारिक वाटलं. तो पुनः म्हणाला.

" माझं पुराण नुसतं ऐकून 'तथास्तु' म्हणायसाठीं नाहीं सांगितलं मीं जोशी. तुमच्यासाटीं होतं तें सारं. तुम्ही आपल्या मानापमानाच्या भलत्या कल्पना सोडून द्या. कर्तव्याच्या भलत्याच स्वप्नांत रगू नका. बरे दिवस आल्यावर स्वप्न रंगवायला हवी तितकी सवड मिळेल. त्या वेळी आठवण राहिली तर खुशाल स्वप्न रंगवा. पण ही वेळ आपल्या पायाला चटके बसण्याची आहे. या वेळीं पायापुरती वहाण शोधली पाहिजे—"

" म्हणजे मीं काय करावं असं तुमचं म्हणणं ?"

" तुमचे डोळे अजून चांगले बरे झाले नाहींत. उगाच माझ्याकडचीं पुस्तकं मागून ते जास्त बिघडवून घेऊ नका. आता जानेवारी महिनासुद्धां संपत आलाय्. तेव्हां यंदां इंटर व्हायचा नाद सोडून द्या — गांवाला जाऊन

आराम करा. डोळे आणि प्रकृति सुधारा. आणि पुढच्या वर्षी नव्या दमानं अभ्यासाला लागा. ''

हें सारं ऐकून घेतल्यावर रघू तेवढ्यापुरता उठून आपल्या खोलींत आला. सावंताच म्हणणं त्यावेळेपुरतं कितीही पटलं तरी एकदम उठून गावाला जायचा त्याला धीर होईना. परीक्षा संपायच्या आधीं आपण गावीं गेलेलं वडलाना खपणार नाहीं हें त्यानं ओळखलं. रिकामं बसून वेळ काढायचा, त्यापेक्षा निदान् दुसरा वर्ग मिळवायचा रुखुटुकू प्रयत्न तरी करावा म्हणून त्यानं शिकस्त केली.

मोठ्या आशेनं तो परीक्षेला गेला. साने मास्तरांच्या आवडत्या सायन्सच्या विद्यार्थ्याचा मनोभंग आदल्या वर्षीच झाला होता. स्कॉलरशिपच्या गरजेनं त्याला आर्टस्‌कडे वळवलं होतं. बी. ए. ला गणित घेऊं असं स्वतःचं समाधान त्या वेळीं त्यानं केलं होतं. गणित हा हातचा विषय म्हणून त्यानं इंग्रजी—संस्कृत-वर भर दिला. दोन पेपर लिहून आल्यावर त्यानं सारी रात्र डोळ्याना विश्रांति दिली. दुसऱ्या दिवशीं भूमितीचा पेपर हातीं पडताच त्याच्या डोळ्यांपुढं काजवे चमकले. घन—त्रिकोणाच्या आडव्या उभ्या रेषा काढताना त्याचा हात थरथरला. सुन्नपणें त्यानं प्रश्नपत्रिकेकडे पहायला सुरुवात केली.

दुसऱ्या दिवशीं एम्. एस्. एम्. च्या डचाव डचाव करणाऱ्या गाडीनं रघूचं ओझं पुनश्च सातारा जिल्ह्यांत आणून टाकलं. पुणं सोडताना एकाही माणसाशीं तो धडपणें बोलला नव्हता. त्यानं घरच्या पत्त्यावर पत्र पाठवाव म्हणून बापटानं त्याला पुनः पुनः सांगितलं. पण रघू त्याला नुसत 'हो' सुद्धां म्हणाला नाहीं.

× × × ×

सुट्टीचे दोन महिने रघूनं डोळे दुखण्याच्या सबबीवर घरांत बसून काढले. सकाळीं दोन तास आणि संध्याकाळीं अर्धा-पाऊण तास कृष्णेच्या डोहात डुंबून डोळ्याना थंडावा आणायचा म्हणून तेवढा वेळ तो बाहेर काढीत असे. बाकीच्या वेळांत किरकिऱ्या बाळाशीं खेळावं, त्याला इसापनीति किंवा रामायण—महाभारतांतल्या गोष्टी सांगाव्यात, फारच झालं तर जुना पत्त्यांचा जोड काढून वेळखाऊ पेशन्सचा डाव मांडावा आणि कुणीकडून एक

दिवसाची विश्रांति पदरांत पडली असं समाधान मानावं, असा क्रम चालला होता. खेडेगावच्या टीचभर जगांत देखील काय चाललंय याची दखल त्यानं घेतली नाहीं.

जून महिना उजाडला तशी कृष्णंभटजींची गडबड सुरू झाली. " रघू, तूं आतां पुढं काय करणार ? पुण्याला रहायची सोय होईला का ? किती पैसे लागतील ? " अशा चौकशा करायला त्यांनीं सुरुवात केली. रघूनं ' इतक्यानच काय गडबड आहे ' हें ठरवलेलं उत्तर दिलं. त्याच्या कोशांतनं ' पुणें ' हा शब्दच निघून गेला होता. बंगल्यांतल्या एका खोलींत दोन वर्षं अलिप्तपणें राहून आणि त्यापेक्षां त्या रहाण्याचा परिणाम अनुभवून तो थंड झाला होता. हजारों विद्यार्थ्यांच्या गर्दींत तो कुणाचाही जिव्हाळा कमावूं शकला नव्हता. पाण्यान पोहून कोरडं रहाण्याचा हा प्रयोग आपल्याला मानवणारा नाहीं आणि त्याहिपेक्षां परवडणारा नाहीं हें त्याचं मत पक्कं झालं होतं. वर्षाची हजिरी भरून झालीच आहे, तर आतां कशाला खर्चांत आणि दगदगींत पडा ? या वृत्तीनं त्यानं ' पुढचा ' विचार करायचंच सोडून दिलं होतं.

पण रघूनं विचार करायचं सोडलं असलं तरी त्याच्याबद्दलचा विचार इतर पुष्कळजण करीत होते. पुण्याच्या अलिप्त जीवनाशीं अगदीं कर्करेषेत विरोध करणारी चौकसखोरी, खेडेगावांत हमेशा आढळतेच. त्यातून भटजींचं घर तर बापाचा पीळ आणि लेकाची हुषारी या दोहींमुळं डोळ्यावर आलेलं. " आतां भटाचं पोर घरात राहिलं " इथपासून ते " स्वतंत्र राहून मजा करण्यात दिवस घालवले असतील अन् आतां डोळ्याच्या आजाराचं निमित्त सागून मारवासारव चालवली आहे " इथपर्यंतचीं वेगवेगळीं मतं इनामदाराच्या अड्ड्यात नित्य नव्या जोमान तयार होऊन ठेवलीं जायचीं. तीं भटजींना तर ऐकायला मिळायचींच पण त्यांतून रघूही सुटला नव्हता. रघू नदींत डुंबत असतां एक दिवस इनामदाराचा भाग्या गडी पाण्यावर आणलेल्या आपल्या म्हसराना म्हणून म्हणूं लागला, " हीं मसरं बसून बसून किस्ती बसत्याल पान्यांत ? पान्यातलं मसरूं कवातरी भाईर यायचंच. उगी पान्यांत ठिवून घा शेर दूद देतया म्हणून कशाला सांगावं ? आपली ती शेराची कासंडी खंगळून ठेवावी." रघूला त्या वेळीं या आगापीछा नसलेल्या

बोलण्याची गंमत वाटली आणि म्हणूनच तें त्याच्या लक्षात राहिलं. आपल्याशीं त्याचा बादरायण संबंध असेल अशीसुद्धा शंका आली नाहीं. पण भटजींनी कॉलेज उघडायच्या वेळीं त्याला निक्षून सांगितलं, "तूं वाटेल तें कर. पण आता गावात राहूं नकोस. नुसता अभ्यास करायचा असला तरा कुठं शहरात जाऊन कर. तूं इथं राहिलास तर तुझं शिक्षण संपलं. भटाचं नाक खालीं झालं म्हणून मला गावातले लोक बेजार करतील. आताच मी जिकीरीला आलोंय् –"

"बर; जाईन मी लवकरच. पण आधीं माझे डोळे तरी पुरते बरे होऊं द्यात." एवढ बोलून रघू गप्प बसला. इतके दिवस घरात बसून तरी भागत होत. आता घरात सारखा डोळ्यापुढ दिसलों तर वडील पुनः तोच विषय केव्हा काढतील याचा नेम नाही. म्हणून रघू गुपचूप काखोटीला एक पुस्तक मारून फिरायच्या निमित्तानं लांब कुठल्या तरी शेतात जाऊन बसूं लागला. पेरण्याच्या तयारींत असलेल्या लोकाच्या हालचाली निरखून पहाण्यात त्यानं वेळ घालवायला सुरुवात केली. मृग संपला तरी अजून पावसान तोंड पाडलं नव्हतं. ऊन तावत होतं. जितकं रान तापेल तितका पाऊस लवकर सुरू होईल अशा आशेनं शेतकरी त्या भर उन्हात मेहनतीचा नेट करायचे. अंगातन घामाच्या धारा वहात असताना नांगराचं तास धरून मागनं संथपणें चालणाऱ्या त्या खऱ्याखुऱ्या भूदेवाना पाहिलं कीं रघूला पांडुरंग सावताचं बोलणं वरचेवर आटवायचं; मनात खूपशी खळबळ व्हायची आणि मग त्यानं तोंड फिरवून 'वेणीसंहारा'चं पुस्तक उघडायच.

कर्ण–अश्वत्थाम्याचं भांडण वाचायला रघूनं सुरुवात केली. जुन्या क्रमिक पुस्तकात त्यानं त्या उताऱ्याचं परशुरामतात्यानीं केलेल भाषांतर वाचलं होतं. त्या वेळीं न उलगडलेला अर्थ आता साकार होऊन नाचूं लागला. "दूत असेन किंवा दूतपुत्र असेन" म्हणणारा कर्ण आणि "हें पहा, जानवं तोडून ब्राह्मण्य फेकून दिलं" म्हणणारा अश्वत्थामा – दोघांच्याही बोलण्यातली धार रघूच्या काळजाला कापून जायला लागली. पुष्कळदा त्याला कर्णाच्या जागीं पांडुरंग सावंत आणि अश्वत्थाम्याच्या जागीं स्वतःहून वेगळा असलेला रघू जोशी दिसला. पण त्या वेगळ्या दिसण्यानंच त्याला विषण्ण केलं. रघूला असं होणं जमेल का? जानवं तोडून ब्राह्मण्य तुटलं असं आज कोणी – निदान

ज्यांचा संबंध पोंचतो ते, मानणं शक्य आहे का ? पांडुरंग सांवताबरोबरचा रघू लुप्त व्हायचा. असलेल्या रघूच्या जोडीला ताया चांभार यायचा. त्यानं मागल्या वर्षी मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर ‘ सत्कार ’ देऊन, आतां मुंबईला पोस्टांत नोकरी करायला जातों म्हणून सांगितलेलं आठवायच. मिळालेल्या अपयशापाशीं आशेला पूर्णविराम द्यावा अशी इच्छा प्रबल झाली. इतक्या उशीरा केसरींत आलेल्या आडगांवच्या शाळेंतल्या ‘ वॉंटेड ’च्या एक-दोन जाहिराती पाहून रघूनं आपल्याकडून गुपचूप अर्जेही करून टाकले.

त्याच्या या नसत्या उद्योगाचा भटजींना सुगावा लागला; आणि त्यांनीं आपला जुना रुद्रावतार रघूला दाखवला तेव्हां तो थक्क झाला. आपलं हें करणं भटजींनाच काय गावांतसुद्धां कुणाला कळेल अशी त्याला शंका आली नव्हती. पण इंग्रजी पत्ता लिहिलेलीं पाकिटं हीं खेडेगांवच्या पोस्टांत सहजीं आढळणारी चीज नव्हती. त्यामुळं पोस्टाचा चार्ज असलेल्या मास्तरांनीं तीं पाकिटं पाहिली तेव्हा बाजूला ठेवून दिली आणि आपल्या हस्तकौशल्यानं तीं उघडून बंद्कडून मजकूर समजून घेतल्यावर दुसऱ्या दिवशीं रवाना केली. त्यानतर सहाजिकच अड्ड्यांत चर्चा झाली. “ भटाचं पोर कॉलेजांत गुण उधळून आलंय नक्कीच. आता सारं संपलं. लागलंय अर्ज खरडायला— ” या चर्चेचा वास भटजींना लागला होता.

वडलाच्या रागावण्यापेक्षां त्यांना झालेला ताप रघूला अधिक जाणवला. आपण वडलाना अपकार मात्र करू शकलों म्हणून स्वतःवरच संतापून तो भरकटत दूरवर गेला. कुठं चाललोंय् याला त्याचं भान नव्हतं. पण इतक्या लांब आपल्याला ओळखणारं कुणी भेटणार नाहीं, कुणीही आपल्याला हटकणार नाहीं असं समजून तो तंद्रींत चालला होता.

‘ रघुनाथ ’ या अपरिचित हांकेनं तो थबकला.

थोड्या अंतरावर. विहिरीच्या धावेवर उभा राहिलेला पैलवानी थाटाचा एक गृहस्थ हाकेबरोबरच हात हालवून रघूला बोलवीत होता. जवळ गेल्यावर सुद्धा रघूनं त्याला ओळखलं नाहीं. “ कां ? लई निरखून बगतुयास ? अन् असा बावरलास गा कशापाई ? — श्येरांत राहून पार वळख इसरलास वाटतं ” पैलवानानं रघूवर सरबत्ती केली अन् खसकन् त्याच्या दंडाला धरून आपल्या-

जवळ बसवलं. त्यानं सांगितल्यावर रघूला कळलं कीं आपला लहानपणाचा मैतर रंग्या – आतां रंगराव पैलवान होऊन आपल्या शेजारीं बसला आहे.

" काय मर्दा – इक्ता कसा रं गावाला इसारलास ? आन् ही काच कशाला लावलीयास डोळ्याला म्हाताऱ्यावानी ? त्वांड आखडूं नगस. साग सारं बैजवार. घ्ये, पान घ्ये अदुगर. आन् मग साग दमानं—"

" मी पान खात नाहीं पैलवान—"

" छल् ! मला सागतुयास ! पान खात न्हाइस तर काय पाडरी बिडी वडतुस व्हय ? मजीपाशीं विडी–बिडी गवसायची नाय. होवं तर चिलीम दान— "

" नाहीं नाहीं. मी ओढत नाहीं काही. "

" तुला झालया तरी काय रघुनाथ ? पान खायाचं न्हाई, तंबाकू वडायची न्हाई – मग तू करतुस तरी काय ? अजून काय शाळंतलं प्वारच न्हाईलास जनूं ! मजीपाशीं न्हाइ चालायचा असला नाजूक नखरा. पान तरी खायाच पायजेस तूं— "

रघूनं चाचरत चाचरत अखेरीला पान घेतलं. अन् त्याचा अगदीं नाजूक नरम बायकी विडा करून तोंडांत घातला.

" काय पान खातुयास त्येका ? बायाबापड्या लावत्यात तसा मदूच्या बोटानं एवडासा चुना काय लावलास – इक्ता कसा र नाजूक तूं ? "

" मला संवय नाही पैलवान— "

" आता कवा हुयाची – म्हातारा झाल्यावर ! बरं, त्ये न्हाऊं दे, लई दिसांनीं मिळालायास तर बोल तरी सार. झालं न्हवं का आता शिकून सारं यास् – पयास ? आता कामाला कुठं जाणार हैस ? "

अजून शिक्षण संपलं नाहीं हें रघूनं सागितल्यावर रंगरावानं त्याच्या पाठीवर चांगलीच थाप मारली. अन् मग रघूला कळलं कीं रंगरावानं आता मास्तराचा मळा केला होता; त्याच्या घरातून रघूचं शिक्षण संपल्याची बातमी रंगरावाला लागली होती. आता तो कुठं तरी नोकरी धरील हें सुद्धा कळलं होतं. रघूनं त्याला समजावून सागितल्यावर त्यान आपलं भाबडं मन उघडं केलं. " म्या म्हटलं रघूचं शिकायच झालं. ब्येस झालं. आता चागली

चाकरी लागल; बान लईच कष्ट काढलं. त्येला वाईच इसावा मिळल रघूकडनं. झकास बेंड लावून लगीन बी हुईल. आन् मग कवा तरी जुना मैतर म्हनून आपल्या गाववाल्याकड सिनिमा – जत्रा बगाया जायाला गावल मला. तूं कुठंबी ग्येलास तरी कुस्त्याचा फड असला की मी ततं याचाच्. पर तूं ह्ये र आक्रीच सांगतुयास—"

"पैलवान, तुम्ही करताय मास्तराचा मळा. त्याचं आमच कसं आहे तें काय तुम्हाला ठाऊक नाहीं ? तुम्ही त्याचं म्हणणं खरं धरायचं नव्हतं—"

"त्ये ठावं हुतं रं मला. पर म्या म्हटलं त्येच्यात कशाला खोटं असतया ? मला न्हाइ उमागला त्येचा बामनी तिडा—"

"नाहीं उमगला तेंच बरें. पण तुमचं ठीक चाललंय ना पैलवान ?"

"आमचं काय नागर गड्याचं ? आमच कोन वाकडं करनार हाय ? याक वावार सुटल तर दुसर करायच. मागच्या सालचा मालक म्हनाला, 'रंग्या तुज्या पैलवानकीन पिकाची अब्दा हुतीया ' म्या त्या वक्तीच तोंडावर सांगितलं – होवं नर उब्या पिकाची खोती व्या बमल्या बैटकीला, पर माजी पैलवानकी काडायचं काम न्हाई !"

"हेंच चांगलं पैलवान अंगात ताकद आहे तंवर कुणाचं ' अरे ' म्हणून घ्यायचं कारण पडत नाहीं तुम्हाला."

"वा रं मर्दा ! तूं येक बामन भेटलास मला चांगला म्हननारा. न्हाइ तर सारी ' रंग्या ' म्हनत्यात. पर तूं रं असा का ? तुला काइ तरी झाल्यावानी आज सारं बोलतुयास ? आरं – तुरं करायचं सोडून ह्ये कुटं शिकलास ? का श्येगात न्हाऊन गावाला परका झालायास ?"

"तसं नाहीं पैलवान. पण काहीं झालं तरी आज तुम्ही आपल्या पायावर उभे राहून संसार चालवताय् – मी मात्र अजून दुसऱ्यावर अवलंबून आहें."

"छल् ! मी पायावर हुबा न्हातों अन् तूं काय डोक्यावर ? काईच्या बाईच बोलतुयास. आरं आमची धाव बादापावतर. आम्हीं कंदी म्होरं बगितलंच न्हाइ. तूं तर मर्दा शिकून म्होरं निगालास. गावचा येक गडी अन् ह्या रंग्याचा मैतर फुडं चालला म्हून मी मिशीवर पीळ भरून ताठपनी

सांगतुया साऱ्यांस्नीं – अन् तूंच असा कान का पाडतुयास ? कशापाई रं ? ह्ये चागलं न्हवं रघुनाथ. ''

रंगरावाच्या बोलण्यांत अज्ञान आणि अभिमान यांचं विचित्र मिश्रण रघूला दिसलं. आपला मित्र शिकून मोठा होतोय् एवढीच बाब त्याच्या अभिमानाला पुरेशी होती. तो काय शिकतोय्, कसा शिकतोय् याचा गंध त्याला नव्हता अन् त्याची जरूरही नव्हती. तेवढ्यावरच तो रघूची कुठलीही अडचण किंवा सबब महत्त्वाची मानायला तयार नव्हता. त्याच्या वृत्तींत खेडेगावच्या निरागसपणाचा एक पैलू रघूला दिसला. रंगरावाच्या निरागसपणांत, कृष्ण-भटजींच्या निर्वाणीच्या सांगण्यात आणि टवाळखोर गांवगाड्याच्या चर्चेत – सर्वत्र साधारण एकच भाग होता. तो म्हणजे खेडेगांवातला मुलगा शिकायला बाहेर पडला म्हणजे चांगली चाकरी लागायसाठीं हवं तेवढं शिकायचा अन् मग चाकरी लागून 'मोठा' झाला म्हणजे कधींतरी सणा-सुदीला गांवांत दिसायचा. असं झालं कीं त्यानं गांवाचं, घराचं नाव काढलं ! त्यात थोडासाही फरक पडला तर पोरगं शहरात राहून वाया गेलं !

म्हणूनच रघूला फार दिवस आपल्या गांवांत रहातां आलं नाहीं. जुलै महिन्यांत शिवपुरला जायचा त्याचा बेत पक्का झाला. आणि त्या वेळीं त्याला आठवलं कीं, बापटानं आपल्याला पत्र पाठवायला पुनः पुनः बजावलं होतं. आजपर्यंत एका शब्दानं त्यानं आपल्या डोळ्याबद्दल किंवा पुढच्या कार्यक्रमा-बद्दल चंदूला कळवलं नव्हतं. आता तीन महिने होऊन गेल्यावर अचानक गरजेच्या वेळीं त्याला लिहिलं तर तो काय म्हणेल ? दोन वर्षे त्याच्या सहवासांत राहून, त्याच्या मदतीचा घ्यायचा तितका फायदा घेतल्यावर त्याला साधं तीन पैशाचं कार्डही आपण टाकलं नाहीं याबद्दल तो काय म्हणत असेल ?

पण जितक्या सहजपणें हे विचार मनांत आले तितक्याच सहजपणें रघूनं ते काढून टाकले. तो श्रीमंताचा मुलगा. त्याला कशाला आपली आठवण होते आहे ? आपण गरजू म्हणून लिहिणार आहोंत. पांडुरंग सावंतान त्याला एकदा सांगितलं होतं. 'तुमचा कंपॅनियन बापट चांगला श्रीमंत दिसतो— त्याच्याकडून मिळेल ती मदत खुशाल घ्या. तुम्हांला आमच्यासारख्या श्रीमंत

मुली सांगून आल्या नाहींत तरी निदान श्रीमंत मित्र तरी आहेत – आप-ल्याला कर्तव्य आहे श्रीमंतीशी – ' रघूनं चटकन् चंदू बापटाला पत्र लिहून आपण येत असल्याचं कळवून टाकलं. त्याचं उत्तर आल नाही तरी त्यानं पर्वा केली नाहीं. समक्ष गाठ पडेल तेव्हा पहाता येईल म्हणून निघायची तयारी केली. भटजींनीं हातावर ठेवलेल्या नोटा किती आहेत हें सुद्धा न पहातां त्यान त्या खिशात कोंबल्या.

× × ×

चार दिवस सकाळ–संध्याकाळ निरनिराळ्या खानावळींतल्या अन्नाची चव घण्याचा प्रयोग रघूनं केला आणि खानावळीतलं अन्न हें आपल्यासाठीं नाही अस ठरवून टाकलं. मेन–रोडच्या एका वाड्यातली खोली घेऊन त्यानं जुजबी सामान जमवलं आणि स्वावलंबनाची कास धरून स्वतःच मनपसंत जेवण बनवून टाकण्याचं नक्की केल. यंदा वेळ भरपूर आहे – उगीच कशाला खानावळीची भर करायची असं समाधान त्यानँ मानलं. खर म्हणजे सुखवस्तु माणसाच्या वृत्तीनं दुसरे काहींही कष्ट न करतां रहाण्याची अजून त्याची तयारीच झाली नव्हती—

कॉलेजात जायची काहीही आवश्यकता नव्हती, तरी निदान वर्गात अभ्यास कुठवर आलेत तें पाहून याव म्हणून त्यानं कॉलेजवर एक चक्कर टाकली. तास चालू होते. आपोआप त्याचीं पावलं जिमखान्याच्या इमारतीकडे वळलीं. थोडा वेळ वर्तमानपत्राची चाळवाचाळव करण्यात त्यानं मन रमवलं. परकेपणाच्या जाणिवेनं तो चुळबुळत होता. आपण इथं का, अशी कोणी चौकशी तर करणार नाहींना, या शंकेनं तो मधून मधून चोहीकडे पहात होता. आणि त्याच वेळीं कोणी तरी ओळखीचं भेटून बोलायला मिळेल अशी आशा त्याला वाटत होती. असाच तो इकडे तिकडे पहाताना कॅरमच्या टेबलापाशीं बसलेल्या तीन मुलांचें लक्ष त्याच्याकडे गेल. तीं मुलं जणू त्याचं वाचन संपायची वाटच पहात होती "काय मिस्टर, येणार काय ? एक जागा रिकामी आहे — "

" येतों कीं. पण माझा खेळ बेताचाच आहे. "

" इथं कोण चॅम्पियन् लागून राहिलाय् ? या तर खरे—"

रघूनं मोकळी खुर्ची पटकावली. त्यांचा खेळ सुरू झाला. सारेच नवथर; त्यामुळं खेळापेक्षा उत्साहच जास्त होता. पण रघूला हवा तसा वेळ चालला होता. मोठ्या मजेंत आठ–नऊ डावात एक गेम कशीवशी संपली. तेवढ्यांत दुसऱ्या तासाची घंटा झाली. गडबडीन तीं एफ्. वाय्. मधलीं ' बावळटं ' तासाला निघून गेलीं. अन् सुटलेल्या मुलाचा लोंढा जिमखान्याच्या इमारतीकडे वळल्याचा गोंगाट ऐकूं येऊं लागला. आता नक्कीच कोणीतरी ओळखीचं भेटेल – पण कोण भेटेल ? त्याच्याशीं काय बोलायचं हें रघू आपल्याशींच ठरवीत होता.

तेवढ्यांत कॅरमच्या टेबलाकडे यायला निघालेला चार मुलीचा घोळका मधेंच थाबून हलक्या आवाजात आपसात कुजबुजूं लागला. त्याची अडचण ओळखून म्हणा की स्वतःच अडचणल्यासारखा होऊन म्हणा, रघू आपल्या खुर्चीवरून उठून दुसरीकडे जायला निघाला.

" तुमचं आधी कुणाशीं खेळायचं ठरलंय का जोशी ?—तसं असलं तर आम्ही वर्तमानपत्र वाचतों— "

" नाहीं – तस नाहीं काही. मी उगीचच बसलों होतों. " कशीबशीं दोन वाक्यं बोलून रघू वर्तमानपत्राच्या बाजूला पुनः सटकला. त्यान यमू बापटला ओळखलं होतं तरी तिच्याशी बोलावं की नाहीं याबद्दल त्याचं काहीं ठरलं नव्हतं. वर्तमानपत्राचं निमित्त केलं तरी त्याचं लक्ष कॅरमच्या टेबलाकडे होतं.

" बरं बाई बापट, तूं विचारल्याबरोबर कॅरम मिळाला. नाहींतर आपण आलेल्या दिसलों की मुलाच्या खेळाला जोर चढतो — "

" अग पण तो काय एकटाच खेळणार होता ? "

" तें नको सांगूस – पार्टनर येतोय् म्हणून पीसेस् लावण्यात वेळ काढायचा अन् दिसेल त्या दुसऱ्या विद्यार्थ्याला – ' किती वेळ लावलास पार्टनर ' म्हणत हाक मारायची. हें जसं कांहीं तुला ठाऊकच नाहीं—"

" पण हा मात्र बापटनं विचारल्याबरोबर उठून गेला – काय ग, तुझ्या ओळखीचा आहे वाटतं यमे ? "

" झोपेंत होतीस कीं काय ? का अगदीं नावाप्रमाणं उषास्वप्न रंगवीत होतीस ? "

" ओळख तुझी – अन् स्वप्न मी कशाला रंगवूं ? "

" मग विचारलंस कसं ओळखीचा आहे का म्हणून ? मीं सरळ त्याला जोशी म्हणून नांवानंच हाक मारली होती. "

" खरंच का त्याचं नाव जोशी आहे ? मला वाटलं कुणाचंही नाव ठाऊक नसल कीं त्याला ' जोशी ' किंवा ' कुलकर्णी ' म्हणून हांक मारली तर ती बहुशः बरोबर ठरते, म्हणून तूं म्हणाली असशील— "

" शहाणीच आहेस ! बाकी तूं आलीस परगावासनं; तुला काय ठाऊक म्हणा ! तो आमच्या शाळेंतला स्कॉलर होता. अन् दोन वर्षं पुण्याला आमच्या चंदूच्या खोलींतच कम्पॅनियन् म्हणून रहात होता— "

" इतकं सगळं सांगितलंस – पण तुझी ओळख किती आहे तें कळलं नाहीं अजून. कां काहीं— "

" माझी ओळख ? माहिती आहे मला अन् त्यालाही – यालाच ओळख म्हणणार असलीस तर खूप जुनी आहे. "

" मग यंदा या कॉलेजांत आलाय् वाटतं पुनः ? कोणत्या वर्गात आहे ग तो ? "

" इतकी माहिती हवी असली तर तुझी तूंच विचार ना. बोलवूं का त्याला इकडं ? मला काहीं ठाऊक नाहीं. आज तर मी पहातें आहें इथं पहिल्यांदा— "

" मार थापा— "

त्याच्या या हलक्या आवाजातल्या गप्पा किती वेळ चालल्या असत्या कोणास ठाऊक. पण तेवढ्यात एक विद्यार्थी मोठ्यानं म्हणाला " अहो, तुम्हांला गप्पाच मारायच्या असल्या तर तेवढा बोर्ड मोकळा करून द्या ना आम्हांला " " वा ! आम्ही अजून खेळायला सुरुवातसुद्धां केली नाहीं – " त्यांचा खेळ सुरू झाला. तो चिवचिवाट थांबलेला पाहून रघूनं पुनः 'टाइम्स' मध्यें डोकं खुपसून वाचण्याचं ढोंग चालू केलं.

मधली सुट्टी संपून तासाच्या ओढीनं जाणारे विद्यार्थी निघून गेल्यावर, जिमखान्यांतल्या भकास शांततेचा कंटाळा येऊन, रघूनं आतां गांवांत परत जायला निघावं म्हणून टाइम्सला रजा दिली. कॅरमच्या टेबलाजवळ यमू बापट एकटीच बसलेली होती. रघूला निघालेला पाहून, तीही गडबडीन पुस्तकं गोळा करून उठली अन् तसं करताकरताच तिनं बोलायला सुरवात केली —

" हें हो काय जोशी ? तुमच्यासाठीं मी थांबलें अन् तुम्ही आपले परस्परच निघालां ? "

" मला वाटलं – तुम्हांला तास नाहीं म्हणून तुम्ही थांबलाय् "

" नाहीं कसा ? पण आज मारली तासाला बुट्टी "

माझ्यासाठीं काय ? असं विचारायचं रघूच्या जिभेवर आलं होतं; पण त्यानं प्रत्यक्षात विचारलं, " कसला तास होता ? "

" सिव्हिक्सचा. माझ्याजवळ नोटस् आहेत मागल्या वर्षाच्या—"

" म्हणजे तुम्हीही यंदा इंटरलाच आहात ? "

" हो. नाहीं तर काय, माझ्यासाठीं बी. ए. ला सिव्हिक्स थोडंच नेमणार आहेत ! आमचं काय ? – एका वर्षांत इंटर थोडंच जमतंय आम्हाला ! "

रघू चरकला. ही पोरटी मनापासून बोलत आहे कीं आपल्या वर्मावर घाव घालायसाठीं साळसूदपणें धक्का देते आहे ? —त्याला कळेना. त्यानं नुसता हुंकार भरला अन् मग कांहीं तरी विचारायचं म्हणून यमूला विचारलं.

" चंदू कुठं आहे हल्लीं ? मी त्याला लिहिलं होतं – पण त्याचं काहीं उत्तर आलं नाहीं – "

" तो केव्हांच पुण्याला गेला. एम्. एस्सीच्या टर्मस् भरायसाठीं. तुमचं पत्र आलं तेव्हां तो इथं नव्हताच – मग उत्तर कसा पाठवणार ? पण फार लवकर पाठवलंत हो पत्र ? इथं होता तंवर तो वाट पहात होता—"

" नाहीं जमलं आधीं – लिहायला कांहीं मजकूरच नव्हता. इथं यायचं ठरल्यावर आठवणीनं पाठवलं – "

' पण पत्रात लिहिलं तसे आमच्याकडे आलां कां नाहीत ? मी वाचलं होतं तुमचं पत्र. वाटलं तुम्ही उतरायलाच याल—"

" पण चंदूचं पत्र आलं नाहीं. तेव्हां तो इथं नसेल – मग कशाला उगीचच – म्हणून नाहीं आलों, झालं "

" म्हणजे चंदू नसला तर आम्ही सगळे ' उगीचच ' होय ? हें चांगलंच म्हणायचं ! "

" तसं नाहीं हो– " पण याच्यापुढ काय सांगायचं तें न सुचून रघूनं विषय बदलला, " पण आता तुम्हाला तास नाहीं ना ?—मग इथं कशाला बसायचं त्यापेक्षां चालतच जाऊंया ना गावात. बोलत बोलत चालताना काहीं तेवढं वाटायचं नाहीं— "

" इतक्या लांबवर तुम्ही चालणार ? "

" त्यांत काय आहे ? अगदींच मेणाची बाहुली नाहीं मी. फार तर आज संध्याकाळच्या फिरण्याला चाट. "

आणि तीं दोघं जिमखान्यांतून बाहेर पडलीं. कॉलेजच्या फाटकातून बाहेर पडेपर्यंत काहींच न बोलता अंतर ठेवून दोघंही चालत होतीं. रस्त्याला लागल्यावर वाट पाहून यमूनंच सुरुवात केली.

" चंदूनं सांगितलं तुमच्याबद्दल सगळं. आतां डोळे पुरते बरे झालेत ना ? यंदासुद्धां थोडा बेतानं अभ्यास करा – नाहींतर करून ठेवाल काहीं तरी घोटाळा – "

" छे: ! यंदा घोटाळा—बिटाळा काहीं नाहीं. यंदाचीं पुस्तकं सुद्धा अजून पाहिलीं नाहींत. " रघून सफाईनं थाप मारली.

" हें दुसऱ्या कुणाला सागा. मागच्या वर्षी पुस्तकं दडवून ठेवल्यावर तुम्हीं काय काय केलंत तें सगळं चंदूनं सांगितलंय् "

" मागच्या वर्षीचं मागच्या वर्षी खतम्. पुण्याबरोबरच तें सगळं मुळा–मुठेंत सोडून दिलं. यंदा मीं फार मोठा घडा घेतलाय्. कोणचीं पुस्तकं नेमलींत तेंसुद्धा अजून ठाऊक नाहीं मला. कुणाला तरी विचाराव म्हणून कॉलेजवर आलों होतों. "

" खोटं बोलायची अन् थापा मारायची संवय नसली म्हणजे हें असं होतं. " म्हणून यमू मनापासून हसली. " अहो, पुस्तकांच्या याद्या गावा-तल्या पुस्तकांच्या दुकानांतसुद्धा पहायला मिळतात. त्यासाटीं चार मैल लांब कॉलेजवर खेप टाकावी लागत नाहीं. "

" पण दुकानात नुसत्या याद्या मिळतील अभ्यास किती झालेत, प्रोफेसर कशावर भर देताहेत, याचाही सुगावा असलेला बरं असतं. "

" पण तेंसुद्धां बंगल्यावर आला असतात तर कळलं नसतं का ? इथं ' कुणी तरी ' भेटेल अशी कल्पना करायची. पण चंदूची ओळख, माझा भाऊ म्हणून काढल्यावरसुद्धा बंगल्यावर यायचं नाही — मी खूप रागावणार आहें तुमच्यावर. "

" छान ! मला थापा मारायला येत नाहींत असं मघाशी उगीचच म्हणालात. पण तें आतां तुमच्या बाबतींनं मात्र खरं झालंय. रागावणारीं माणसं आधी सांगून रागावतात हें मी प्रथमच ऐकतोंय आज आणि इथं सुद्धा ' कुणीतरी ' भेटायचं त्या तुम्हीच भेटलात की—"

" बरं बरं ! पुरे झाली संपादणी. आता मात्र बंगल्यावर आलं पाहिजे—"

" आता म्हणजे कधीं ? मी तर आजच बंगल्यावर येणार होतों."

" तें ठाऊक आहे मला — इतक्या दिवसात आलात तसेंच ना ? "

" अहो मला इथं येऊन पुरते आठ दिवससुद्धा झाले नाहीत. "

" गावात आल्यावर आमच्याकडे यायला तेवढे दिवस पुरत नाहींत वाटतं ? — आज सबब चालायची नाहीं. "

" सबब कुठली ? मी तर आजच येणार म्हणून तुम्हांला सांगितलं. आता थोडे का दिवस झालेत कॉलेज सुरू होऊन. निदान एकदां पुस्तकं तरी पाहिलीं पाहिजेत — "

" म्हणजे तुम्ही येणार ते आपल्या पुस्तकांच्या कामासाटीं; असंच ना ? पण— "

" तें आपलं निमित्त हो. तुमच्या बंगल्यावर काय काम आहे म्हणून कुणीं विचारलं तर सांगायला तरी काहीं हवं ना ! "

" विचारणार कोण ? आतां माझ्या बरोबरच चला — पण पुस्तका-बिस्तकांना हात लावायचा नाहीं. फारतर लावून दाखवीन. नाहीतर तिथंच माझ्या खोलीची लायब्ररी करून वाचीत बसाल — "

" ती भीतीच नको मुळीं — मी तूं तरी अभ्यास असा फारसा करणार नाहीं. तुमच्यासारख्याच्या नोट्सवर भागवणार आहें. "

" वा ! वा ! ---आमच्यासारख्यांच्या नोट्स ! ऐकलं कुणीं तर चागलीच होईल माझी ! पण असं थट्टेवारी नेऊन चालणार नाहीं. यंदा मला नोट्स दिल्या पाहिजेत अन् दुसऱ्या टर्मला माझ्या डिफिकल्टीज पण सोडवल्या पाहिजेत — चंदू इथ नसला तरी मी काहीं ' उगीचच ' आपला हक्क सोडणार नाहीं. "

रघू यावर काहीं तरी उत्तर देणार होता. बोलत बोलत तीं दोघ गावापाशी आलीं होती. तेवढ्यात कॉलेज् सुटून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांच्या सायकली जवळ आल्याचा आवाज आला. रघूला न ओळखणारे एक—दोघे नुसतेच " आहे बुव्वा ! " म्हणून सटकले. कॅरमच्या खेळातलं त्रिकूट आलं त्यानीं मागं वळून पहायचा सपाटा लावला. आणखी कोणी म्हणालं, " आज गाडीचा पास विसरला वाटत — अरेरे, पाय दुखायला लागले असतील " सायकलींची माळ सपता संपता एकजण म्हणाला, " अशा वेळेला तेवढी आमची सायकल नेमकी पंक्चर व्हायची नाही. "

" काय आहेत तरी रत्नं ! " यमू तिटकाऱ्यानं म्हणाली. रघू काहींच न बोलता नुसतं थोडासा हसला. रस्ते फुटायची वेळ आल्यावर रघूचीं पावल आपोआप गावातल्या आपल्या खोलीच्या दिशेनं वळलीं तेव्हां यमू म्हणाली, " आमचा बंगला त्या बाजूला नाहीं हेंसुद्धां विसरलांत काय ? "

" अरेच्चा — माझं लक्षच नव्हतं." म्हणत तो तिच्या बंगल्याकडे वळला.

× × ×

त्या दिवशीं रात्रीं यमूनं दिलेल्या ' मर्चंट ऑफ व्हेनिस् 'ची जाडजूड प्रत वाचायला उघडल्यावर रघून एका दमात सगळाच्या सगळा पहिला अंक वाचून संपवला धावत्या वाचनात नाटकाचा आशय पुरेसा समजणार नाही ही कल्पना असूनही त्यानं ठिपण्या—अनुवादांच्या भागाकडे वळायच नाहीं

असं ठरवलं होतं. अंक पुरा झाल्यावर ' आज एवढा श्रीगणेशा पुरे ' म्हणून त्यानं मजकुराचा भाग उलटून टाकला. मागपुढं पानं उलटायचा उगीच चाळा चालवला. सुरुवातीच्या कोऱ्या पानावर कोरून उजवीकडे कलत्या बायकी अक्षरांत काढलेलं ' यमुना बापट ' हें नाव निरखून पहाण्यात चार–पाच मिनिटं घालवली. अक्षराच्या वळणाचा आणि स्वभावाचा संबंध असतो असं एक मत त्यानं ऐकलं होतं. त्या मताची आठवण यमूच्या अक्षराचं वळण न्याहाळताना व्हावी याची रघूला गंमत वाटली. बहुतेक साऱ्या मुलींचीं अक्षरं उजवीकडे कलतीं असतात म्हणजे त्याचे स्वभावही एकसारखेच असतात का ? आणि तेही अक्षराच्या वळणाप्रमाण उजवीकडे कलते ? – पण उजवीकडे म्हणजे कुणीकडे ? – राजकारणातल्या डाव्या–उजव्याचा उच्चार त्या काळात व्हायला लागला नव्हता. निदान प्रमुखपणें तरी मुळीच नव्हता. – मग काय उजवीकडे म्हणजे रंगरूपातल्या उजवीकडे ? पण ही रंगरूपाची चिकित्सा तर बायकांपेक्षा पुरुषाच्या स्वभावाशीं अधिक जोडली जाणारी. उजवीकडे हें नक्कीच. हो; आपल्या बोलण्यात मुलीचा, बायकाचा विषय आला कीं वय वाढणं, स्थळ पहाणं आणि लग्न होणं याशिवाय चर्चाच होऊं शकत नाही – आणि हिंदुकल्पनेप्रमाणं स्त्रियाच्या उजव्या बाजूला नवऱ्याच – पुरुषाचं स्थान असतं तेव्हा बायकाचा कल नेहमी उजवीकडे – छेः ! काय वेडगळ कल्पना आहे ! रघूनं एकदम तें नावाचं पान झाकून चारपांच पानं उलटलीं. शेक्सपियरचा म्हटला जाणारा लांब केसाचा फोटो पहायला त्यानं सुरुवात केली.

फोटो – शेक्सपियरचा फोटो – यमुना बापटच्या पुस्तकानला फोटो की यमू बापटचा फोटो आणि पुस्तकातला – वहींतला फोटो. यमू बापटच्या वहींतला फोटो ऊर्फ ' नूरजहान ' किंवा मस्तानी – पाटीमागच्या बाकावर बसायची धडपड – ' आय् लव्ह यू मिस्, गिव्ह मी अ किस् ' – इश्श ! माझा रुमाल पडला की बाकावर – बघ लेका कुणाला न सांगता वाचून झाल्यावर रुमालानं पुसल – बाकावरचा खडूचा रंग पुसला पण गालावर चढला – कॉलेजात गेल्यावर ' शालू ' भरला बरं का – ' काय आहेत तरी रत्नं ' – मी काहीं उगीचच आपला हक्क सोडणार नाहीं – टण् टण् टण् ..

रघूनं राजवाड्यांतले बाराचे टोले ऐकले – कसलीं वाक्य अन् चित्रं यांत

आपण गुरफटलों होतों – झोंप लागली तरी केव्हा ? – मग बाराचे टोले कसे ऐकायला आले ? अजून आपण कशात तरी गुरफटलोय्. असं म्हणत रघूनं सहजी चादर झटकली अन् कूस बदलली.

" साहेब – दूध. " रघू खडबडून जागा झाला. दूध इतक्या लवकर कसं आलं ? का उठायलाच इतका उशीर झाला ? डोळे चोळीत चोळीत त्यानं दार उघडलं. आठाचीं झक्क उन्हं बाहेर पसरलीं होतीं. घाईघाईनं दूध घेऊन, रघूनं सकाळच्या उद्योगाला सुरुवात केली.

त्या दिवशी रघूच सारं तंत्र बिघडलं. तो रहात होता त्या भागांत पहाटे पांचाला नळ येऊन उजडायच्या आत जात असे. बाहेरची सारी ऐट सांभाळतां सांभाळता रघूनं एक खाजगी वेळापत्रक ठरवून ठेवलं होतं. पहाटेच्या वेळी, कुणाचीही वर्दळ नसताना, शांतपणें आपल्या स्वयंपाक-खोलीच्यातलीं भांडीं घासून टाकायचीं अन् कपडे धुऊन अंघोळ उरकायची. सकाळ–दुपारच्या अभ्यासाच्या बैठकींत दहा वाजता वेळ काढून स्वयंपाक उरकायचा आणि संध्याकाळीं खूप लवकर बाहेर पडून भटकायचं. हा क्रम आज त्याला सोडायला हवा होता. कालच्या संबंध दिवसाच्या भांड्यांची रास पडली होती – म्हणजे होतीं तेवढीं भांडीं गुतून पडलीं होती. अंघोळ राहून गेलेली; रात्रीच्या अवेळीं झोंपनं डोळे तारवटलेले. अशा स्थितींत त्यानं कशीबशी सकाळच्या चहाची व्यवस्था पार पाडली. आता जेवणाच काय करावं याची विवंचना करीत तो आळसावून वळकटीला टेकून आढ्याकडे स्वस्थ पहात राहिला.

पावसाची उघडीप होती तरी कृष्णेला येऊन गेलेल्या पुरामुळं नदीला भरपूर पाणी होत. रघूनं कपडे गोळा करून नदीची वाट धरली. खूप दिवसानीं शहरात त्यानं खेडेगावच्या रहाणीचा मार्ग पत्करला. नदीवर गेल्यावर आरामात तासभर पोहून, लांब मैलभर खालीं जाऊन, चांगला दमून तो खोलीवर परत आला. पोहून आल्यावर त्याचा आळस निघाला. मेंदू काम करायला लागला. चहाचा आणखी एक डोस मारून त्यानं कपडे केले अन् बाहेर पाऊल टाकलं.

पण त्याला फार लांब जावं लागलंच नाहीं. राजवाड्यासमोरच्या चौकांत सायकलींना वाट देण्यासाठीं तो उभा असतांना, सायकलवरनं कांतिलाल

येत असलेला त्याला दिसला. त्यानं " ए कात्या " म्हणून खूप जोरानं हाक मारली. सायकल थांबवून कांतिलाल चहूकडे पाहूं लागला. तेवढ्यात रघूनं त्याला गाठलं अन् जोरात त्याच्या पाटीवर थाप मारली.

" अरे – अरे कोण ? जोशी का ? "

" होय मीच, कात्या. माझ भूत नव्हे काहीं."

" पाटींत थाप मारलीस म्हणून लवकर ओळखलं. नाहींतर खूप बदललायस तूं. मी आपला बघतच राहिलों असतों. इथं मला कात्या म्हणणारा कोण उपटला म्हणून. "

" का ? नांवबिव बदललं आहेस काय ? – तस असलं तर सागून ठेव."

" नाव बदलायला मी काय पोरगी आहे ? "

" तुझ्या बोलण्यात पोरगी आली तेव्हा तूं पोरगी नसून कात्याच आहेच याची शंका नको "

" चल ! माझी उगीच बदनामी करूं नकोस. मला हल्लीं कुणीच 'कांत्या' म्हणत नाहीं म्हणून आश्चर्य वाटल. "

" मग काय म्हणतात रे तुला ? – रोमिओ ? "

" ए माफ कर ! आता हें नवं नाव पाडूं नकोस. आधीच सारेजण ' शेठ ' म्हणून टिंगल करताहेत. त्यात भर नको अन् तूं रे कधी आलास ? करतोस काय ? कॉलेजात नांवबिव घालणार आहेस का नाही ? "

" कांत्या, लेका, अशी कोरडी चौकशी करून सायकलवर टाग मारायचा विचार असला तर तें काही जमायचं नाही. आधीच तुला सागून ठेवतों. इतक्या दिवसानी भेटलोंय् आपण—"

" अरे पण मला तासाला उशीर होतोय् जोशी पहिला तास लॉजिकचा असतों, त्यातच मी—"

" कळलं कळलं ! लॉजिकमध्यें माल ऑब्झर्व्हेशन करतांना गचकलास असंच ना ? म्हणजे काय मागच्या वर्षी ज्यूनियर इंटर संपवून यंदा तूं सीनियरला आहेस. मग कसली रे घाई तासाची ? "

" आतां तूंच म्हणालास ना सीनियर आहे – तास चुकवून कस चालेल ?"

" हें मला सागतोस ? मागल्या वर्षीच्या नोट्स असतांना लॉजिकची मातब्बरी सांगूं नकोस ? "

" अरे पण तास चुकवून करायचं तरी काय ? "

" असा वळणावर ये – पण लेका, काय करायचं तें इथं रस्त्यावर उभं राहून सांगायचं होय ! चल कुठं तरी भटाचं–उडप्याचं चांगलं हॉटेल असेल तिथं घेऊन चल. इतक्या दिवसानंतरची भेट चांगली चमचमीत 'सेलेब्रेट्' करूं अन् मग सावकाश गप्पा मारीत ठरवूं काय करायचं तें—"

" ही काय वेळ का काय हॉटेलात जायची जोशी. माझं जेवण झालंय् घरांत. सेलेब्रेट् काय पुनः करता येईल. "

" पुनः मी कधीं नकों म्हणतोंय्. पण आता सोडणार नाहीं. तुला खायचं नसलं तर मी खातों तें बघत बस – पण आजचा दिवस आहे तो तुला चुकवूं देणार नाहीं. आता उगीच सबबी सांगूं नकोस. " असं म्हणत रघूनं त्याच्या सायकलीला हात घातला.

कात्यानं कुरकुरत रघूला उडप्याच्या हॉटेलांत नेलं. तिथं आरामात पाव–मिसळ, मसाला–घावन, कॉफी याच्यावर यथेच्छ ताव मारून ढेकर दिला. कात्याला आग्रहकरून पाणी ग्लास घ्यायला लावला. बापूच्या बातमीपत्रानं रघूचं 'असं' झाल्याचं कात्याला आधींच समजलं होतं – त्यातला वाह्यात् भाग काढून टाकून रघूनं पुढल्या कार्यक्रमाची अगदीं जुजबी माहिती कात्याला दिली.

" मग यंदा आपली जोडी पुनः जमली कीं जोशा – आपण दोघं मिळून पुनः अभ्यास करू या. मागल्यासारखा भाडू–रुसूं मात्र नकोस हं. "

" छट् ! भांडायला काय आपण शाळू पोरं राहिलोंय् थोडेच. "

" मग त्या बाप्याशीं का अजून भांडण ? "

" माझं कुठं त्याच्याशीं भांडण आहे ? तो माझ्याशी बोलायला देखील तयार नाहीं. गावातल्या मोठ्या माणसांच्या भानगडींत आपण लक्ष घालायचं नाहीं असं ठरवून वागायला त्याची तयारी असली तर मी कधींच नाहीं म्हणणार नाही— "

" सांगूं का मी त्याला तसं ?

" तें मग बघूं पण तू कॉलेजात नांव केव्हा घालणार ? "

" पण अभ्यास तरी बरोबर करायचा ना ? "

" करूं या की! तुझी खोली बोर्डिंगातलीच ना? येईन मी तिथं— "

" अं हं – मीं बोर्डिंग सोडलंय् आतां. कॉलेजच्या होस्टेलांत राहतों. जेवायला गांवांत येतों. खोलीवर यायचं तर आत्ताच चल कीं माझ्या सायकलवरनं— "

" लेका, एका सायकलवरनं दोघांनीं जायचं म्हणजे चांगलीच मिरवणूक बघतील कीं सगळीजणं— "

" आतां कोण बघतयं? गर्दीची वेळ तर निघून गेली. "

त्या दिवशीं रघूनं पुनः कॉलेजची वारी केली. कांतिलालच्या खोलींत गेल्यावर दोघंही तिथं दमून पडले थोडा वेळ " आज सगळेच तास बुडणार बहुतेक " कांतिलालनं रघूकडे बघून म्हटलं. " मग त्यांत काय झालं? तुला निमित्तच हवं असेल; " रघूनं त्याला चिमटा घेतला. अन् तास बुडवणारच असलास तर चल कीं – जिमखान्यांत तरी जाऊन बसूं. कॅरमची एखादी गेम मारूं. म्हणजे तुला तास बुडवल्याची हुरहूर वाटायची नाहीं. "

" कॅरम खेळून तास बुडल्याची हुरहूर रे कशी जायची? "

" जसा कांहीं तूं मला ठाऊकच नाहींस काऱ्या. तुला तासाला कशासाठीं जायचं असतं तें मला कळत नाहीं होय? त्याची भरपाई होईल जिमखान्यात मधल्या सुट्टीच्या वेळी. तिथंही दर्शनाची सोय आहेच. मग उगाच रुखरुख कां? "

" कांहीं तरी चिकटवूं नकोस माझ्या अंगाला. अन् तूं एवढा सोंवळा बामण जोशा, तुला रे काय आमच्या जिमखान्याची माहिती? "

" काल आलों होतों अभ्यासाची चौकशी करायला. तेव्हां याच डोळ्यांनी पाहून घेतलं सगळं. डायरेक्ट ऑब्झर्व्हेशन् "

" म्हणजे माझं निमित्त करून तुलाच जिमखान्यांत जायचं आहे असं सरळ सांग कीं. अन् कॉलेजांत नांव न घालतांच हे धंदे आतां करायला लागलास होय जोशा? "

" धंदे करणं हें शेठ लोकांचं काम. त्याच्यासाठीं साधे किंवा प्रायश्चित्ताचे मुहूर्त सांगणं हें माझ्यासारख्या जोशाचं काम— "

" पण मग – इथं काय उगीचच माशा मारीत बसायचं? "

"माशा कशाला मारतोस? पंधरा मिनिटांनीं तास सुरू होईल. जा कीं तूं तासाला. मी इथं वाचीत बसतों काहींतरी; नाहींतर देतों ताणून आरामात."

"काय वाचणार आहेस? इंग्रजीचं पुस्तक देऊं? मर्चंट ऑफ् व्हेनिस?"

"अ? नको. आता अभ्यासाकडे लक्ष लागणार आहे थोडंच! मासिक – बिसिक दे असल तर चाळायला."

"ती बघ टेबलावर 'चित्रा' अन् 'फिल्म इंडिया' पडली आहेत. बैस घेऊन त्याना. त्यातल्या नट्यांशीं गुलगुल गोष्टी करीत."

"लेका, तसली 'प्यारी मोहब्बत' करायला तुझी शिकवणी ठेवली लागेल कांत्या. पण तूं तर तासाला निघालास."

"वाह्यात् झालायस् पुण्यात राहून – उगीच नाहीं बाप्या सांगत. काय हव तें कर जा."

× × ×

बापू इनामदाराच्या खोलीत रात्रीं नऊच्या सुमाराला कांतिलाल आणि बापू कंटाळवाणे चेहेरे करून बसले होते. पौषातल्या थंडीच्या कडाक्यामुळं त्यानीं खोलीचं दार बंद करून टाकलं असलं तरी त्यांची नजर दारावरच खिळली होता अन् थोडासाही आवाज आला तरी ते उत्सुकतेन डोळे विस्फारीत होते. रघूचा अजून पत्ता नव्हता. अन् तो आल्याशिवाय त्याच्या अभ्यासाची बैठक सुरू होत नव्हती.

"ह्या जोशाचा अभ्यासाला उपयोग होईल म्हणून ह्याच्या म्हणण्याप्रमाणं मीं होस्टेलात रहायचं सोडून गांवात मुक्काम ठोकला – पण हा बाबा कधीं म्हणून वेळेवर इथं यायचा नाहीं. अजून दुसरा अंक संपला नाहीं – अन् नाटक तरी कसलं काढलंय् रूक्ष आणि हाणामारीचं – म्हणे वेणीसंहार." कांतिलालनं सुरुवात केली.

"तूं कांही म्हण कांत्या, हा रघ्या पहिल्यापासनं बिलंदर – त्याच्यावर विश्वास म्हणून टाकायची सोय नाहीं. पुण्यासनं आल्यापासून तर फारच पुढं गेलाय. वाटल होतं इंटरला गचकल्यावर ताळ्यावर येईल. पण नाहीं, भटाचा विश्वास धरण्यांत अर्थ नाहीं —"

" हें मात्र कांहींतरी चिकटवतोयस् तूं इनामदार – तुझ्या डोक्यातलं अजून तें गावाकडचं भांडण गेलेलं दिसत नाहीं. जोशा मात्र सगळं विसरून वागताय. तूं नाहीं त्या बाबतींत त्याला बोल लावूं नकोस— "

" माझ्या मनात तें कांहीसुद्धां नव्हत. माझं म्हणण एवढंच, कीं हा रघ्या सरळ असता तर एकदा मिळून अभ्यास करायचा ठरल्यावर यानं वेळेवर जायला नको का ? याचा काही तरी डाव असला पाहिजे. "

" डाव कसला आला आहे ? गेला असेल कुठें तरी तंद्रींत भरकटत. त्याला ती संवयच आहे अन् परीक्षेची भीति पण नाहीं. "

" अरे छोड यार ! परीक्षेची भीति नाहीं. आता त्या बाता सोडा. शाळेंतली स्कॉलरगिरी कॉलेजात टिकत नाहीं. त्यानंहा खाल्लाय् टप्पू चागलाच मागल्या वर्षी. आता त्याच्या—आपल्यात काहीं फरक नाहीं."

" फरक नाहीं तर तोंड वाकडं करून का बसलायस ? – तूंच साग की संस्कृत त्याच्या ऐवजी – अन् खोलीत कोंडून कशाला घेतोस ? त्याच्या-सारखा भटकत रहा की दोन दोन तास. "

" त्यात काय विशेष आहे ? आपण म्हटलं नव्हतं त्याला, कीं तुझ्याजवळ सायकल नाहीं तर आम्हीच येऊं हवं तर तुझ्या खोलीवर अभ्यासाला. पण त्याला काहीं तो तयार झाला नाहीं. लेकाचा खोलीवर तर कधीं बोलवीत नाहींच, पण आपण होऊन येऊं म्हटलं तर काहीतरी निमित्त काढून आपणच आमच्याबरोबर चालूं लागतों. त्याच फिरायच वेडसुद्धा पांघरलेलं आहे— "

" छट्. त्याची फिरायची संवय तर हायस्कूलपासूनची आहे अन् खोलीला तो काय करणार ? वाड्याच्या मालकानं त्याला कॉलेजचीं पोरं गोळा करायचीं नाहीं अशी अटच घातली खोली देतांना. "

" जाऊं दे कांत्या. तूं म्हणतोस तसं कां होईना. आपल्याला काय करायचं आहे त्याच्या बाकीच्या गोष्टींशी – पण हा महाभाग येणार तरी केव्हा ? – थोडंसं संस्कृत येतंय् म्हणून इंग्लंडच्या बादशहाचा भाव खातोय् "

" इंग्लंडच्या बादशहाची का रे आठवण झाली तुला बापू ? " रघूनं दार उघडून आंत येतां येता विचारलं.

" या, या महाराज — आत्ता उगवलात होय ! तुझ्याबद्दलच बोलत होतों आम्ही — अगदीं शंभर वर्षे आयुष्य आहे रघ्या, तुला. "

" ए बाप्या, असला भयंकर आशीर्वाद दिलास तर त्याचे परिणाम तुला अन् कात्याला — दोघानाही भोगावे लागतील बर का— "

" कां रे ? चागलं म्हटलं— "

" हो ! तोंडानं म्हणायला काय होतंय् लेको तुम्हाला. शंभर वर्षांचं आयुष्य देऊन मोकळे व्हाल तुम्ही. चागला आशीर्वाद दिला म्हणून वर छाती फुगवून ऐटीनं मिरवाल — पण तें निस्तरावं लागेल मला. तेव्हा मी रे काय करायचं ?"

' कां ? एवढं कसलं संकट पडलय ? "

" संकट ? तुम्हा शेट—इनामदारांना काय बाबा ? शंभराच्या आयुष्यात व्याजाचा एकोत्रा मिळवायला हवा होता म्हणाल — पण मीं शंभर वर्षे जगायचं म्हणजे तुम्हां दोघानाही मला दत्तक घेऊन सारी इस्टेट नांवावर करून द्यावी लागेल. "

" भले बहाद्दर ! आशीर्वाद दिला तर वर इस्टेट नावावर करून मागतोस ! अगदीं सरळ भटाला दिली ओसरी अन् — पण जाऊं दे ? रघ्या, लेका उशीर तरी किती करायचा ? का संस्कृत सागायच म्हणून अगदीं शास्त्री—पंडिताचा भाव खातोस ? घड्याळांत बघ तरी एकदां— "

" साडेनऊसुद्धा झाले नाहींत अजून ! कुठं झालाय् फार उशीर ? "

" हें आणखी वर ! आता अभ्यास किती होणार ? साडेदहा झाले कीं अर्धी ओळ तशींच सोडून पुस्तक मिटून टाकतोस. वर्गातले प्रोफेसरसुद्धा घंटा झाल्यावर वाक्य पुरं केल्याशिवाय तास सोडीत नाहींत कधीं. पण, तूं मात्र— "

" मी प्रोफेसर झाल्यावर तसं मुळींच करणार नाहीं. मग तर झालं ? "

" छान ! आज वेळ कां झाला तेवढं मात्र अजून सांगितलं नाहींस — मुद्दा डावलून वेळ काढण्यात आतांच प्रोफेसर झालायत्. पण अशानं अभ्यास कसा व्हायचा महाराज ? "

" होईल रे. तो काय आपल्या आधीं जन्मलाय् थोडाच ? —मागल्या वर्षी तर पुस्तक नेमलं ! "

" अरे पण गृहस्था, तूं होतास तरी कुठं इतका वेळ ? "

" कुठं होतों म्हणजे ? खोलींतच होतों – हरवलों नव्हतों कांहीं. पण फिरायला गेलों होतों तिथं गप्पा मारल्या खूप वेळ. मग घरीं येऊन आमच्या अन्नपूर्णेची आराधना केली अन् हातावर पाणी पडल्याबरोबर इकडे आलों."

" तुझ्याशीं ह्या दिवसांत खूप वेळ गप्पा मारणारा एवढा कोण भेटला, महापुरुष ? "

" महा-पुरुष नव्हता. महा-स्त्री म्हण हवं तर. "

" म्हणजे आतां ह्याही लफड्यांत पडलास का ? कोण होती रे ? आणि हल्लीं तुझे उद्योग तरी काय चालले‌त ? "

" वा ! अगदीं खरोखर दत्तक घेणार असल्यासारखी चौकशी चालवलीस की. पण करतां काय ? उत्तरं दिलींच पाहिजेत, नाहीं तर ' चान्स ' जायचा. उद्योग नेहमींप्रमाणें; फिरणें, गप्पा मारणें आणि इंटरचा अभ्यास करणें. लफडीं नाहींत – अन् गप्पा मारायला भेटली होती ती बापट – आमच्या जुन्या कम्पॅनियन्‌ची बहीण. "

" बापट भेटली होती म्हणजे तुला दिवस पालटला तरी कळायचं नाहीं विचारण्यात अर्थच नाहीं, इतक्या लवकर आलास कसा असंच विचारलं पाहिजे—"

" अगदीं बरोबर बाप्या. तिच्या संस्कृतच्या शंका तुझ्यापेक्षाही अधिक असतात, त्याला मी काय करूं ? अन् तुमच्यासारखा दररोजचा रतीब नसतों म्हणून गाठ पडली कीं पिळून काढते ती – पण आज तिच्यापेक्षांही अन्नपूर्णेनं वेळ जास्त घेतला. "

" या दिवसात तिची रे मिजास कशाला ठेवतोस इतकी ? नसली वेळेवर जेवायला घालीत तर बदलून टाक—"

" तेवढयासाठींच महाराज तुम्हाला म्हणतों, निदान मुदत-दत्तक तरी घ्या – आमच्या अन्नपूर्णेला असाच वेळ लागायचा. दुसरी सोय कांहीं माझ्या हातनं व्हायची नाहीं. "

" जरा सरळ सांगितलंस तर—"

" सरळ सांगतों. माझी शेगडीची आराधना अन् त्यासाठीं करावी लागणारी पहाटेची उस्तवारी, याची सोय केलीत तर लवकर येईन किंवा जास्त वेळ थांबीन माझं काय, उलट बरंच होईल. "

" उलट ब्यरंच ! आता सांगतोस होय ? आम्ही समजत होतों तुझी अन्नपूर्णा म्हणजे असेल कुटली तरी खानावळ. आधीं सांगीतलं असतस तर इतके दिवस कशाला फुकट गेले असते. हा इनामदार महागऱ्या गुजराथी खानावळींत पंधरा रुपये भरतो अन् एक पुरी मोडून दोन घास भात चिवडून परत येतो. तो सरळ खोलीवर डबा मागवील. काय रे ? "

" मीं कधीं नाहीं म्हटलं होतं त्याला— "

" बरं झालं कीं. उद्यापासून माझीही अन्नपूर्णेची शागिर्दी बंद. उगीच बाईचा बडेजाव नको ! "

" हें सगळं झालं. पण जोशीबुवा आज काहीं अभ्यासाला हात लावायचाय् का नाहीं— ? "

" आतां पावणेदहा वाजून गेलेत. आतां कसला अभ्यास होतोय् , कांत्या आजचा दिवस भुताला. "

" म्हणजे तुलाच ना बाप्या ? "

" मला कशाला ? सगळं तुझंच आख्यान चाललं होत आज रघ्या. "

" भांडूं नका रे. दोघंही भुतं व्हा. चला आतां, डिस्पर्स— "

" वा ! वा ! शेठ, आम्हाला एवीतेवी भुत ठरवलंच तुम्हीं. तर आतां तुमची सुटका तशी व्हायची नाहीं. हीं भुतं मानगुटीला बसणारीं आहेत म्हटलं. अस्सल सातारा जिल्ह्यातलीं. "

" कां रे बाबांनो ? मीं काय केलंय् तुमचं ? ज्याचं करावं भलं — "

" हो हो. हलवायाच्या घरावर – नव्हे, इनामदाराच्या डब्यावर तुळशी-पत्रं ठेवून मोकळा झालास तूं कांत्या; पण मीही कच्च्या गुरूचा चेला नाहीं. तुलां मोकळा सोडणार नाहीं आज. "

" अरे पण ही दोघाची दोन बाजूनं दमदाटी कशासाठीं ? "

" सांगतों वाटेनं – मुकाट्यानं चल आमच्याबरोबर. आज या रघ्याची नवी सोय केलीस तूं. तर त्याबद्दल सेलेब्रेट् करायला नको का ? "

" आत्तां ! दहावाजायच्या वेळेला ? काय खूळबिळ लागलंय का ? "

" हें बघ, आम्हांला असं वेडं ठरवून कितीही राजेंद्राचा आव आणलास तरी आतां सुटका नाहीं. मुकाट्यानं चल— "

ते तिघेही घाईघाईने बाहेर पडले. तेवढ्यांत बापू कपडे करीत असतांना रघूनं त्याला दटावलच. " बाप्या, तुला स्वेटर अन् वूलनचा कोट दोन्ही कशाला हवेत रे ? एक कांहीं तरी मला दे. मीच एकटा तेवढा थंडीनं कुड-कुडूं होय." वाटेंतल्या हॉटेलांत कॉफीचा कार्यक्रम उरकून, तोंडांत मसाल्याचं पान भरून घाईघाईनं ते सिनेमाच्या थेटरापाशीं आले. खेळ सुरू व्हायला अर्धं मिनिटसुद्धां बाकी नव्हतं.

मिळालीं तीं स्टॉलचीं तिकीटं घेऊन, अंधार दाखवणाऱ्या बॅटरीला शिव्या देत त्यांनीं एकदांच्या रिकाम्या खुर्च्या गांठल्या. ' ब्रह्मचारी ' बोलपट सुरू होता. बोलपट सुरू होत असतांनाच कात्यानं अन् रघून जणू एक साथीनं एकमेकाच्या मांडीवर थाप मारली अन् गुणगुणायला सुरुवात केली, " यमुना जळिं खेळूं खेळ कन्हय्या – का लाजतां ? "

सिनेमा संपल्यावर तिघेही बोलत बोलत राजवाड्याच्या चौकांत आले. रघूनं कात्याची मागची हकीकत सांगून थट्टा करायला सुरुवात केली, " बघ शेठ, होस्टेलमधें राहिला असतास तर आज घरी जायला निमित्त नसतं मिळालं. आज कसं आपोआप जमलं कीं नाहीं— "

" माझं ठीक आहे रे. आज हाल आहेत इनामदार लोकांचे. पडेल रात्र-भर तळमळत आपल्या खोलींत. "

" कांत्या, अगदीं फसलास तूं. रघ्याचा बाण फुकट गेला. त्याला वाटलं होतं तुझी थट्टा केली म्हणजे तूं नेमका परत अहेर करशील. पण, उगी हं रघू बाळ; मला आठवण आहे हं – आज तूं फिरायला गेला होतास तेव्हां तुला कोण भेटलं होतं त्याची — "

" अरेच्या ! मी विसरलों होतों. काय जोशी, यमुना जळीं—"

" अरे चल ! पाण्यांत पोहून कोरडं रहायची करामत मला येते हें कुठं तुम्हांला ठाऊक आहे— "

" मार थापा."

" असं वेडवाकडं बोलूं नका सकाळच्या प्रहरीं – इंग्रजी पद्धतीन आता नवा दिवस सुरू झालाय् – आरामात झोंप काढूं या."

" अच्छा ! – बाय्, बाय्."

× × ×

" आज कुणीकडे दिवस उगवला तें बघायला हवं होतं बुवा ! झाली म्हणायची सवड एकदाची आमच्याकडे यायला ? " चंदू बापटानं हसत हसत रघूच्या पाठीवर थाप मारली अन् थोड्या दूरच्या खुर्चीवर बसायला निघाला असताना त्याला आपल्या शेजारी कोचावर बसवल "

" सवड काय, हवी तितकी असते. ज्यूनियरच्या वर्षात कसली आली आहे गडबड ? पण म्हटलं तुम्हीच आतां मोठे लोक झालात – आधीं नुसते बंगलेवाले होतात, ते आता गुरुवर्य होऊन कॉलेजांतल्या मोठेपणाची भर पडली ना " रघूनं उलट आहेर केला.

" हें तोंडदेखलं बोलायचं सोडून दे आतां. मी रे कशानं मोठा झालों ? कॉलेजातला डेमॉन्स्ट्रेटर म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ! खरं मोठेपण तुझंच जोशी— "

" वा ! वा ! आतां काय पूर्वीसारखं नुसतं चंदू राहो पण बापट म्हणून तरी भागणार आहे ? आता ' सर 'की लागू झाली तुमची अन् त्यातून हें पुणं नव्हे – इथं स्टाफच्या खोलींत बसणारा प्रत्येकजण साहेब—"

" तें मला ठाऊक नाहीं. पण जोशी तूं मात्र कहर केलास यंदां – नाव घातल्या घातल्याच सारीं मंडळं अन् असोसिएशन्स सरळ खिशांत घातलीस – तूं आतां सेक्रेटरी तरी किती ठिकाणचा झालाहेस अन् आणखी होणार आहेस ? "

" त्याच्याबद्दल माझा कांहीं उद्धार झाला वाटतं तुमच्या स्टाफ्रूममध्यें ? हो, तेवढ्यावरनं ब्लॅक् लिस्टात नाव जायला नको. "

" ब्लॅक लिस्ट कसलं आलंय् रे ! पण आपली चर्चा झाली होती. हा जोशी कोण मधेंच उपटला धूमकेतुसारखा प्रत्येक ठिकाणीं— "

" त्याला मी काय करूं ? डिबेटिंगला कुणी उभंच रहात नव्हतं म्हणून नुसतं नांव दिलं अन् फुकटांत निवडून आलों. संस्कृत ऑनर्स घेणारा दुसरा

महाभाग नव्हता म्हणून संस्कृत असोशिएशन् माझ्या गळ्यांत पडली. आणि सगळ्यात कहर झाला तो सातारा संघाचा ! ”

“ आतां साग वाटेल तें बनवून ! ”

“ बनवत नाहीं. खरंच सांगतों बापट. सातारा संघाची शिल्लक कुजत पडली आहे फार वर्षे असं प्रोफेसरांनीं सांगितलं अन् ओढून ताणून सात विद्यार्थ्यांची सभा बोलावली. खरं म्हणजे आमचा इनामदारच संघाचा सेक्रेटरी व्हायचा. पण आधीं वर्गाचे प्रतिनिधि घेतले. त्यांत तो अन् इतर पांच गुंतले. शेवटीं उरलों मी एकटा म्हणून सेक्रेटरी झालों— ”

“ कांहीं कां असेना. यंदां तुझे ग्रह जोरात आहेत. मजा आहे झालं. ”

“ मजा तर आहेच. आपला सावंताशीं झालेला वाद आठवतो ?— त्यातलं कांहीं अनुभव इथंही येणार असं वाटायला लागलंय् ”

“ का ? इतक्यांतच तुला कुणीं ब्लेझरचं कापड दाखवलं काय ? ”

“ तिथपर्यंत गती झाली नाहीं अजून. पण एका महिन्यात आलेत ते अनुभवसुद्धां कांहीं कमी महत्त्वाचे नाहींत. त्यात माझीहि सोय— ”

“ अस्सं ! म्हणजे तूंही आतां सोंवळा राहिला नाहींस तर ! मग त्यांतली मजा कळू दे कीं— ”

“ छान ! तुम्हाला सगळं सांगून टाकलं म्हणजे झालंच. उद्यां स्टाफरूममध्यें तुम्ही लोक माझा उद्धार करा— ”

“ तर तर – तूं अगदीं साखरेची बाहुलीच पडलास ना ! चल, सांग सारं. इथं मी कॉलेजमधला ‘डमन्’ नाहीं. साधा माणूस आहे चंदू बापट नावाचा— ”

“ सांगायला माझं काय बिघडतंय म्हणा. लेखी पुरावा असेल तर ना ! आमच्या डिबेटिंगचा पहिला कार्यक्रम झाल्यावर मी चहाचं बिल् मागायला गेलों हॉटेलच्या भटाकडे. ‘इतक्यांत काय गडबड आहे – उद्यां करूं सवडीनं तुम्हांला हवं तसं.’ हळूंच सुपारीची पुडी मला देण्याच्या निमित्तान तो तोंड वाकवून म्हणाला. दुसऱ्या दिवशीं मीं बापूला पाठवला तरी त्यानं बिल दिलं नाहीं. मीच पुनः गेलों तेव्हां त्यानं चागलं दुपटीचं बिल माझ्या जवळ

दिलं अन् खरा आंकडा किती तेंही सांगून टाकलं. मग 'बिल असं कां ?' म्हटल्यावर भट म्हणाला, 'लायब्ररीच्या कुलकर्णीसाहेबांनीं सांगितलं तसं बनवलंय्. ते म्हणालेत तुम्हांला सांगीन म्हणून—''

" कुलकर्ण्यांनं काय तुला पर्सेंटेज् मागितलं कीं काय ? "

" छे ! त्याचा आग्रह एवढाच कीं माझीं बिलं इतर सेक्रेटरींच्यापेक्षां वेगळीं झालीं तर भट चढेल अन् सेक्रेटरीचीही पंचाईत होईल. त्यानं मला चांगलंच पेंचांत टाकलं "

" तें कसं ? "

" त्या शहाण्यानं लायब्ररीला म्हणून पुस्तकं घेतलींत त्यांतल्या कमिशनच्या ऐवजीं टेक्स्ट बुकं आणलींत; अन् मलाही तीं वापरायला देतोंय ना तो हवी तेव्हां— "

" म्हणजे आतां 'फॉल् ऑफ् ॲन् एंजल्'ची कहाणी सुरू झाली म्हणायची. पण बेतानं पातकं कर रे बाबा. निदान अंगाशीं तरी येऊं देऊं नकोस. "

' छट् ! मी पातकं बितकं कांहीं करीत नाहीं. तसला भलताच गैरसमज करून घेऊं नका गुरुवर्य. मी सगळं विषं पचवतोंय—''

" आणखीन् पचवायचीही कांहीं भानगड आहेच का ? "

" त्यांत भानगड कसली आली आहे ? मागच्या अनुभवानं धडा घेऊन मी भटाचं बिल बाबूनं परस्पर ऑफिसांत देऊन पैसे भटाला द्यावेत असं सांगून टाकलंय. माझा संबंधच सहीच्या बाहेर ठेवला नाहीं या साऱ्या प्रकरणाशीं. "

" म्हणजे फुकटांत भटाला दुपटीचा लाभ. "

" अं हंः, तसा भट मोठा प्रामाणिक आहे. त्यानं मला सांगून टाकलंय, जोशी साहेब, गावांतनं वेळीं अवेळीं यायला लागतं. तेव्हा दुपारचं जेवण, चहा याची आबाळ करूं नका. आपल्याकडे करीत चला. तुम्हाला सवलत देईन. सालअखेर एकदम बिल द्या.

" म्हणजे आतां तुझ्या पोटांतच पाप दडलंय म्हण की. "

" म्हणूनच म्हटलं ना, सगळं विष पचवतों आहें मी. "

" पचव बाबा पुरतं पचव. पण मला आता क्लबांत जायचं. आहे बाहेर पडणार आहेस का माझ्याबरोबर ? "

" मला थांबावं लागेलसं दिसतंय. तुम्हांला तरी काय एवढी घाई आहे ?"

" माझी टेनिसची वेळ झाली. " बोलतां बोलतां चंदूनं कपडे बदलले होते. " तुला थाबायचं आहे कशासाठीं ?— यमूकडे आला असलास तर इतक्यांत उपयोग नाहीं. ती गांवांतल्या होस्टेलमधल्या मुलींबरोबर सिनेमाला गेली आहे. "

" अरेच्चा ! म्हणजे मी उगीचच वाट पहात होतों म्हणायचा दुपारीं. कॉलेजांत सांगायचं जमलं नाहीं त्याचा हा परिणाम. "

" त्यामुळं तरी आमच्याकडे आलास गृहस्था ! बैस हवं तर वाचीत इथंच ती परत यईपर्यंत. नाहीं तरी असा काय उद्योग आहे ? "

" तसच करतों. पण वरच्या खोलींत बसतों. म्हणजे तोंपर्यंत थोडासा अभ्यास तरी होऊन जाईल. "

चदू निघून गेला आणि रघू सराइताप्रमाणं माडीवर यमूच्या खोलींत जाऊन बसला. तिच्या पुस्तकांच्या रागेंतलीं सारीं पुस्तकं एकवार नुसतीच धुंडाळून मग त्यानं त्यांतलं 'काव्यप्रकाशा'चं पुस्तक हातीं घेतल अन् खोलीचं दार ढकलून तो तिथल्या आरामखुर्चीवर अग लोटून वाचीत बसला. मधेंच एकदा अंधार पडल्याची जाणीव झाल्यावर त्यानं दिवा लावला, पण तेवढ्यात आपल्याला वाचायचा कंटाळा आलाय असं त्याला वाटलं. म्हणून पुनः दिवा बंद करून तो नुसता डोळे मिटून खुर्चीवर पडून राहिला.

चंदूला आपण जिमखाना-प्रकरणातली बहुतेक सर्व माहिती देऊन टाकली हें बरोबर केलं कीं चूक ? जेवणाच्या प्रकरणात भट मधल्या वेळच्या चहापाण्याचे पैसे घेणार नाहीं म्हणत होता. पण त्याऐवजीं आपणच पर्यायानं एक वेळचं जेवण पदरात पडायची सोय केली — अर्थात् सारं आडवळणानं सुचवीत, निमित्त काढून. पण चुकून भट फुटला किंवा चंदूनं जास्त चौकशी केली तर — तर सगळचं रहस्य उघडकीला यायचं. आणि मग ! पण कशाला उगीच उद्यांची पर्वा ?

" आतां कशाला उद्याची बात ऽऽ – कशाला ? कशाला ? ? " थोडं मोठ्यानंच पण आपल्याशीं गुणगुणत धाडकन् खोलीचं दार उघडून यमू आंत आली अन् येतां येतां तिनं गिरकीही घेतली असावी. तिनं बटण दाबून दिवा लावला त्या वेळीं गिरकीच्या झपाट्यानं ओघळून डाव्या हातावर सावरलेला पदर तसाच अर्धवट स्थितींत होता. दिव्याचं बटण दाबतांना एकदम खुर्ची सरकवल्याचा आवाज झाला त्या आवाजानं किंचित् दचकून यमूनं पदराचा हात छातीशीं घट्ट धरला. दिव्याच्या उजेडात तिन आरामखुर्चीवर डोळे मिटून पडलेला रघू पाहिला. ' त्याचा खरोखरीच डोळा लागला आहे ? मग खुर्ची कशी सरकली ? आपली अस्ताव्यस्त स्थिति पाहून, यानं आधींच खोलींत येऊन बसण्याची चूक केली असं वाटून नंतर स्वत:ला सावरून धरण्यासाठीं डोळे मिटून तर घेतले नाहींत ? ' यमूच्या काहीं ध्यानांत येईना. या वेळी रघू आपल्या खोलीतच काय पण बंगल्याच्या आसपास देखील असेल अशी तिची कल्पना नव्हती. अनेक वेळां बोलावून सुद्धा तो आला नव्हता. तसा बोलतांना गोड बोलायचा, पण येण्या-जाण्याच्या बाबतींत सतरा पिंपळा-वरचा मुंजा झाला होता. त्याला लवकरच आपण चिडवू–डिंवचून टेवूं अशी समजूत करून घेऊन यमूनं आजच्या कार्यक्रमात भाग घेतला होता. तो रघू अशा अवस्थेंत आणि इतक्या लवकर भेटलेला पाहून ती थोडीफार गडबडली.

" सिनेमा सुटायला इतका वेळ लागला आज ? " रघून त्या चमत्कारिक शांततेचा कसातरी भंग केला.

" कां ? माझी उलट तपासणी करताय् काय ? पण आधीं मला हें कळूं दे, की मी नसतांना, एकटेच माझ्या खोलींत अंधारांत काय म्हणून बसलात ? ही काय रीत झाली ? " यमूनं एकदम बोलता बोलतां आवाजाची पट्टी बदलली.

रघूला कळेना, हा यमूचा कोणता ' मूड ' आहे. तो तसाच गप्प राहिला अन् मघाशीं वेगळ काढून टेवलेलं ' काव्यप्रकाशा 'चं पुस्तक चाळवलं.

" कां हो ? आतां कां चोरासारखे गप्प उभे राहिलात ? काय बेत होता आज ? आणि हीं माझीं पुस्तकंही चाळलींत वाटतं – तीं कशासाठीं? " अजूनही यमूच्या आवाजांतला राग खराखुरा आहे कीं नुसता अविर्भाव आहे याचा रघूला उलगडा होईना; पण आतां गप्प बसून भागणार नव्हतं—

" तुमचे बंधु क्लबांत जाईपर्यंत खालीच होतों. नंतर मात्र उगीच वेळ कशाला फुकट घालवायचा म्हणून इथं येऊन 'काव्यप्रकाश' वाचीत बसलों होतों. कंटाळा आल्यावर दिवा बंद करून तसाच पडून राहिलों झालं."

" म्हणजे काय ? थांबायचंच तर दिवाणखान्यांत कां नाही थाबलात ? इथं येऊन मी एकदम कपडे बदलणार होतें दिवा लावून पहायची बुद्धि झाली म्हणून बरं "

" बर तर; येतों मी आतां. आज तुमचा 'मूड' ठीक दिसत नाहीं. उद्या येईन मी. "

" कशाला ? काय काम होतं माझ्याकडे ? "

" आज तुम्हाला सागून कांही उपयोग व्हायचा नाहीं उगीच माझं काम वाया जायला नको "

" नसलं सागायचं तर नका सांगूं. पण असे वेळीं अवेळीं माझ्या खोलीत बसलेलं मला अन् आमच्या बंगल्यांत कुणालाच खपणार नाही."

— रघू अधिक न बोलता तिथून बाहेर पडला. बाहेर कुठल्या तरी दुकानांतल्या मोठ्या घड्याळांत खणकन् एकच ठोका पडलेला पाहून त्यानं तिकडे पाहिलं — साडेआठ वाजून गेले होते. पहिल्या अन् दुसऱ्या कोणत्याच खेळाच्या वेळाशीं न जुळणार यमूचं तें येणं आणि नंतरच वागणं याचा विचार मनात येऊन तो चरकला — आपण कुठल्या मार्गाला लागलों आहोंत ?

" रघूची लहर फिरून त्यानं पुनः तोंड वळवलं अन् तो बापूच्या बाजूला निघाला. जवळच त्याला बापू दिसला. त्यानं बापूला थाबवलं. " काय सेक्रेटरी महाराज, यावेळेला इथं कसे ? " बापून त्याला खुषींत विचारलं. " तुझ्या-कडच निघालों होतों. आज तब्बेत ठीक नाहीं तेव्हां तुझ्या अन्नदात्याकडे चव पालटायला यावं असा विचार केला. " रघूनं असं सांगितल्यावर तो अन् बापू गांवांतल्या रस्त्याला लागले. जातां जाता बापूनं त्याला ऐकवलं—

" रघ्या, आतां उशीर खूप झालाय् खानावळींत पोंचेपर्यंत नवाची वेळ येईल — अन् मग तिथं काय ? भाताचीं थंड ढेकळच चिवडायला लागायचीं. त्याच्यापेक्षा दुसरा कांहीं तरी बेत करूं या. कुठं जायचं — बोल ? "

" माझं काय ? मला रुचिपालट हवा — तूं म्हणशील तिथं मी येईन. "

" तें कळलं रे – पण कुठं जायचं तें ठरवशील की नाहीं ? आज तुला म्हणशील तिथं नेऊन गार करून टाकतों. "

" भलत्याच खुषींत आलेले दिसतात इनामदार आज ! पण बापू, इथं तूं कितीही उदार झालास तरी करून करून काय करणार ? त्याच खानावळी, तेंच अन्न – सगळीकडे ताकभात ! पुण्यासारखी ' लकी 'ची सोय थोडीच आहे ? – शिवपूर आहे हें बोलून चालून ! "

" मला कुठं तुझी ' लकी न् फिकी ' ठाऊक आहे ? इथं काय हवंय तें बोल. खानावळीचं नांव काढूं नकोस. आतां कुठल्या तरी हॉटेलांत जाऊंया– "

" चल तर. पोस्टाच्या कोपऱ्यावरच्या नव्या हॉटेलांत जाऊन झकास ऑम्लेट न् पाव तरी खाऊया. "

" चल, मजा करायची आहे आज–आजच ! कशाला उद्याची बात ? "

" बाप्या, सिनेमाला जाऊन आलास वाटतं ? लेका, एकटाच गेलास– माझी कांहीं आठवण झाली नाही ना ? "

" अं–अं ? तुझी कशाला आठवण करायची बाबा आम्हीं ? – आतां तूच आठवड्यांतनं तीन तीन सिनेमा बघत असशील ! कधीं खास प्रोग्रॅम ठरवलास तर साग मला – होईल का आमची आठवण ? "

" अशी उडवाउडवी करू नकोस. साग कीं कोणत्या खेळाला गेला होतास तें – ? "

" यांत कसली उडवाउडवी ? – गेलों होतों चारच्या खेळाला. "

" आजच नेमका चारचा खेळ आटवला ? कां टग्लं ब्रिरलं होतं ? "

" तूं काय म्हणतोयस् तें मला कळत नाहीं. "

" लेका, आज गांवांतलं होस्टेल् सिनेमांत होतं म्हणे. म्हणून विचारलं की आजच नेमकं कसं ठरवलंस ? "

' तुला वेड लागलंय् रघ्या. गांवांतल्या होस्टेलमधलं चिटपाखरूं सुद्धां नव्हतं चारच्या खेळाला ! वाटेल त्याला विचार. "

× × × ×

'चंची क्लब'चं अधिकृत नामकरण आणि स्थापना झाली ती गॅदरिंगच्या वेळेला जेवण संपवून निरनिराळीं टोळकीं निवान्त जागा शोधून आपापल्या छंदानुसार आराम करायला बसलीं त्यावेळीं. पंढरपूरकर जोशी अन् बडवे, बार्शीचा कुलकर्णी, बिळासकर पाटील, रघू अन् इतर दोघं-तिघ यानीं तिथं बैठक माडली. "आज सगळ्यांना सेक्रेटरीमहाराजांनीं पट्टया दिल्या पाहिजेत" बार्शीकर कुलकर्णी म्हणाला. 'मग मागवा कीं — नको कुणीं म्हटलंय.' रघूनं उत्तर दिलं. तितक्यांत बिळासकर पाटील सरसावला — "ए कुलकर्ण्या, हलवायाच्या घरावर तुळशीचं पान ठेवायचं तुझं कामच असलं तरी आज विकतच्या पट्टया आणायच्या नाहींत" सारेजण बिळासकराकडे पाहू लागले — तेवढ्यांत त्यानं आपल्या वुलनच्या कोटांतली खुतनीची नवी कारी चंची काढून मधोमध टाकली. "उगीच लेकाच्यानो, काय करावं, कसं करावं — म्हणून बसला होतात, घ्या ही चंची अन् खावा तोंडभर पान. पन बायकी मिठ्ठ मिठ्ठ — एवढ एवढं चालायचं नाहीं ह घसघशीत पान खाऊन पंचमाचा बार मारला पाहिजे." "वारे पठ्ठे" म्हणून रघूनं बिळासकर पाटलाच्या पाठीवर थाप मारली —" भटा, तूं काय आशीर्वाद येऊन दक्षणा मागायच्या नादांत आहेस वाटतं. पर तें जमायच नाहीं हतं "तसं नव्हे रे; तुला पठ्ठे म्हटलं तें उगीच कोरडा आशीर्वाद द्यायसाटीं नाहीं — अगदीं पठ्ठे बापूरावासारखा वेळेवर उभा राहिलास अन् कसं करायचं काय करायचं तें सगळ्याना दाखवलंस."

"मग त्यांत काय झालं ? त्यो पठ्ठे बापूराव आपल्या भागचाच नाहीं कारे भटा, पर तुला त्यो ठावं बी नसल"

"तर तर. तुझंहि नांव बापू असलं तरीं पठ्ठे बापूराव तुझ्यापेक्षा मलाच जवळचा आहे बरं कां पाटला —"

"बरं, बरं; भांडूं नकोस. आपल्या सातारा जिल्ह्यांतलाच आहे तो—"

"हे दोघे सातारकर आतां एक झाले बरं का — आपणही कांहींतरी केलं पाहिजे." पंढरपूरकर जोशी बडव्याला म्हणाला.

"आतां कांहीं करायची वेळ गेली ग बये." रघू चेष्टेनं म्हणाला.

"आमच्या बापूरावानं आघाडी मारली. आजपासनं आपल्या ग्रुपचं नांव 'चंची क्लब' ठरलं बरं का मंडळी. चंची क्लबांत सातारा—सोलापूर

असली गटबाजी करायची नाहीं. तर पंढऱ्या तुझी खास पंढरपुरी अंकोळी पुडी मिसळून टाक आमच्या सातारी जर्द्यात."

"बस्. बस्. ठरलं – चंची क्लब झिंदाबाद."

अशा रीतीनं चंची-क्लबाची स्थापना झाली असली तरी तो प्रत्यक्षांत खूप दिवसांपासून अस्तित्वात होता. त्याचं कारणही साधं होतं. नुसता पास कोर्स घेतलेल्या विद्यार्थ्यांना एक तास तरी रोजचा मोकळा असायचा अन् ऑनर्स-कोर्सवाल्याना सुद्धा मधून मधून अधले–मधले तास मोकळे सांपडायचे. त्याची बैठक कधीं ना कधीं बसूं लागली सेक्रटरी झाल्यापासून रघूची अन् या लोकाचीं चांगली पछान झाली होती तोही त्याच्यात मिसळू लागला.

पंढरपूरकर जोशाचा आपटे म्हणून एक श्रीमत मित्र होता. तो या कंपूत कधी असायचा नाही कारण नसताना चची क्लबाच्या पानावर त्यानं एकदा टीका करून या गलिच्छ आणि असस्कृत संवयीवर टीका केली. तेव्हां पंढरपूर-कराला त्याच्या मैत्रीबद्दल धारेवर धरण्यांत आलं. आपट्यांत याही खोड्या होत्याच. तो नेहमी आपल्या श्रीमंतीच्या बडेजावांत आणि नटवेपणांत गुंग असायचा. श्रीमंत म्हणूनच तो क्रिकेट खेळायला जायचा. बॅटिंग करतांना चार चेंडू सरळ सोडून द्यायचा अन् पांचव्याला धडपडत बॅट लागलीच तर हमखास कॅच् उडायचा. फिल्डिंगला मिड्‌ऑफशिवाय दुसरीकडे उभा राहायचा नाहीं. वळायचं त्याच्या जिवावर यायचं. बोलण्यांत मात्र कसल्या तरी डिफिकल्ट कॅचच्या आणि सेंचरी–हाफ्–सेंचरीच्या गप्पा नेहमीं यायच्या. कुठल्याशा क्लबच्या मॅचबद्दल बोलल्याशिवाय आपट्याचं क्रिकेट पुराण कधीं संपायचं नाही. पंढरपूरकराला आपट्याच्या या थापेबाजीबद्दल पुष्कळदा कंपूत तोंड द्यावं लागायच. त्यानं एक-दोनदा 'यंदा तो फॉर्मात नाहीं.' म्हणून सारवासारव करायचा प्रयत्न केला, तेव्हां तर त्याची रेवडीच उडवण्यात आली. रघूनं तर "पंढऱ्या, लेका तूं सुद्धा त्याच्या नादान— वाण नाहीं तर गुण लागून – बंडलं मारायला लागलास." झालं. त्या दिवसापासून आपट्याचं नाव 'बंडल्या' ठरून गेलं अन् त्याला त्याच्या नटवेपणाचं पलिस्तर बरोबर बसाव म्हणून 'प्रोफेसर बंडले' अशी दुरुस्ती लवकरच करण्यात आली.

हळूहळू बंडले प्रकरण जास्तीच चर्चेला यायला लागलं तेव्हां चंची-

क्लबांत पंढरपूरकर जोशानं त्याबद्दल तक्रार केली. शेवटीं त्याच्यावर तडजोड करतां करता असं ठरलं कीं, हजर असलेल्याच्या वर्मावर कुणीं घाव घालायचे नाहींत. पण हें ठरताना 'प्रेझेंट कंपनी एक्स्क्लूडेड' या इंग्रजी वचनाचा उच्चार झाला अन् त्याच्यावरनं फाटे फुटले. बिळासकर पाटाल म्हणाला, "म्हणजे हजर असलेल्यानाच तेवढं वगळायचं असंच ना?" बाकीच्यानीं गिल्ला करून त्याला सुनावलं, "काय पाटाल, अजून तुमच्या वावरांत इंग्रजीचं पीक बरोबर उगवत नाहीं वाटतं?" पाटलानं हसत हसत उत्तर दिलं, "वावरातलं तुमाली काय कळतंया – आमचा असू द्या न आपला माळच कोरडवाहू असला तरी बी. पन म्यां विचारलं होतं बादाबद्दल" "अरे गृहस्था, जरा सरळ कॉलेजांतल्या मराठींत बोल की – तुझा तो ग्रामोद्धार मागनं बघू" रघूनं त्याला डिवचलं. पंढरपूर—बार्शीकरानी 'बरी सातारकरांची आपसांत जुंपली' म्हणून खोटेच गंभीर चेहेरे केले. रघूकडे पाहून बिळासकर डोळे मिचकावीत म्हणाला, "ज्याची खून त्येला भिडली. म्हणजे मला असं विचारायचं होतं कीं प्रेझेंट कंपनी एक्स्क्लूडेडमध्यें 'प्रेझेंटस्—कंपनी' हजर असलेल्याची सबंध कपनी धरायची कीं काय? हो—कंपनी म्हटली कीं दोन यायचेच! त्यांतल्या दुसऱ्या पार्टीचं काय? नाहीं-तर आम्हीं बापटनी कुणाच तरी नाव घ्यावं अन् जोशीबुवान नियम मोडला म्हणून आमच्यावर चिडावं— "

"वारे पठ्ठे! हा बिळाशीचा माळ चांगला सुपीक आहे की! अगदीं इरसाल लावणी करायला येतीय्" रघूशिवाय बाकीच्यांनीं बिळासकर पाट-लाला चढवला.

"आता बोला की जोशीबुवा. का पचांग विसरलंय्?"

"अरे इथं पंचांग नाहीं. फक्त उत्तमांग (बेटरहाफ्). बार्शीच्या कुल-कर्ण्यानं आणखी चिडवलं.

"अरे जा, असे पाटील—कुलकर्ण्यांनीं एक होऊन आमच्यासारख्या सामान्य जनतेला बनवायचे दिवस गेले. हा प्रश्नच चंची-क्लबात येत नाहीं." रघूनं कांहींतरी उडवाउडवी केली.

"नाहीं. बाकी कुणाच्या कंपनीचा सवाल येत नाहीं हें खरं. तसा चंची-

क्लब पूर्णपणें ' ब्रह्मचारी ' आहे. फक्त जोशीबुवाचा अपवाद." पंढरपूरकरानं भर घातली.

पंढरपूरकराला कल्पनाही नसेल. पण त्याच्या बोलण्यांतल्या ' ब्रह्मचारी ' या शब्दान आणखी फाटे फुटतील म्हणून रघू मनांतनं गडबडला होता. तो म्हणाला, " आतां नो डिस्कशन ! एकदा ठरल ना—हा प्रश्न चंची-क्लबात येत नाहीं म्हणून. "

" तर तर – तूं नुसतं बोललास कीं ठरलं वाटतं. "

पण तेवढ्यावर बैठक मोडून रघू उठला देखील.

त्या वेळीं चर्चा बंद करून रघू उठून गेला तरी आपल्या पाठीमागं ' या जोशाचीं छपन्न लफडीं अन् सत्तावन भानगडी' असं एक-दोघांचं म्हणणं त्यानं ओझरतं ऐकलंच. त्यापेक्षाही अधिक म्हणजे इतरांना त्यानं चर्चा बंद करायला लावली असली तरी त्याच्या मनांत दबून राहिलेली शंका त्याला डिवचूं लागली. गावातल्या हॉस्टेलमधल्या मुलींचें नांव पुढं करून यमूनं खरोखरी बापूबरोबरच सिनेमा पाहिला याविषयीं त्याला संशय नव्हता. त्यामुळं अखेरी एक्स्टेंशनमधल्या बगल्याची ओढ दिखाऊ का होईना इनामदारीकडेच आहे असा त्याचा पक्का ग्रह झाला होता. अन् एक वेळ कादंबरींतला ' व्हिलन् ' बनून बापूच्या इनामदारीचा बुडबुडा यमूजवळ फोडावा असाही बेत त्यानं केला होता. पण त्यातला कच्चेपणा फार लवकर त्याच्या ध्यानांत आला. बापूनं कांहींच बनवाबनवी केली नव्हती. उलट तो थोडासा हुरळला होता. यमूनं मात्र घरच्या माणसाना कळूं नये म्हणून असो, कीं रघूला डिवचण्या-साठीं असो, होस्टेलची कहाणी रचली होती आणि नंतर जणूं कांहीं झालंच नाहीं अशा रीतीनं ती रघूशीं पुनः बोलूं लागली होती. त्यामुळं तो अधिकच बुचकळयात पडला होता. तशा स्थितींत ' चंची-क्लबा 'तल्या उल्लेखानं त्याला उगीचच डिवचलं.

—त्यामुळं त्याचीं पावलं आपोआप त्या दिवशीं बापटांच्या बंगल्याकडं वळलीं. आणि आज तो अशा वेळीं बंगल्यांत पोंचला कीं त्यावेळीं चंदू नेमका क्लबांत गेलेला होता. रघूनं मुद्दाम दारावरची घंटा मोठयानं वाजवली. जिन्यानं यमूच्या खोलीपाशीं पोंचल्यावर दारावर चांगला ' टक् टक् ' आवाज

केला. " कम् इन् " शब्द ऐकल्यावरही थोडा वेळ तो स्वस्थ उभा राहिला आणि यमून पुढ होऊन दार उघडल्यावर सावकाश आत जाऊन लाब टेबलाजवळच्या खुर्चीवर बसला – स्वस्थ बसला. चार-पाच मिनिटं तरी काय बोलायचं हें त्याचं त्याला समजेना. आपण आज इथ कां आलों हेंही त्याला सागता आलं नाहीं.

" आज काय मौनाचा वार आहे वाटतं ? माझ्या इथं पाटी-पेन्सिलसुद्धां नाहीं. " यमू हसत हसत म्हणाली.

" मी अजून मौन पाळण्याची जरुरी वाटण्याइका मोठाही झालों नाहीं की पुढाऱ्याप्रमाणं व्याख्यानं झोडायलाही शिकलों नाहीं. "

" अजून नाहीं ? म्हणजे पुढ मागं तसा विचार दिसतोय् ! हो, तसं आधींच कळलं म्हणजे बरं. मोठ्या माणसाच्या आठवणी अन् आख्यायिका प्रसिद्ध होतात. त्यासाठीं नोट्स् तरी काढून ठेवायला सुरुवात करता येईल."

" तेवढा तरी मी आठवणींत आहे म्हणायचा ! "

" वा ! हें काय भलतंच ? मोठ्या माणसांच्या आठवणी का कधीं विसरतात ? पण आपला इतिहासाला धक्का नको म्हणून लेखी नोट्स् ठेवायच्या. एकींकडून आता सुरुवात झालीच आहे भोंवतीं भगत--गण जमा करायला. कसला क्लब आहे तो ? चंची क्लबच नाहींच का ?

" त्याच्यावर कां आता तुमची संक्रात वळली ? "

" संक्रांत नाहीं ग बाई. पण आपली एक सूचना करू का ? – चंची क्लब हें नाव कांहीं तितकसं शोभत नाहीं. आधीं मेलं आहे थोडसं चमत्कारिक अन् दिसतं फारच साधं; मोठ्या माणसांचा लौकिक म्हणजे सगळं कसं ' अलौकिक ' आणि दिव्य' असायला हवं."

" मग तुम्हीं शोधलंय का एखादं ? "

" मी ? मला कसं तें जमेल ? एरवी मी चांगली प्रशस्त असले तरी ' तसला ' मोठेपणा कुठं आहे माझ्याजवळ ? आणि अलौकिक नांवं मोठ्या माणसांच्या तोंडून अचानक साक्षात्कार होऊन बाहेर पडावीं लागतात. एरवीं आम्हींही आमच्या 'लेडीज् रूम'मध्यें बाईलबुद्धीनं हवीं तितकीं नांवं ठेवीत असतोंच म्हणा ! "

" त्यांतलंच एखादं चालूं शकेल – निदान चालतंय का पाहूं तरी ? "

" भलतंच ! तीं नांव उच्चारलीं तर मोठं पाप होईल. "

" हें तर फारच छान ! असं पाप जगांत वाढल्याशिवाय मोठ्या लोकाना मोठेपण दाखवायची संधि मिळेल कशी ? तेव्हां आता घट्ट द्यात थोडसं पाप— "

" तर तर ! उद्यां तेवढंच घेऊन भांडायला याल आमच्या 'रूम'वर अन् मी गुपित फोडलं म्हणून बाकीच्या माझी चागली करतील. "

" तशी भीति नको ! मोठीं माणस काही भांडत नाहींत— "

" खोटं ! नुसती भांडत नाहींत. चांगली अढी धरून बसतात.

" कारणाशिवायच ? "

" अर्धवट माहितीवर— "

" मग आपण तडजोड करूं या. तुम्ही तुमच्या लेडीज् रूममध्यें आमच्या क्लबचा काय काय उद्धार करतां ते सागा अन् मीही तुम्हाला क्लबमधली आजची गंमत सांगतों – तुमच्या बद्दलची. "

—आणि नंतर यमूनं त्याला या चंची क्लबाला ' कुटाळ कंपू " पासून ' स्त्री द्वेष्टे ' पर्यंत मिळालेलीं निरनिराळीं नाव आणि ' बिचाऱ्या आपट्यानं ' अनाहूतपणें कमावलेली महानुभूति याच्याबद्दल सागितलं अन् रघूनंही तिला बिळासकराच्या खवचटपणान दोघाची झालेली चेष्टा ऐकवली. त्या ओघांतच त्याला कळून आलं कीं यमूला कल्पना नसताना बापूनं 'माणूस' चित्रपटाचीं दोन तिकिटं काढून तिला अचानकपणें सिनेमाला बोलावलं होतं. तिला वाटलं बापू इतक्या धीटपणें बोलावतो तो बरोबर रघू असेल म्हणूनच. त्या नादात ती सरळ थेटराकडे गेली. आणि तिथं बापू एकटाच पाहून मख्खासारखी अडीच–पावणेतीन तास बसून स्वतःवर चिडून परत आली. अचानक रघूला आपल्या खोलींत अंधारांत बसलेला पाहून साऱ्या पुरुष जातीबद्दल उसळून तो राग तिनं रघूवर काढला होता—

तरुण स्त्रियांच्या मनाची जवळून आणि सूक्ष्म कल्पना नसलेल्या रघूनं हें सारं बिनतक्रार मान्य केलं. थेटरवर रघू दिसला नाहीं तेव्हां यमू तिथनंच

परत कां फिरली नाहीं अशी शंकासुद्धां त्याला आली नाहीं. उलट नेहमीच्या संवयीप्रमाणं. आपणच काहीं तरी नसती कल्पना करून घेऊन डोकं पिकवून घेत होतों असं स्वतःचं समाधान करीत तो बंगल्यातून बाहेर पडला.

× × ×

जूनियरच्या वर्षांत खूप मजा करायची अशी बापूची इच्छा होती. नाताळच्या सुटींत चार-पाचजणानीं मिळून विजापूरची ट्रिप काढावी असा बेत त्यानं आखला होता. पण घरचं अचानक पत्र आल की, 'यंदा गुऱ्हाळ लवकर उरकून सुरवातीचा चढाभाव पदरांत पाडून घ्यायचं ठरलं आहे. अप्पांची तब्येत ठीक नसल्यामुळं गुऱ्हाळाला यायलाच पाहिजे म्हणून नाताळच्या सुटींतच गुऱ्हाळ लावायचं ठरलं आहे ' या पत्रानं बापू अगदी मलूल होऊन गेला. आपलं खेडवळ जिणं आपल्याला मजा करून देत नाहीं म्हणून त्याला फार वाईट वाटलं. खरं म्हणजे त्याचा बेत होता रघूकडून चंदूला भरीला घालायचं अन् 'स्टाफ मेंबर' बरोबर आहे म्हणून यमू आणि जमल्यास तिची एखादी मैत्रीण यांनाही सामील करून घ्यायचं—

अखेर विजापूरची ट्रिप रद्द झाली तर झाली; निदान आपल्याला हवीं तीं माणसं आपल्या गावीच न्यावीत असा बेत करून बापूनं रघू अन् कांतिलाल यांच्या मध्यस्थीनं बापट मंडळींना आपल्या गुऱ्हाळाचं आमंत्रण दिलं शास्त्राच्या ओढीनं चंदू बापट चटकन् तयार झाला— अन् मग यमूही.

इनामदाराच्या वाड्यांत आलेल्या या पाहुणींनं गावात बरंच कुतूहल निर्माण केलं. " बापून कांहींतरी परस्पर भानगड करून इनामदाराच नाक कापलं अन् हुंडाही गमावला. आता तर भाऊ तिला घेऊन सरळ दम-दाटीनं लग्न उरकणार आहे; " अशी गांवात चर्चा चालली होती. तर पाहुणे मंडळींच्या गैरहजेरींत अप्पा आणि आत्याबाई ' हें काहीं ठीक लक्षण दिसत नाहीं ' असं म्हणत होते.

या पाहुण्याच्या येण्यानं सगळ्यांत आनंद झाला होता कमळीला. शहरां-तल्या वातावरणापासून तीन वर्षे वेगळी पडल्यापासून तिला कुणाशीं मनमुराद बोलायला मिळालंच नव्हतं. बापू तिच्या बाबतींत पुष्कळ निवळला असला तरी त्याला स्वतःला म्हणून तिची ओढ नव्हती. बरोबरीच्या मुलींचीं किंवा

बायकांचीं लग्नं, मंगळागौरी अन् डोहाळजेवणं याशिवाय विषयच नसल्या-मुळं कुणाकडे बसायला जाणं नको असं तिला होऊन गेलं होतं. आत्याबाई–अप्पा तर गळयाला लागलेली कार्टी म्हणून शिडाशेडी करीत— त्यांतून आत्याबाईंच्या पुतण्याचं स्थळ कमळीनं नाकारल्यापासून ती अगदींच भिकार लक्षणाची ठरली होती. एकुण कमळीला मन उघडं करायला मिळालं नव्हतं. म्हणून यमू आल्यावर, आपल्या वर्गसोबतिणीची बहीण, आपल्या शाळेंतली एक मुलगी भेटली यानं कमळीला भरत आलं. दोन दिवस दोघींनीं हायस्कुलातल्या आपल्या जुन्या आठवणींना, खास मुलींच्या खोलींत चालणाऱ्या थट्टामस्करीला उजाळा दिला. आपल्या बोलण्यात लग्नाचा, पुरुषांचा म्हणून विषयसुद्धा येऊं द्यायचा नाहीं असं न ठरवता सुद्धा कितीतरी वेळ या विषयांचं अस्तित्व विसरून त्या रमून गेल्या. आणि त्या हितगुजाच्या भरात यमू खेड्यात वाटणारा अवघडपणा काहीं वेळ विसरून गेली.

गुऱ्हाळाची नव्हाळी दोन–तीनदा पाहिल्यावर यमू आणि कांतिलाल याना त्या चिकचिकींत जाण्याचा कंटाळा आला. त्यानीं कमळी–रघूच्या बेताप्रमाणें नदीवर अंघोळीला जायचा कार्यक्रम आखला. पोरं-पोरी एकदम अंघोळीला जाणार ही कल्पना अप्पा–आत्याबाईंना डोळे मोठे करायला पुरेशी होती. पण हीं सारीं आतां त्याच्या डोळयांत न मावण्याइतकीं मोठीं होऊन बसलीं होतीं! ‘शहरचं वारं बरं हें!’ म्हणून बोटं मोडीत बसण्यापलीकडे त्याना कांही करतां येईना. नदीच्या घाटावरल्या गर्दीत उगीच चर्चेचा विषय व्हायला नको म्हणून मुद्दाम घाटापासून थोड्या लांबच्या ठिकाणीं ही चौकडी गेली. पण तिथं पोंचल्यावर यमूचा उत्साह खलास झाला दोन्ही बाजूंना बायका-पुरुषांची सरमिसळ गर्दी असताना अंघोळीला नदींत उतरणं ही गोष्ट बाथरूमचीं दार बंद करून अंगावर पाणी ओतून घ्यायची संवय असलेल्या यमूला कशीशीच वाटली. रघू, कांतिलाल आणि कमळीसुद्धा कमरेइतक्या पाण्यांत पोंचून तिची वाट पाहूं लागले. पण ती बसून राहिली. ‘अजून थंडी गेली नाहीं अंगांतली – थोडं ऊन खातें इथंच’; असं कांहींतरी तिनं सांगितलं.

‘येऊं देत सावकास. आपण पोहायला लागूं या’ म्हणून रघूनं प्रथम पाण्याखालीं सारं अंग दडवून अन् नंतर नुसतं डोकं वर काढून हात

मारायला सुरवात केली. तो चार हात पुढं जातांच कमळीनं त्याचं अनुकरण केलं. दोघंही मागं पाहत नव्हतीं. कांतिलालनं उगीच दोन पावलं पुढं टाकलीं न टाकलीं असं करून, नाका-कानांत बोटं घालून शास्त्रोक्त बुडी मारली आणि नंतर अंग चोळीत तिथंच उभा राहिला. मध्यावर गेल्यावर रघू–कमळींनं पाहिलं कीं आपण दोघंच इतके पुढं आलों आहोंत. मागं वळून पाहिल्यावर त्यांच्या दृष्टीला पडलं — कांतिलाल जागच्या जागीं उभा होता अन् यमू अजून ऊन खात होती. इकडे यमू कांतिलालला विचारत होती, ‘ तुम्ही कां गेला नाहींत पोहायला ? ’ कांतिलालनं मोघम उत्तर दिलं, “ रात्रीच्या शेतातल्या वाऱ्यानं मला सर्दी झाली आहे. अन् इथल्या नदीचा मला माहिती पण नाहीं. ”

आपण अर्ध्यावरनंच परतावं अशा विचारांत कमळी होती तंवर रघूनं पुढं हात मारायला सुरवात केली. त्याला मागं वळायला सांगायसाठीं म्हणून कमळी पुढं निघाली ती दुसऱ्या काठावर पोंचल्यावर थाबली. रप् रप् हात मारीत रघू बेदरकारपणें पुढं गेला होता. त्याच्याशीं बोलायइतक्या जवळ जायची संधि कमळीला पलीकडच्या कांठाला पाय लागेपर्यंत मिळालीच नाही. नंतर मात्र ती अगदीं भेंडाळून गेली. तिनं रघूला तें सांगितलंसुद्धा.

पलीकडच्या मळींतल्या विरळ शेवऱ्यांत गेल्यावर रघूनं विसाव्यासाठीं नदी-कांठचा तांबडमातींत चक्क लोळण घेतली अन् तो उताणा पडून राहिला ! कमळी संकोचानं पाय मुडपून बसली होती. तिची नजर अलीकडच्या काठावर रोखली होती. तिनं पाहिलं तेव्हां कांतिलाल पाण्यांतनं वर निघाला होता आणि नंतरच यमू घाबरत घाबरत एकेक पाऊल टाकीत पाण्यांत उतरली होती.

रघू मॅट्रिक झाल्यानंतर कमळीला त्याच्याशीं बोलण्याची जवळ जवळ मुळींच संधि मिळाली नव्हती. गेल्या दोन वर्षांत तिच्या दाखवण्याची जी परवड झाली होती त्याची रघूला कांहींच कल्पना नव्हती. कमळीला इतकं सांगायचं होतं कीं — पण कुठं अन् कशी सुरवात करावी हेंच कळेना ‘ बरं झालं— पाहुण्यांच्या निमित्तानं तरी गांवचीं माणसं गांवांत असतात तें कळलं ’ ती कसंतरी बोलून गेली. ‘ हं ! ’ एवढंच रघूनं उत्तर दिलं. “ हल्लीं बापू कधीं तरी आम्ही दोघंच असलों म्हणजे कांहीं कांहीं सांगतो — त्यावरनं कळतं.” कमळीनं

पुनः बोलणं उकरून काढलं. " बापूनं माझी किती बदनामी केली हें एकदां त्याला विचारलच पाहिजे." रघूनं कांहीं तरी उत्तर दिलं.

" माझ्यापाशीं बदनामी करून त्याचं भागायचं नाहीं हें कांहीं मीं सांगायला नको. अन् हल्लीं अप्पा न् आत्याला आम्हीं दोघं बरोबरीनं तोंडी लावणं झालोंय्." कमळी अभिमानानं म्हणाली.

" पण दोघं काय अन् तिघं काय ? हायकोर्टाचा निकाल ठरलेला—"

" नेहमींप्रमाणं माझ्याविरुद्ध." आणि मग जुन्या आठवणींनीं खदखदून तीं दोघंही पोटभर हसलीं अन् त्या भरातच परत निघालीं.

— इकडे यमूच्या त्या घाबरत घाबरत पाण्यांत उतरण्याची कातिलालला गंमत वाटली अन् तो एकदम म्हणून गेला, " पुढं जा की थोड्या – इतक्या घाबरताय काय ? " माडीएवढ्या पाण्यांत थाबलेली यमू एकदम दचकली. ' हें काय – तुम्ही इकडे पाहूं नका ' अस थोडसं रुष्टपणानं म्हणत यमूनं तिथंच गळ्यापर्यंत बुडी मारली. पाण्यांतल्या पाण्यांत अंगाला साबण लावतांना आणि आपल्याकडे कोणी पाहत तर नाहीं ना हें हेरण्यासाठीं चोहीकडे नजर फिरवताना ती अगदीं कावरी-बावरी झाली. अंघोळ आवरून कांठावर परत येण्यासाठीं ती उभी राहिली तेव्हां तिन दुसऱ्या काठाकडे पाहिलं. रघू अन् कमळी जवळ जवळ मध्यावर आलीं होतीं. त्याचीं डोकीं तेवढीं वर दिसत होतीं. पण इतक्या लांबून पाहतांना तीं इतकीं जवळ जवळ दिसलीं कीं यमूचं अंग शहारलं. डोकीं इतक्या जवळ आहेत तर पाण्यांत काय अंगाला अंग खेटून पोहताहेत ! —तिला हें सारं विचित्र वाटलं. खेडेगांवातला हा अवखळपणा फारच चमत्कारिक म्हणायचा !

जसजशी रघू अन् कमळी जवळ येऊं लागलीं. तसं कुठं यमूच्या ध्यानात आलं कीं तीं दोघं पोहतांना एका रेषेंत असलीं तरी त्याचं पोहणं मागं पुढं होतं अन् दोघं चांगली सात-आठ हातांचं अंतर ठेवून पोहत होतीं. पण हें अंतर पहिल्यापासूनचं कीं कांठाजवळ यायला लागल्यावर मुद्दाम पाडलेल, ही शंका तिला टोचत राहिलीच.

कपडे बदलतांना आपली झालेली धांदल आठवून यमू कमळीकडे निरखून पाहूं लागली. पण पाण्यांतून पुरती बाहेर न येतांच काठच्या दगडावर उभी

राहून बाकीच्या जगाची दखल न घेतां कमळीनं साडी-चोळी बदललेली पाहून तिला आश्चर्य वाटलं. घरीं गेल्यावर तिनं कमळीला याबद्दल विचारलंसुद्धा. पण कमळीच्या उत्तरानं तिला अधिकच बुचकळ्यात पाडलं — कमळी म्हणाली, "अग मी एकटीच का नदीवर अंग धुणारी असतें. इतक्या सगळ्या बायकांत माझ्याकडेच तेवढं कुणी निरखून पाहत असेल अशी समजूत मी कशाला करून घेऊ ? आम्हाला लहानपणापासून संवय असते. अन् दुसरं म्हणजे अशा संकोचानं अन् लाजेनं घरात अंग धुवायच तर अर्ध्या घागरींत कावळ्यासारखं खुडखुडायला पाहिजे अन् तेंसुद्धां स्वतःच्या कमरेवर घागर घेऊन नदीच्या या चढासनं पाणी नेल्यावर — त्यापेक्षा हें बरं."

"म्हणजे काय सगळ्या घरच्या बायकांना कडेवरनं पाणी न्यावं लागतं ? हा जुलूमच आहे म्हणायचा !"

"अग बायकानीं कडेवरनं नेलं काय अन् पुरुषांनीं खांद्यावरनं नेलं काय ! पाणी भरायचं काम हें कुणी तरी केलंच पाहिजे. त्याला जुलूम म्हणून तें थांबणार आहे थोडंच."

"त्यापेक्षा बोरिंग — निदान आड काढावेत."

"माझ्यापाशीं बोललीस तेवढं बोललीस यमू. बाकी कुणाजवळ बोललीस तर सारीजण हसतील तुला. अग कृष्णेचं वाहतं पाणी सोडून आडांतलं सांठवणीचं अन् खारट तुरट पाणी हवंय कुणाला ? आणि त्यासाठीं मुद्दाम हजार-दीडहजार रुपये खर्चायची ऐपत तरी कुणाची आहे खेडेगावांत."

"तुम्हाला काय कमी आहे ? गुळाचे एवढे पैसे येतील, त्यातून एक वर्षी काढावा आड नाहीं तर बोरिंग—"

"आम्हाला अजूनपर्यंत तरी त्याची कधीं गरज पडली नाहीं." कांहीं तरी बोलायचं म्हणून कमळी म्हणाली अन् तें हसण्यावारी नेतां यावं म्हणून पुढं यमूकडं निरखून पाहत तिनं भर घातली. "आतां आमची वहिनीच आणली बापूनं शहरांतली — नदीच्या पाण्याची संवय नसलेली — तर कदाचित् या वाटेला जावं लागेल हें मी बापूला सांगून ठेवीन." कमळीच्या बोलण्यापेक्षां तिच्या पाहण्यानं यमूला कुठून हा विषय काढला असं होऊन तिनं दुसरा विषय काढला अन् आपल्याला कमळीच्या त्या बोलण्याशीं काहीं कर्तव्य नाहीं हें सुचवलं.

आंघोळीसनं परत निघायच्या वेळेलासुद्धां यमूला धक्का बसला होता.

" हें काय ? अशा उन्हातनं तूं अनवाणी का चालणार कमल ? चपला आणायच्या नाहींस का ? " यमूनं विचारल होतं.

" वा ! चपला घालून पाण्याची ही कळशी घरांत कशी चालेल ? "

" अग पण हें असलं ऊन, हे वाळूचे खडे अन् पलीकडची रेती— पायाचं काय होईल त्या ? "

" त्याना रोजचंच आहे हें. इतकं हळूबाई होऊन चालत नाहीं इथं—"

त्या वेळीं रघू त्याच्यातून फुटून केव्हांच आपल्या देवळाच्या वाटेला लागला होता. कांतिलालला नाइलाजानं का होईना अंतर ठेवून चालावं लागत होतं. त्या दोघींच्या बोलण्यातसुद्धा नदीची चढण लागल्यावर खंड पडला. कळशी कमळीच्या कडेवर होती पण धाप यमूला लागली होती. वाड्यात पोंचल्यावर, माडीवर जाऊन तिनं चक्क अंग टाकून दिलं अन् ती कमळीला म्हणाली, " पुरे बाई, तुमचं नदीचं सुख. पुनः काहीं मी नांव काढायची नाहीं. "

× × ×

दुसऱ्या दिवशींच यमूनं परतायची घाई सुरू केली. आता तिचं मन खेडेगांवात रमेनास झालं. कमळीन खूप आग्रह केला. सुट्टी संपेपर्यंत रहायचा कार्यक्रम ठरला आहे असं कांतिलालनं सांगितलं. चंदू आपण होऊन ' आणखी थोडे राहूं या ' म्हणाला. पण यमूचा हट्ट कायम होता. ' तुम्ही कोणीच येणार नसाल तर मी एकटी जाईन. मला स्टेशनची वाट सापडेल ' असंसुद्धां ती म्हणाली. " पण आमच्या येथून तुम्हाला एकटं जाऊन देणार नाहींत. " बापूनं टेवणींतली अडचण सांगितली. तेव्हां, " जोशाचं काहीं गुन्हाळ नाहीं. ते येतील माझ्यासोबत " असं यमूनं उत्तर दिल अन् त्या दिवशीं संध्याकाळीं रघूची गांठ पडल्यावर त्याला ' उद्यां निघायचं ' हा बेत सांगून पक्कादेखील केला—

कृष्णंभटजीना रघूच्या बेताची काहीं कल्पना नव्हती. इनामदारांच्या मंडळींत तो मिसळतो हें ठाऊक असलं, तरी तें सारं [illegible] आणि तेवढ्यापुरतंच म्हणून भटजी खपवून घेत होते. पण सुट्टी संपायला चार दिवस

अवकाश असतांनाच परत जायचा त्याचा बेत काहीं भटजींना आवडला नाहीं. त्यानी बाळाकडून रघूला सुट्टी संपेपर्यंत रहायला सागून पाहिलं. रघूनं तें ऐकल्यावरहि आपली तयारी चालू ठेवली. " परीक्षेचा अभ्यास राहिलाय्. येणारच नव्हतों पण पाहुण्यांच्यासाठीं याव लागलं—" असं काहीं तरी तो दारांतून बाहेर पडतां पडतां उच्चारून गेला.

तेवढ्यांतल्या तेवढ्यात इनामदारांची पाहुणी जायची म्हणून आत्याबाईनीं आग्रह करून बैलगाडीची व्यवस्था केली. " यायच्या वेळेला बापूनं बैजवार कळवलं असतं तर गाडी पाठवली असती – पण त्याला सुमारच नाहीं. " ही बापूची संभावनाही पाहुण्यांच्यासमोर झाली. गाडींत बसून जाताना पादीतल्या ढेकळावरनं गाडीला जे हादरे बसत होते त्यानी यमू खिळखिळी झाली; आणि निदान येतांना तरी गाडीचा सरजाम नव्हता म्हणून तिनं मनातल्या मनात बापूचे आभार मानले. गाडीच्या हिसक्यानं ती एकदोनदा कोलमडायलासुद्धा लागली होती – रघूनं दंडाला धरून सावरलं म्हणून डोक्याला टेंगूळ यायचं राहिलं एवढंच. प्रथम तिला रघूच्या त्या वागण्याचा अचंबा वाटला होता; पण पुढच्या संकटाची कल्पना आल्यावर ती थंड झाली आणि गाडीला निदानीं घोंगडीचं झाकण आहे हें पाहून त्या भकास रस्त्यावरसुद्धा वाटणारा तिचा संकोच पुष्कळ कमी झाला. तरी ती कांहीं बोलली नाहीं. स्टेशनावरनं गाडी सुटेपर्यंत अगदीं चूपचाप बसली होती. इनामदारांच्या भाग्यागड्यानं " पाहुणीला गाडींत बसवून दिली " हा आपल्या कामगिरीचा रपोट देताना दुसरे पाहुणे नाहींतसे बघून थोडी फोडणी दिली— " पाक हत गाडींत बसल्याधरनं आगीनगाडी चालाया लागस्तवर अंग आंकडून गप्प बसली हुती पावनीबाई; आनिक रघुनाथबी गप गप हुता. नव्या न्हवरा-न्हवरीबानी दोगबी गेली जनूं—" त्याच्या या फोडणीनं ' भाग्या ' म्हणून बापू ओरडला अन् " चल, मूर्खासारखं काहीं तरी बडबडू नकोस " म्हणून कमळीनं त्याला चापलं.

आगगाडीनं एक स्टेशन मागं टाकलं तेव्हांच यमूचं तोंड उघडलं— " काय हें तुमच्या इनामदाराचं गाव ! आधी तिथं पोचायलाच सतरा विघ्नं ! अन् तिथं गेल्यावर तरी काय – शिस्त म्हणून कांहीं नाहींच. एक दीड वाजतां जेवायला मिळालं म्हणजे फार लवकर झालं म्हणायचं ! आणि गुऱ्हाळासाठीं

म्हणून काय ती भाकऱ्याची चवड बडवणं, तें नदीचं अवघड पाणी—पुनः या गांवाचं तोंड पाहणार नाहीं मी जोशी—"

"का हो, आमच्या गांवावर इतका राग ! अजून तिथलं अन्न आहे पोटांत तोंवर तरी इतका त्याचा राग धरूं नका—"

"मी काहीं तिथल्या अन्नावर रागावलें नाहीं कीं माणसांवरही नाहीं; पण अकराच्या आत आचवायची अन् जन्मभर नळाच्या पाण्याची संवय असलेल्या माझ्यामारखीला हा चार दिवसांचा पाहुणचारसुद्धां नकोसा झाला. आणि तो खेड्यातला भरमसाटपणा आणि गबाळेपणा मला मुळींच सहन व्हायचा नाहीं. बाकी सार आयुष्य शहरात गेल्याशिवाय माझं म्हणणं कळणार नाही म्हणा ! "

"अन् सारं आयुष्य खेड्यात गेल्याशिवाय त्यातली गंमतही कळायची नाहीं हें तितकंच खर. १० × १० च्या खोलींत भाडें परवडण्यासाठीं जोडीदार घेऊन राहताना आम्हालासुद्धा शहरात असंच गुदमरल्यासारखं होतं "

"वा ! त्या इनामदारांची गोष्ट एक सोडा. त्यांचा वाडा, जमिनी त्याना इथं परत खेंचून आणतील. पण तुम्हाला कसलं एवढं आकर्षण आहे खेड्याचं जोशी ? तुमच ना तिथं घर, ना जमीन. मग तुम्हांला का एवढं प्रेम गावाचं ? "

"माझं प्रेम घरा-जमिनीवर नाहीं. पण माझा पिंड तिथं पोसलाय् त्या पाण्यानं, त्या मातीनं मला घडवलाय्. पोटासाठीं बहुधा आपलं गांव मला कायमचं सोडाव लागेल. पण त्यामुळं मी तें विसरेन किंवा माझ त्याच्यावर प्रेम कमी होईल असं मात्र नाहीं—"

"ओ हो ! तुम्ही मोठ्या तत्त्वज्ञानात शिरायला लागलात. मला त्याच्याशीं काहीं कर्तव्य नाहीं. मी आपलं रोजच्या राहण्यापुरतं बोललें. "

"एवढी तरी मेहेरबानी आहे म्हणायची ! नाहीं तर मला वाटलं होतं कीं कांही लोक खेड्यांत चला म्हणून घोषणा करताहेत तशा तुम्ही आतां "खेड्यातून चला" अशी एखादी नवी घोषणा जाहीर करणार कीं काय ? "

" तर तर ! करा माझी चेष्टा – पण घोषणा करायला ' मोठं माणूस ' व्हावं लागतं. " मागच्या बोलण्याची आठवण येईल अशा सुरांत यमू म्हणाली—

" आता काय आमच्यावर अन् आमच्या क्लबावर वळली वाटतं दृष्टि ? "

" छे बाई ! मी कशाला तुमच्या त्या पुरुषी क्लबाच्या वाटेला जाऊं ? पण आता तुमच्याकडूनच विषय निघालाय् म्हणून विचारतें, यंदा तुमचा बेत काय आहे ?—"

" कशाबद्दलचा तें स्पष्ट करा नाहीं तर नुसतं ' बेत काय ' म्हटल्यास त्याचा अर्थ आमच्या खेडवळ भाषेंत वेगळाच होतो आणि तो तुम्हाला उगीच अडचणीत टाकील—"

" कळूं द्यात तरी तुमचा खेडवळ अर्थ ? "

" माझा नव्हे. आमच्या खेडवळ भाषेचा. खेड्यातला स्थळांची चौकशी करायला निघालेला मुलीचा बाप पहिल्यादा तुमचा प्रश्न विचारून ' यंदा कर्तव्य आहे कीं नाही ' तें वरपक्षाकडून समजावून घेतो."

" पण मी काहीं मुलीचा बाप नव्हे. मीं आपलं सरळ विचारलं, तुम्ही सारखे त्या क्लबात गुरफटलेले असता, तेव्हा यंदा अभ्यासाचा बेत आहे की नाही ? कीं तुम्हीही आपल्या गावच्या सगळ्या शहाण्या माणसासारखे ' पाहुणी ' आली की ती कुणाची बायको व्हायला आली अशा वृत्तींत शिरलात ? "

" अरे बापरे ! अजून आमच्या गावावरचा राग कांहीं गेलेला दिसत नाही. "

" पण मीं विचारल त्याचं उत्तर द्याल कीं नाहीं—"

" अभ्यास काय; चाललाच आहे ! जूनियरच्या वर्षांत चालायचा तसा "

" छान ! हा अप्पलपोटेपणा बरा नाहीं. तुमची मदत होईल म्हणून मीं मराठीच्या जोडीला इंग्रजीऐवजीं संस्कृत घेतल. अन् तुम्ही मात्र एकटे अभ्यासाचा फडशा पाडून मला तोंडघशीं पाडा. तो ' काव्यप्रकाश ' उघडला की काटाच येतो माझ्या अंगावर "

" इतकं काहीं भयंकर नाहीं त्यात. काव्यप्रकाश म्हणजे नुसत्या चटणी – कोशिंबिरीसारखा सपवायचा विषय. माफक आणि वर खमंग—"

" आम्ही स्कॉलर नाहीं म्हटलं तुमच्यासारखे. "

" हेंच पहा ना; ही तुम्हीं आतां दिलीत ती उपमा फोड करूं का इथच ? "

" चावटपणा नको. ही आगगाडी आहे म्हटलं. उद्यांपासून अभ्यासाला सुरुवात करायची. उद्यां दुपारीं बंगल्यावर या. "

" वा ! वा ! उद्यां बंगल्यावर यायचं. म्हणजे आज बंदीच काय ? "

" हें हो काय—"

गांवांत आल्यावर रघूला आपल्या खोलीवर एकदम जायचा विचार सोडून द्यावा लागला. सध्याकाळच्या जेवणालाही तो बापटाच्या बंगल्यात राहिला. तिथल्या बेतानं रघूची जी तिरपीट उडाली त्यावरनं त्याला यमूचे इनामदारांच्या इथं काय हाल झाले असतील याची कल्पना आली. बायका-पुरुषाचं एकत्र जेवण – जेवण कसलं, पानावर बसून सुपारीएवढा भात आणि अर्धी पोळी चाखत माखत खातांना ' भूक नाहीं, चव नाहीं.' या सबबींचा उच्चार यमू, तिचीं धाकटी बहीण-भावंडं सारखा करीत होती; आणि रघूचं पोटभर जेवण होतांना त्याला संकोच वाटूं नये म्हणून पानावर बसून रहायची धडपड करीत होतीं. रघूचं जेवण त्या सगळ्याच्या मानानं भरपूर होतंच – आणि यमूचे धाकटे बहीणभाऊ पांच मिनिटानं पानावरन उटल्यावर 'तुम्ही सावकास जेवा – तीं तसलींच ! ' अशी संपादणी करतांना यमूची अन् तिच्या आईची भलतीच तारांबळ उडाली होती तिथलं जेवण पोटांत ढकलतांना रघूला त्या जगाचा वेगळेपणा अगदीं निराळ्या संदर्भात समजूत आला.

मग मात्र तो तिथं थांबला नाहीं. चंदूची खोली रिकामी होती. स्वतःच्या खोलीवर आठ दिवसाचा धुरळा सांठलेला असणार. पण हीं सारीं कारणं त्यानं धुडकावून लावलीं. अन् तो आपल्या खोलीवर आला. यायच्या आधीं यमूनं त्याला ' काव्यप्रकाश 'च्या शिकवणीची आठवण करून दिली. त्या शिकवणीचा विचार करता करतां त्याला कातिलालच्या शाळेंतल्या शिकवणीची आठवण झाली. माधुरीचा ' प्यारी मोहब्बत ' सिनेमा दिसूं लागला. कृष्णेच्या पात्रांतलं तें सरसर पोहणं, ताबडमातींत लोळत असताना " माझ्यापाशीं बदनामी करून त्याचं भागायचं नाहीं " ही कमळीची ग्वाही, गाडीचा धक्का

बसल्यावर ओढलेला मामल गोरा दंड, विजापूरच्या गोलघुमटाची ट्रिप, कुणाच्या तरी थडग्याचं दर्शन. 'कशाला उद्याची बात'—'सुटी संपपर्यंत रहा ना' म्हणणारा बाळचा किरकिरा आवाज – चंची कुत्रात 'टू इज् कंपनी' वर बिळासकर पाटलानं केलेलं भाष्य, पांडुरंग सावंताचं आयत्या पैशावरच्या हक्काचं तत्त्वज्ञान – पाणवठ्याच्या मळींत उताणं पडून पाहिलेली अंग चोरून बसलेली कमळी—

आढ्याकडे पाहत रघू मागंपुढं आडवा-तिडवा भरकटत होता. आढ्यावर दोन कोळ्याचीं जाळीं जवळ जवळ विणलेलीं दिसूं लागलीं त्यानं रघूला 'एका कोळियानें—' या मराठी शाळेंतल्या कवितेची आठवण झाली. कविता—'अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी पिंगळा' कोण ही पिंगला? कोरगावकर बुवांची शिदोरीच उपयोगी पडते. काव्यप्रकाशातला तिसऱ्या उल्लासातला शृंगार, तिथं कोणती शिदोरी? भरकटतां भरकटनां रघूला केव्हा झोप लागली तें कळल नाहीं.

× × × ×

परिक्षेचे पेपर लिहितांना रघूच्या अंगांत एक प्रकारची मस्ती आली होती. सारे प्रश्न किंवा प्रत्येक उत्तर त्याला हवं तसंच होतं असं नाहीं. चार-दोन वेळां तरी गडबडगुंडा करून वेळ मारून न्यायचा प्रयत्न त्यालाही करावा लागला होता. पण तें करताना रघू भाबावला नाहीं. परीक्षकाच्या डोळ्यात आपण सफाईनं धूळ टाकली अशी त्याची खात्री होती. ही मस्ती अंगात बाणायला कारणही तसंच घडलं होतं. ऑनर्सच्या पेपरातला भाषांतराचा भाग म्हणजे बिनअभ्यासाची सोडत होती. सहजी बाण लागला तर लहान-सहान कसर तेव्हांच निघून जायची. नाहींतर अनुमानधबक्यानं बाकीच्या पेपराच्या बरोबर यायला धडपडायच अशी स्थिति. तो पेपर दुपारीं तीन वाजता होता. जेवण लवकर आवरून रघूनं सतरंजीवर अंग टाकलं. आदल्या दिवशीं जागरणामुळं डोळा लागला तर घोटाळा व्हायला नको म्हणून त्यानं पावणे-दोनाचा गजर लावून ठेवला अन् मग तो स्वस्थ पडला.

रघू जागा झाला तेव्हा गजराची शेवटची क्षीण किणकिण संपत आली होती. आपण परीक्षेच्या हॉलमध्यें नसून खोलींत झोपलों होतों हें ध्यानात

आपल्यावर त्याला आपल्या स्वप्नाची गंमत वाटली. ती गजराची किणकिण म्हणजे पेपर संपायच्या आधीं दहा मिनिट होणारी सूचक घटा समजून त्याची धादल उडाली होती. त्याआधीं त्यानं भाषांतराचा पेपर सबंध वाचला होता— किंवा पाहिला होता. त्यांतल्या दशकुमार–चरितामधल्या उताऱ्यानं त्याचं लक्ष वेधून घेतलं. तो सारा उतारा मागं एकदा मॅट्रिकच्या वेळी रघूनं चांगला तयार करून ठेवला होता. त्या वेळीं ते श्रम वाया गेले होते. आज नेमका तोच उतारा पेपरांत कां दिसला ?

त्या स्वप्नाशी चाळा करीतच रघू परीक्षेच्या हॉलमध्यें गेला. शेजारच्या एक-दोन विद्यार्थ्यांना त्यानं अर्धवट चेष्टेनं, अर्धवट गभीरपणें सांगितलं ‘ भाषांतराला दशकुमार येणार आहे ’ आणि प्रत्यक्ष हातांत पेपर पडल्यावर नुसता दशकुमारातलाच नव्हे तर सहीसही स्वप्नात पाहिलेला उतारा वाचून रघूला विस्मय वाटला ! साऱ्या परीक्षेंतली मस्ती एकवटून त्यान पेपर लिहायला सुरवात केली. झोपेमुळं आळसावून गेलेलं त्याचं अंग हलकं झालं – त्याचा विश्वास वाढला. एकट्या या पेपराच्या बळावर थापा मारून झाकलेली कसर भरून काढून पहिला वर्ग मिळवीन अशी हिंमत त्याला आली. सगळी परीक्षा संपून गेली तरी रघू अंतराळीं तरंगत होता. स्वतःचं दुबार समाधान करण्याकरतां त्यानं आपल्या साऱ्या पेपरांच्या मार्कांची बेरीज केली. पाचशेंदहाच्या ठिकाणीं निदान पाचशें पंचवीस मार्क मिळतील अशी त्याची खात्री झाली. पंधरा मार्कांच अंतर राखून पहिला वर्ग हातात आला अशा हुरुपात तो होता. त्या भरात त्यानं गावीं जायचा बेच चार दिवस पुढं ढकलला.

परीक्षा संपल्यावर तीन-चार वर्षांचे जोडीदार, वेगवेगळ्या वाटा फुटून विखरून जाणार म्हणून दोस्ताबरोबर अखेरची गंमत करीत होते. चर्चाक्लबचे उरले-सुरले चार लोक रघूच्या खोलींत एकत्र जमले. पंढरपूरकर जोशी म्हणाला, “ आता क्लब खराखुरा फुटला – बंद झाला. आपल्या रगीनं पान खात मजा मारणारा कंपू आता कॉलेजांत दिसायचा नाहीं यापुढं. ”

“ इतका रडूबाई होऊं नकोस. तूं काय कॉलेजचा ‘ लाइफ-मेंबर ’ होणार होतास ? ” रघूनं त्याला चिडवलं.

“ तसं नव्हे रे ! पण जाऊं दे. आतां आमचं आपलं पंढरपूर एके पंढरपूर. ”

" तें कसं काय ? तिथं राहून काय घंटा बडवणार आहेस ? "

" घंटा बडवील शाळेचा शिपाई. आम्ही आतां आमच्या 'अल्मा मेटरांत' मास्तरकी करीत बसणार. आमच्या हेडमास्तरानीं दिवाळीच्या सुट्टींतच सांगून टाकलं होतं—"

" हात् रड्या ! कांहीं हातपाय हलव. पुढं जायची हिंमत धर. "

" पुढं कुठं जाऊं ? मी तुझ्यासारखा स्कॉलर थोडाच आहे; कुठं तरी मास्तरकी नाहीं तर कारकुनीच आमच्या वाट्याला यायची. मग ती पाच रुपये कमी असले तरी गावच्या गावात राहून केलेली काय वाईट ? पाच मैलावर खेडं आहे. तिथल्या जमिनीवरही थोडंफार लक्ष राहील—"

" आणि असं बस्तान बसलं कीं, विठोबाच्या जोडीला एखादी रखुमाईही येईल. "

" तें व्हायचंच् रे. आमची ही थर्ड क्लासची बार्शी-लाईटची गाडी आहे. ती तशीच रें रें करीत चालणार – आम्हाला तिची पहिल्यापासून संवय झालेली आहे."

पंढरपूरकरानं आणलेला खिन्नपणा टाळायसाठीं म्हणून सगळ्यांनीं फिरायला जायचा बूट काढला. फर्ग्युसनच्या टेकडीवर एका कोपऱ्यात जाऊन हा कंपू बसला. इकडे तिकडे न्याहाळतां न्याहाळता रघूला प्रो० बंडले दिसला. तो होस्टेलमध्यें उतरून एकटाच फिरायला आला होता. रघूनं पंढरपूरकराला खुणावलं अन् तो स्वतः 'प्रो० बंडले' म्हणून मोठ्यानं हाक मारायच्या विचारात होता. तेवढ्यात पंढरपूरकर जोशानं त्याला दाबलं अन् 'आपटे' या त्याच्या खऱ्या नावानं पुकारलं. आपटे चमकला. पण त्याला या कंपूकडे यावसं वाटायला लागलं. उभ्याउभ्याच तो जवळ येऊन म्हणाला,

" आता चेष्टा बंद; कॉलेज सपलं. आता सभ्य माणसासारखं बोलणार असलां तर मी थांबतों—"

" म्हणजे आम्ही काय असभ्य आहोंत ? " साऱ्यानीं गिल्ला केला.

काय वाटेल तीं नांवं ठेवत होतां आम्हाला. आतां तें चालायचं नाहीं —"

" अच्छा ! आज सगळ्यांची खुषी ! बोला आपटे, तुम्ही काय करणार आहांत ? पुढचा बेत ठरलाय कीं नाहीं ? "

" तुम्हांला कशाला सांगायचं ? तुम्हाला माझ्या साऱ्या थापाच वाटतात."

" नो-नो. नो थापा. अगदीं गंभीरपणें सांगा तुम्ही—"

" माझा बेत आहे ' क्लास ' मिळाला तर इंडियन् आय. सी. एस्. ला बसायचं—" कोणालाच हसू आवरेना.

" हसताय् काय ? " आपट्यानं चिडून विचारलं.

पंढरपूरकर जोशानंच भाडं फोडलं. "आपट्या लेका, गांवच्या गल्लींत तरी असल्या बाता मारायच्यास. तूं बसला आहेस पास कोर्स घेऊन आणि क्लास मिळायच्या अन् आय्. सी. एस्च्या गोष्टी बोलतोस. अन् बंडल्या म्हटलं तर राग येतो."

" यात कसलं रे बंडल मारलं ? पंढऱ्या, तूंसुद्धां बाकीच्याना सामील होतोस ? आम्हीं पास कोर्स घेतला म्हणजे आम्हाला क्लास मिळू नये असं थोडंच आहे ? उलट क्लास मिळायसाठीं तर ऑनर्सची भानगड न ठेवतां पास कोर्स घेतला—"

" तुझ्यासाठीं युनिव्हर्सिटीनं नियम बदलून पास कोर्सला क्लासेस् द्यायचं ठरवलंय काय रे ? "

" नियम कशाला बदलायला हवेत ? आम्हाला काही पहिला, दुसरा तिसरा असे वेगवेगळे ' क्लासेस ' लागत नाहींत ऑनर्सवाल्यासारखे. पास कोर्स घेतला कीं क्लास आणि प्रश्न एकच — क्लास मिळतो की नाहीं ?

" हें कांहीं तरी नवीन दिसतंय आपटे—"

" नवीन कुठलं काय ? पास झालों तर क्लासात नांव — नाहीं झालों तर पुढच्या वर्षी पुनः प्रयत्न. क्लास मिळेपर्यंत आमचे प्रयत्न चालू—"

" ह्यालाच बंडल म्हणतात. पास झालास कीं तू क्लासांत नांव आलं म्हणून जाहिरात करीत सुटणार. "

" तुम्ही काय वाटेल तें म्हणा ! पासक्लास हा ' क्लास ' च आहे मग ' क्लास ' मिळाला म्हणून सागितलं तर बिघडलं कुठं ? "

" बरोबर आपटे. यू आर् राईट. आणखी तुमच्या त्या आय् सी. एस्. चं काय ? " रघूनं मधेंच विचारलं.

" तो आपला राखीव बाण. आधीं सेक्रेटरीएटमध्यें प्रयत्न करणार आहे. काका म्हणालेत बहुतेक जमेल म्हणून."

" तुझ्या काकांनीं गावच्या सीमा सोडून मुंबईचं सेक्रेटरीएट रे केव्हा गाठलं ?" पंढरपूरकरानं पुनः डिंवचलं.

" तुमची मुंबई तुम्हांला लखलाभ. आम्ही कांहीं परक्या ब्रिटिशांचे प्रजाजन नाहीं – आमचं स्वतंत्र राज्य आहे."

" म्हणजे लेका सरळ साग की जहागिरीच्या दिवाण–मामलेदार कचेरींत किंवा त्याहीपेक्षा म्हणजे कुठं खाजगींत कारकुनी करणार आहेस म्हणून."

" आता तुम्हाला कारकुनी वाटते. पण बघतां बघतां मामलेदार होऊन जाईन. वेळेला त्याच्यावरसुद्धा चढेन. उगीच नाहींत आमचे महाराज महाराष्ट्राच्या टीममध्यें खेळत -- माझं क्रिकेट मला हात दिल्याशिवाय रहायचं नाहीं."

" तूं काय खेळतोस तें कळण्याइतकं क्रिकेट तुमच्या महाराजांना नक्की येतं. महाराष्ट्राच्या संघात खेळलेत ते."

" तुम्ही असेच ! तुम्हाला आमचं बरं बघवायचं नाहीं."

" बघवायचं कां नाहीं ? बक् अप् बंडले – अरे तिथं कॉलेज् काढायची स्कीम कर आणि खराखुरा प्रोफेसर होऊन जा" रघूनं शेवटचा टोला मारला.

" तुमच्याशी बोलण्यात अर्थ नाहीं. उगीच आलों इथं."

बंडले ताड् ताड् निघून गेल्यावर रघूनं बिळाशीकराला पान काढायला सांगितलं. त्या दिवशीं अर्ध्या सभासदांनीं समारंभपूर्वक पान खाण्याचा कार्यक्रम उरकून 'चंची क्लब'चं अधिकृत विसर्जन केलं. पानं चागलीं जमून चर्वण करीत असताना सगळेजण उगीचच टेकडीवर आल्यागेल्याची दखल घेत होते. शेवटची पिचकारी मारल्यावर बिळाशीकरानं सूचकपणें रघूकडं पाहिलं. रघूनं उलट त्यालाच म्हटलं, " काय पाटील, असे बघताय काय ? आतां तुमची पाळी आहे."

" आमचं काय भटा ! तूं पंचांग सांगशील त्यावर सारं – म्हातारा तर आतां खर्चानं टेकीला आलों म्हणून कुरकुर करतोय् कवाधरनं."

" पंचांगांत काय आहे ? शेतकऱ्याचं बळ मनगटांत— "

" मंजी काय मी बी. ये. होऊन नांगुर धराया जायचं पुना ? काय करावं तें तूंच सांग की जरा--"

" घाई कसली आली आहे पाटील ? अजून दोन वर्षं कुस्तीची गदा मिळवायची आहे तुम्हाला. घाला लॉ-कॉलेजात नांव अन् कचकचीत आठ वर्षं नाव कोरून ठेवा गदेवर—"

" त्ये जमल म्हणा. कोलापूर आपलंच हाय कीं— "

" मग झालं तर. एल्‌एल्. बी. झाल्यावर तुम्हाला काय पंचाईत ? व्हाल कुठं तरी सबजज्ज – नाहींतर आपली आमदारकी आहेच की."

" बग भटा – कसं माज्या मनातलं बोललास ! सांगतुच म्हाताऱ्याला— जोशानं पंचाग बगून असं सागितलया म्हनून. मंजी मग म्हातारा काय नगो म्हनायचा न्हाई—"

" ठरलं तर. " आमदार बापूसाहेब पाटील बिळाशीकर यांच्या हस्तें क्लबाचं विसर्जन झालं. " उठूं या. खूप उशीर झालाय् आतां " रघूनं बठक मोडण्याच्या तयारीनं मांडी बदलला—

" वा वा ! जोशीबुवा. आमची सगळ्याची हजेरी घेऊन आपण मात्र अचूक निसटायचा डाव करताय्. पण तें जमायचं नाहीं. "

" काय जमायचं नाहीं ? "

" तुमचे बेत कळूं द्यात कीं आम्हांला—? "

" माझा कसला बेत ? मीं कांहीं ठरवलच नाहीं. "

" अशा थापा पचायच्या नाहींत. "

" थापा नाहींत – पण माझा आपला रोकड व्यवहार. परीक्षेचा निकाल होईल त्यावर अवलंबून सारं. "

" परीक्षेचा निकाल ठाऊक आहे आम्हाला. फर्स्टक्लास ठरलेला – "

" हो. फर्स्टक्लास मिळेल बहुतेक. मग एक वर्ष आहेच कॉलेजात. पुढचं पुढं. एवढाच माझा बेत."

—अंधार पडायला लागला होता. त्या अधारात कॉलेजच्या पुढच्या वर्षात.आपण ' फेलो ' म्हणून वावरणार अशा सुखद कल्पनेंत रघू इतरांच्या-बरोबर टेकडी उतरूं लागला. फूट-वाटेला लागायच्या वेळीं पंढरपूरकरानं

तोंड उघडलं, " अरे पुनः केव्हा भेटू कुणास ठाऊक ? या जोशीबुवाची फर्स्टक्लासची फीस्ट कांही सगळ्यांना मिळणार नाहीं तेव्हा आजची पार्टिंग कॉफी तरी याच्याकडनं काढली पाहिजे—"

लकीच्या माडीवर गर्दीत कशीबशी सगळ्याच्यापुरती जागा मिळवून त्यानीं कॉफीपानाला सुरवात केली. आनंदानं हुरळून जावं असं त्याना वाटत होतं. पण तिथल्या गलक्यात धरून आणलेल्या मुशाफरासारखी त्यानीं मुकाट्यानं आणि घाईघाईनं कॉफी संपविली.

रघू खोलीवर आला त्या वेळीं आठ वाजून गेले होते. खोलीच्या दाराशीं ट्रंक पडलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलं. दार उघडून तो आत जातों तोंच कुठून तरी अचानक यावी तशी यमू तिथं दत्त म्हणून हजर झाली.

" किती वेळ बाहेर भटकत होतात ? दीड तास होऊन गेला, मी इथं तुमची वाट पाहतें आहें. ती बाहेरची ट्रंक तेवढी आत घ्या आधी.

" पण हा प्रकार आहे तरी काय ? "

" मला आज शिवपूरला गेलंच पाहिजे. तेव्हा मी विचार केला होता कीं संध्याकाळच्या सिनेमा पाहून परस्पर 'मेल' गाठावी. म्हणून मी होस्टेलमधनं ट्रंक घेऊन बाहेर पडलें. इथं तुमचा पत्ता नाहीं. आतां साराच घोटाळा झाला. "

" मेलला अजून खूप अवकाश आहे—"

" पण सिनेमा बुडला ना संध्याकाळचा. त्याची वाट काय ? "

" आता दोन्हीं कसं साधणार ? "

" खरंच. कसं साधणार ? "

—दोघांनीं जवळच्या खानावळींत जेवण उरकून घेतलं अन् तशीच तीं दोघं टांगा आणायला म्हणून मोठ्या रस्त्याला लागलीं. एक-दोन ठिकाणीं टांगेवाल्याशीं हुज्जत घातल्यावर रघू एकदम म्हणाला, " रात्रींच्या वेळीं या टांगेवाल्याना भलताच भाव चढतो. त्यापेक्षा आपण आता सिनेमाला जाऊं या सकाळीं जाता येईल तुम्हाला."

" पण सिनेमा सुटल्यावर काय करायचं ? "

" बघूं पुढच्या पुढं "

तशीच भटकत भटकत तीं दोघं गांवातल्या थेटराकडे गेलीं. जिथं त्यांतल्या त्यात कमी गर्दी दिसली त्या थेटरात जाऊन सिनेमा पाहिला. तो चित्रपट पाहतांना रघूच्या डोक्यात चित्रपट आणि चेष्टा यांची जी सांगड बसून गेली होती, ती पुनःपुन्हा डोकावली. साडेबारा वाजल्यावर रात्रीच्या थंड वातावरणात परत फिरताना रघूनं चित्रपटाच्या वेळच्या गंमती त्यातला चावटपणा शक्य तितका सौम्य करून यमूला ऐकवला. " चला कांहींतरीच " या दोन शब्दांत यमूनं त्याची बोळवण केली. लकडी पुलावर आल्यावर मुद्दाम वाकडी वाट करून जंगलीमहाराजाच्या रस्त्यानं रमतगमत येईतोंपर्यंत दोन वाजून गेले होते—

" आतांपर्यंत ठीक झालं. पण आता मात्र पंचाईत आहे. तुम्हांला बाहेरच्या व्हरांड्यात झोंपलं पाहिजे. " खोलीचं दार उघडल्यावर यमूनं रघूला सांगितलं.

" आता काय म्हणाल तें ऐकलं पाहिजे. बाकी बाहेर चादणं झक्क पडलं आहे. बाहेर झोपण्यातच खरी मौज. "

" करा खुशाल उजाडेपर्यंत हवी तितकी मौज. "

—रघूनं आपला बिस्तरा बाहेर लोटून दिला. यमूनं लवकर उठायला पाहिजे म्हणून गजर लावून ठेवला आणि ' गुड नाईट ' म्हणून दार ढकललं. रघू बाहेरचं पीठासारखं स्वच्छ चादणं पाहत होता.

थोड्या वेळानं रघूनं यमूला बाहेरूनच हाक मारून विचारलं, " मला तेवढं ' काव्यप्रकाशा ' चं पुस्तक देता का ? "

" कशाला ? आतां काय पुनः बी. ए. चा अभ्यास करायची लहर आली का तिसऱ्या उल्लासांतली एखादी चावट नायिका आठवली ? — मुकाट्यानं झोपा बघूं आतां. नाहीं तर माझी सकाळचीही गाडी चुकेल—"

" पण झोप तर यायला हवी ? आज बहुतेक जागत जागतच उजाडणार. मघांच्या फिरण्यानं झोंप पार उडून गली आहे. तेव्हां कांहीं तरी करून वेळ काढला पाहिजे. "

" काव्यप्रकाश हें काय वेळ काढायचं साधन वाटतं ? "

" संस्कृतच्या अभ्यासांत दुसरं कमी नीरस पुस्तकचं नाहीं. त्याला काय करायचं ! तेवढं पुस्तक द्या बघूं लवकर."

" अगदीं अप्पलपोटे आहांत — तुम्ही तेवढे पुस्तक वाचून वेळ काढा."

" मग आपण गप्पा मारीत बसूं या चांदण्यांत. पहाट झाली कीं स्टेशनवर जायच्या नादाला लागू. "

" गप्पा मारीत बसूं या ! पण चांदण्यांत कुणीं पाहिलं तर ? "

पाच-दहा मिनिट त्यांनीं खोलींत गप्पा मारल्या.

रघूच्या खोलींत पुनः दिवा लागला तेव्हा साडेपांच वाजून गेले होते. यमू कपडे बदलून टांग्याची वाट पाहत होती. रघूनं टांगा आणल्यावर वर येऊन दिव्याच्या प्रकाशात आपला अवतार पाहिला अन् तो यमूला म्हणाला, " आतां जवळ जवळ उजाडत आलंय् — तेव्हा स्टेशनवर मी यायलाच पाहिजे का ग ? "

" कशाला उगीच हेलपाटा. जाईन मी तिकीट काढून. "

टांगा निघून गेला. यमूच्या हातांतला रुमाल फडफडत होता. रघू परत खोलींत आला. डोळे चुरचुरत होते. त्यानं अंगावर पांघरूण ओढलं. नऊ वाजून गेल्यावर तो जागा झाला. अवेळी झोपेनं डोळे तारवटून लाल झाले होते. अंग गळून गेलं होतं. तशा स्थितींत त्यानं होईल तितक्या घाईनं सामान आवरलं. जेवण उरकलं. पुण्याला शेवटचा रामराम ठोकला.

पुनः तीच एम्. एस्. एम्. ची गाडी. तेच डोंगर — तोच घाट — गाडी नेईल तसा डग् डग् करीत जाणारा प्रवासी — रघू स्टेशनवर उतरला तेव्हां सूर्य मावळतीच्या डोंगरावर पोंचला होता. झप् झप् पावलं उचलून त्यानं आपलं घर — देवळाची ओरी गांठली — त्या वेळीं चांगलाच अंधार पडला होता.

• • •

: ४ :

रघूनं आतां नोकरीच्या शोधाला लागाव हा विचार कृष्णंभटजींनीं त्याला दोन-चार वेळा सहजीं बोलून दाखवला. बाळानं आता शहरात गेल्यावर काय काय गंमती करायच्या याची यादी रघूला सागितली. रघूनं, " असं का ? छान ! " एवढंच उत्तर देऊन बाळाच्या फिकट गालावर हलकेच थापटी मारली. पण वडलाना कशाचाच थाग लागूं न देतां चटकन् बाहेर पडायचं धोरण पत्करलं.

कुठल्याही संवयीच्या आहारीं जायचं नाही असं रघू ठरवीत होता. तरी कधीं कधीं आपोआप त्याचे पाय रगरावच्या मळयाच्या वाटेला लागत. तिथं गेलं की तासभर पैलवानाशीं इकडच्या-तिकडच्या गोष्टी बोलायच्या. त्याचं रानांतलं काम आवरून त्यानं विहिरींत पाय खंगळले कीं त्याला " पैलवान, काढा आता पान " म्हणून ऐसपैस विहिरीच्या मखरालगत पाटवणात पाय सोडून बसायचं, असं तो कित्येक वेळां करी. पैलवानानं एकदा त्याला विचारलं, " रघुनाथ, पानाचा चागलाच नाद लागलाया की तुला. भटजी बाबास्नीं ठावा हाय का ? "

" मी कशाला मुद्दाम सांगूं पैलवान ? पण त्यांना काय रंगलेले दात दिसत नसतील थोडेच ? त्यांनीं कधीं विचारलं नाहीं म्हणा — मग आपण तरी मुद्दाम बोलून त्यांच्या डोळ्यावर कशाला आणायचं ? "

" अन् आलं डोळयावर म्हनून आतां काय म्हनत्याल ? आमापरास लई दीस कड काडलास त्वां. आता तूं चांगला बापई झालास की— "

" म्हणून तर समजून उमजून काहीं बोलत नसतील. जुन्या माणसांचं एक चागलं असतं पैलवान. आपण आपल्या लहानपणीं काय काय केलं तें

आठवून पोरं आपल्या पुढं गेलीं नाहींत एवढं बघितलं तरी त्याचं त्यांना बरं वाटतं."

" ह्ये मातर खरं रघुनाथ, म्या तमाखू खायाला लागलों तवा पहिल्या पहिल्या डावाला आईला चोरून वाईच चुरा घ्यायचा गाडग्यांतला; पर एक दीस आईनंच माज्या पिशवीत एक आखं पान चुरून ठेवलं बघ."

" हं ! "

" ऑं ? एकदम गप का र झालास ? आपल्या आईची आठवान झाली ? गमतं का र हतं तुला ? "

" न गमायला काय झालं ? "

" इयेरांत न्हाया लागल्यावर हतं कुटलं गमाया ? उगाच काईच्याबाई सागूं नगस. न्हाइ काई काम, न्हाई धंदा. वकुत तरी कसा जायाचा ? "

" असा आज जातोय् असाच. तुमच्याकडे येऊन "

" काय मर्दा ! काय सागतुयास ? कवा तरी येतुस पर आता त्येबी जुळायचं न्हाइ हतनं म्होरं. "

" तें काय म्हनून ? "

" का मंजी ? आतां आवारली माजी मेहनत. मिरगाच्या टिपनापावतर काय ओढगस्त न्हाई. तवा म्या आता जत्रवर जायाचं यवजलया. हायेत चार-पाच जत्रा. दोन तीन जाग्याला कुस्तीबी ठरलीया. फडांत कुस्ती करायची. जत्रा बगायची. जरा येवावं म्हनतों चार गांवं करून. "

" अरेच्चा, मग माझी पंचाईतच झाली म्हणायची. "

" तर ? खऱ्याच्यानं सागतुयास जनू ? मग चल की बगाया मजी संगं."

" आलों असतों पैलवान, पण— "

" पर न्हाई नू काय न्हाई. तसं चालायचं न्हाई. मीच येतों भटजी बाबास्नी सांगाया. रघुनाथ बगाया येतोय् म्हणून."

" तसं नको. मीच विचारीन सवडीनं. नाहीं तर दादांना वाटेल कीं, मी त्यांना न विचारतां परस्पर सगळं ठरवून, तुम्हांला पुढं करतोंय. "

" तूं म्हनशील तसं. पर याया होवं. "

रघूनं मनाशीं खूप हिशोब केला. पण वडलांना पटेल अशा रीतीनं हा बेत सांगायचं त्याला जमलं नाहीं. रंगराव बाहेर पडणार त्याच्या आदल्या दिवशीं त्यानं हिय्या करायचं ठरवलं तर नेमका त्याच दिवशीं त्याच्या इथं निरोप आला—" उद्यां पाहुणे येणार आहेत. रघूला घरी राहायला सागा. " इनामदाराच्या भाग्यानं तो निरोप आणला तेव्हां रघूपेक्षांही भटजींना जास्त आश्चर्य वाटलं होतं. पोरा-पोरांत बोलणं चालणं होतं एवढ त्यांनाहा ठाऊक होतं. पण या निरोपांतले पाहुणे म्हणजे रघू–बापूचे कोणी मित्रच होते कीं, आणखी दुसरे कोणी याची त्यांना खात्री पटेना.

—कारण मागच्या उन्हाळयाच्या मोसमापासून गावात येणाऱ्या पाहुण्याची पद्धति ठरून गेली होती. स्थळं पहायला बाहेर पडणारे पाहुणे इनामदाराचा बापू आणि मास्तराचा बडूं यांच्याबरोबरच रघूचीही चौकशी करीत. कधीं इनामदाराचं स्थळ न झेपणारं म्हणून, बंडूच्या नॉन-मॅट्रिकनंतरच्या उनाडक्या कानावर येत म्हणून आणि रघू भट असला तरी हुशार आहे म्हणून त्यालाच जमेंत धरणारे अनेक होते. कोणा एकासाठीं म्हणून आलेलेही ' इतर ' स्थळांची सहजीं चौकशीं करीत. या चौकशीनं बापूच्या आत्याची काहिली व्हायची. मेल्यानीं भट–गृहस्थ–इनामदार सारे एका मापानं मोजायला सुरुवात केली. ही त्याची तक्रार. त्यांतून यंदा बापूनं मनःपूर्वक अभ्यास केला होता तरी क्लासची खात्री नाहीं म्हणून ड्रॉप् घेतला. त्यामुळं बापूपेक्षाही रघू उजवा ठरूं लागला. रघूसाटीं येणारेही एकदम भटजींच्या घरीं न जाता इनाम-दारांच्या नांवामुळं त्यांच्याकडं उतरत. नाइलाजानं कां होईना त्यांना भटजी-कडे निरोप कळवावा लागे. अशा दोन-तीन लोकाना रघूनं परस्पर बापूच्या-मार्फत वाटेला लावलं होतं. पण या खेपेचा निरोप तो घरात नसताना सरळ भटजींच्याकडं आला होता.

" घरात कशाला थांबायला हवं ? यंदा बेत नाहीं म्हणून त्याना कळवून टाकायचं. उगीच नसती कटकट नको. " या खेपेला धीर करून रघूनं वडलांनाच सागितलं. " ती कुणकुण माझ्या कानावर आली रे, पण एकदा तुझं म्हणणं काय तें मला तरी स्पष्ट कळूं देशील कीं नाहीं ? "

" म्हणणं काय ? आतां सांगितलं तेंच."

" तें कळलं मला. पण असं किती दिवस सांगायचं ? इतके दिवस शिक्षण चाललं होतं म्हणून ठीक होतं. आता कशासाठीं ? घरात जेवणाची काय तऱ्हा आहे ती तुला दिसते ना ? "

" दिसते की – नुसती तीच अडचण असली तर स्वयंपाकाला बाई ठेवतां येईल. त्याच्यासाठीं मला कशाला इतक्यातच—"

" तुझी मजल फार पुढची आहे रघू. पण ती आपल्याला झेपायला नको का ? अन् ' नाहीं ' म्हणायला तुला तरी दुसरं काहीं कारण आहे का ? "

" कारण ? अजून कशाचाच पत्ता नसताना हें लफडं नको. परीक्षेचा निकाल व्हायचा आहे. मग पुढं पोटापाण्याचा प्रश्न—"

" म्हणजे आतां निकाल लागेपर्यंत तूं स्वस्थच बसणार का ? मला वाटलं होतं, कुठं तरी नोकरीसाठी हातपाय हलवायला लागला असशील. "

" त्याची इतक्यात काय घाई आहे ? आतां कुठं तरी घाईनं नोकरी पत्करायची अन् मागून पश्चात्तापाची पाळी यायची—"

" तें मला काहीं कळत नाहीं. तुला घरची स्थिति ठाऊक आहे. तुझ्याआड कांहीं मी यायचा नाहीं. पण तू काय करणार तें नक्की कळलं म्हणजे तसं वागायला – सांगायला बरं. "

" नक्की मी तरी काय सांगणार आताच ? पहिला वर्ग मिळेल बहुतेक. तसं झालं तर एक वर्ष कॉलेजात राहता येईल. "

—कृष्णभटजींनी तेवढ्यावरच बोलणं सोडून दिलं. दुसऱ्या दिवशीं आपल्याला इनामदाराच्या वाड्यात पाय टाकायला लागूं नये म्हणून भटजी सकाळचेच कुठं तरी निघून गेले. रघूनंही ' दादा घरीं नाहींत ' एवढ सांगून भाग्याला टोलवला. पण थोड्या वेळान खेडेगावची रीत सोडून कमळी त्याला बोलवायला आली, आणि पाहुण्याचा चिकट आग्रह सांगून त्याला आपल्या-बरोबर यायला लावलं. बापूचा प्रश्नच नसल्यामुळ पाहुण्यानं रघूवर हिंमत बांधली होती. रघूनं त्याला आपला विचारच नसल्याचं सांगितलं तरी ' मुलगी डोळयांखालून घालायला काय हरकत आहे ? ' असा पाहुण्यानं

सवाल केला. " उगीच देखावा करून त्याना कशाला दुखवायचं." यावर-सुद्धां पाहुण्याचं उत्तर तयार होतं. " आता चार वर्षं आम्हांला अन् तिलाही नकार ऐकायची संवय झाली आहे. तुम्ही त्याची कांहीं काळजी करूं नका. "

अगदीं जुनाट पद्धतीनं पाहुण्याचा विधि झाला. पाहुण्यानं या निमित्तान रघू आणि बापू दोघाच्याही नजरेखालून मुलगी घालून आपलीं आमिषं पुढं केलीं—" तुम्ही पसंती कळवली तर म्हणाल तितके दिवस थांबायला तयार आहोंत. एक-दोन वर्षं अजून तुमचं शिक्षण व्हायचं असलं तर तोंवर मुलगी आमच्या इथं राहील आणि आम्ही तुमच्या खर्चाचं बघूं—" हें सगळं रघू-बापूंनीं मख्खासारखं बसून ऐकून घेतल. त्याचा नकार मूळचाच होता. रघूला राहून राहून सावंतानं सांगितलेली हकीकत आणि दिलेला सल्ला आठवला.

—पाहुणा निघून गेल्यावर, रघू फार दिवसानीं घरीं आलेला म्हणून बापूनं त्याला बसवून घेतलं आणि कमळीला झकास चहा करायला सांगितलं. अप्पा पाहुण्याना पोंचवायला बाहेर गेलेले – तेवढी संधि अत्याबाईनीं साधली.

" काय बाबानो, तुमच्या तऱ्हा ! इतका काकुळतीला आला होता तो एवढा मोठा गृहस्थ – पण अगदी राजेश्वर लागून गेल्यासारखे दोघंही काय वागलात त्याच्याशी. "

" मग काय आत्या ? जो तो काकुळतीला येऊनच येतो म्हणून आपलं आम्हीं माळ्याला हार तयार ठेवायलाच सांगायचं ? " बापूनं हंसत हंसत टोला मारला.

" तूं असाच आचरट पहिल्यापासनं बाप्या. तरी बर बहिणीच्या पायांत जोडे झिजवायची संवय झालीय्. अन् हासुद्धा आम्हीं बोलूं नये, पण जुनी माणसं, कांहीं मनात न धरतां आपलेपणानं बघतों. या रघूला काय आता याच्यापेक्षां आणखी चांगलं स्थळ सांगून यायचं आहे ? मला वाटलं होतं रघ्या, तूं कांहीं जाणून वागशील — "

" त्यात काय चुकलं आत्या ? " कमळीनं चहा आणतां आणतां मधेंच म्हटलं.

" म्हणजे ! तूंही यांना सामील का ? आपल्यावरनं तरी ओळखावं– "

" ओळखावं काय ? वाटेवर पडल्यासारखं कुणी भेटेल त्याला हो म्हणावं ? "

" भेटेल त्याला ? चागलं म्हणत होता दोन वर्साचा खर्च करतों म्हणून."

" म्हणजे काय ? खर्चाशीं का लग्न लावायचं ? "

" काय बोलणं तरी तुझं कमळे ! चागली घरंदाजाची मुलगी – काय वाईट होती ? नाक-डोळे सारं जिथल्या तिथं. "

" होय ग होय तिरळी, बहिरी कांहीं दिसली नाहीं. एवढं मात्र खरं अन् शिक्षणाचं तर विचारायचंच नसतं नाहीं का आत्या ? " कमळी खवचट-पणें म्हणाली.

" हें काय बोलतेस कमळे. तुझा तो व्हायचा होता तो नवरा, आपल्या आत्याच्या वडगावचा कुलकर्णी. तो कुठं शिकला होता ? " कमळीनं नाकारलेल्या अन् त्यामुळ आत्याला मिरची झोंबलेल्या स्थळाचा बापूनं मुद्दाम उल्लेख केला.

" बाप्या ! बाप्या ! मेल्या पुनः माझ्या घरच्यांचं नाव काढतोस ? तुम्हाला काय चव आहे त्याची ! सगळी नवीं थेरं भरलींत. नसता तिरकस तुंबा. मेला सगळ्याचा एक कट. लावा जावा दिवे काय लावायचे असतील ते—" तणतणत आत्याबाई उठून गेल्या.

" झालं ! आता हायकोर्टाचा निकाल झाला " रघू हलकेच म्हणाला.

" नेहमींप्रमाणं माझ्याविरुद्ध " कमळीनं साथ केली.

रघूला घरी परत येता येता त्या जुन्या संवादांची आठवण झाली. आजच्या नकारानं सगळ्यांत जास्त आनंद कमळीला झाला हें त्यानं पाहिलं. आपल्यासारखीच नकारानं बेजार झालेली पाहुणी – ती कमळीच्या अन् रघूच्या दोघाच्याही गावी नव्हती. रघू बेदरकारपणें घरीं परत आला.

सारी सुट्टी रघूनं टिवल्याबावल्या करण्यांत काढली. रानात भटकावं, एखाद्या वेळीं बापूला अभ्यासातून ओढून पत्त्यांचा डाव टाकावा, तें नाहींच जमलं तर देवळाच्या मंडपांत बाळाबरोबर काहींतरी बालिश चाळे करावेत,

जास्तींत जास्त वेळ झोपून काढावा अन् तरीहि वेळ जातां जात नाहीं म्हणून आळसावून कुरकुरावं – असं करीत जून महिना उजाडला. त्या सुमारास ' केसरीं 'तून हंगामी येणाऱ्या जाहिरातींचं पीक वाढलं होतं. पण कुठ एरंडोल, मालेगाव, मोडलिंब, देवगड असल्या दूरच्या आणि आडगांवच्या मास्तरकीच्या जाहिराती करमणुकीखेरीज दुसऱ्या कोणत्याही हेतूनं रघूनं पाहिल्या नाहींत. युद्ध सुरू असल्यामुळं, आतल्या पानावर, महाराष्ट्रीय तरुणांना लष्करात जाण्याची संधि आल्याबद्दलचीं निवेदनं आणि त्यातील आमिषही मधून मधून येत असलेलीं त्यान पाहिलीं. पण ती कसली तरी आपला संबंध नसलेली त्रयस्थ बातमी वाचावी त्या नजरेनं – त्या हिशोबानं.

परीक्षेच्या निकालाचा दिवस जसजसा जवळ येऊं लागला तसतसा रघू दररोज पोस्टात जाऊन बसूं लागला. मॅट्रिकचा निकाल किती टक्के लागला तें इतक्या वर्षांत त्यानं प्रथमच मनःपूर्वक वाचलं त्यातल्या बक्षिसाच्या याद्या चाळून तो खूष झाला. इंटर आर्टस्चा निकालही त्यानं उत्सुकतेनं पाहिला. पण सगळ्यात गंमत म्हणजे आपण बी. ई चा निकाल पहायला विसरलों ही आठवण होऊन त्यानं जुन्या ज्ञानप्रकाशच्या अंकाचा शोध केला. त्याला सावंताचं नांव आढळलं नाहीं. तेव्हा कुठं त्याच्या ध्यानात आलं कीं, कदाचित् मागच्या एकदोन वर्षांतच त्यानं पदवी पदरात पाडून घेतली असेल.

बी. ए. चा शनवारचा निकाल रविवारच्या अंकात आला नाहीं. नंतर मंगळवारीं कां कुणास ठाऊक, रघूला पोस्टात जावंसं वाटेना. घरी पत्र आलं नाहीं तेव्हां तो चरकला; पण आपले सारे मित्र असेच कुचकामी म्हणून त्यानं समाधान मानून घेतलं. संध्याकाळपर्यंत बापू तरी सागायला येईल असं त्याला वाटत होत. त्याची वेळ टळून गेल्यावर रघू एकटाच नदीकांठीं जाऊन बसला. तिथलं चिट्पाखरूं दिसेनासं होऊन रातकिड्यांचा किर्र आवाज घुमायला लागल्यावर तो अंधारातन धडपडत धडपडत घरीं परत आला अन् वचावचा दोन घास खाऊन त्यानं अंथरुणावर अंग ढकलून दिलं.

एक दिवस उशीर करून बुधवारीं आलेला ज्ञानप्रकाश आणि त्यांतील निकालाची बातमी वाचून येणारे चार-दोन लोक यांनीं रघूला कळवलं कीं,

तो दुसऱ्या वर्गात पास झाला होता. आलेल्या लोकांना रघूचा पडलेला चेहरा पाहून आश्चर्य वाटलं. बाळनं मोठ्या आनंदानं दिलेल्या साखरेनं त्याला बेचैन केल. भटजींनीं देवाला अभिषेक केला. जेवण आटोपून रघू उन्हाचाच बाहेर पडला. पहिल्या दिवशीं, शिकायला जायचं ठरल्यावर इनामदाराच्या घरी रहावं लागणार म्हणून तो जितका कातावला होता तितकाच आतां कातावला. आता पुढं कुठं जायच, काय करायचं हें त्याला उमगेना. साऱ्या आयुष्यात प्रथम त्यानं मोठा आत्मविश्वास बाळगून पुढचे बेत रचले होते. कॉलेजात फेलो म्हणून एक वर्ष राहीन; तेवढ्यांत दुसऱ्या वर्षाची तरतूद करून एम्. ए. होईन अशी त्याची उमेद धावली होती. ती खचली – पंगू झाली. इतर शेंकडो पदवीधर परीक्षेच्या चाकोरीतून बाहेर पडतात, त्याच्यात एकाची भर. यापेक्षा अधिक काहीं घडलं नव्हतं.

दुसऱ्या दिवसापासून तो नियमितपणें पोस्टांत जाऊन वर्तमानपत्रं वाचूं लागला. त्यातल्या ‘ पाहिजे ’ च्या जाहिराती लक्षपूर्वक टिपू लागला. फारशी चिकित्सा न करतां अर्ज टाकूं लागला. पण वेळ निघून गेली होती. अगदीं अपरिचित अशा रत्नागिरी जिल्ह्यातल्या एका शाळेनं त्याला पस्तीस रुपयावर यायला तयार आहात का म्हणून विचारल. एक दिवस थाबून रघून होकार कळवला. पण पुनः त्याला काहीं कळलं नाहीं. आठ दिवसानीं पाठवलेल्या स्मरणपत्राचं उत्तर आल, “ तुमचा होकार दोन दिवस उशिरानं कळला. त्या आधींच जागा भरली गेली. ”

गावात रिकामा राहून दिवसामागून दिवस ढकलणं रघूला अशक्य होऊ लागलं. बाहेर कुणाकडे गेलं कीं, “ आता पुढं काय ? ” असं विचारून प्रत्येकजण बेजार करी. रघूनं बाहेर जायचं सोडलं. घरीं वेळ जाण्यासाठी पत्त्याचा डाव माडायला त्यानं सुरवात केली. वडील आणि दोघ मुल रोज दुपारच्या वेळेला पत्तेकुटी करू लागले. सारा पावसाळा त्यानीं अशा रीतीनं संपवला.

गेलीं तीन वर्षं घरांत काय चाललंय याची फारशी दखल न घेतलेल्या रघूला या काळात नवनवे शोध लागले. पावसाच्या दिवसांत बाळचं दर आठ-पंधरा दिवसानीं अंथरूण पडायचं. भटजींनीं त्याला कसला तरी

काढा करून द्यायचा. दिवसामागून दिवस एकभुक्त राहून काढायचे. जेवण म्हणून ताटांत पडणाऱ्या पदार्थांत कधीं नुसतीच भाकरी अन् चटणी, कधीं नुसताच भात, कधीं थालीपीट अशी भुकेची गरज भागवण्याची तऱ्हा रघून पहिल्यादा पाहिली. आपल्या घराचं हें दर्शन रघूला नुसत्या सुट्टींत कधीं झालं नव्हत. कृष्णंभटजींनीं तें होऊं दिलं नव्हतं. पण दीड-दोन महिन्याच्या सुट्टीची गोष्ट वेगळी अन् सहा महिने सतत राहण्याची वेगळी. रघूला जीवनाची ही रोजची व्यवहारी बाजू डोळसपणें पहायला मिळाली तेव्हा तो एका दमात आपल कॉलेजच सारं जीवन विसरून गेला.

× × ×

चार-दोघाच्या ओळखी आणि प्रत्यक्ष गाठीभेटी यावर मिनतवारीन रघून एका नव्या शाळेंत नोव्हेंबरपासून मास्तरकी मिळवली आणि मग एक दिवसाचाही उशीर न करता गावातलं आपलं बिऱ्हाड हलवलं. सतत बावीस वर्षं ज्या वास्तूशीं कमीअधिक संबंध आला त्या गांवातन बाहेर पडताना वेळेवर मोटार गाठण्याच्या घाईशिवाय दुसऱ्या कोणत्याही विचाराभावनेनं त्याला स्पर्श केला नाही. कृष्णंभटजींनीं मात्र गाव सोडताना मागच्या साऱ्या गोष्टींची आठवण विसरून सर्व यजमानाचा निरोप घेतला. “ रघूला नोकरी लागली. आमची पळी-पंचपात्रीची मिरास संपली ” हें सांगण्यात त्याचा अभिमानही होता आणि विषण्णताही होती.

तिथं गेल्यावर त्या बदलानं बाळची प्रकृति एकदम सुधारू लागली. नव्या-नवलाईत भटजीही पोथ्या-पुराणाच्या आवृत्त्या करण्यात वेळ घालवू लागले. शिक्षकाच्या नव्या पेशात, रघूचा खूप वेळ तयारींत जाऊं लागला.

शाळेचं वातावरण रघूला वेगळं वाटलं. शिवपूरच्या मानानं हें गांव किती तरी लहान. त्यांत ही नव्यानं काढलेली शाळा. जेमतेम दीडशें मुल होतीं शाळेंत. एका जुनाट वाड्यात कामचलाव् बदल करून वर्ग भरायचे. रघूच्या खेरीज बाकीचे बहुतेक सारे — म्हणजे सहा मास्तर गांवचेच होते. त्या प्रत्येकाची कुठं थोडी-ना-थोडी शेती किंवा भावाचं एखादं किरकोळीचं दुकान असं कांहीं तरी बाहेरचं आकर्षण होतं. गणितासाठीं मागवावा लागलेला

बी. एस्‌सी. आणि संस्कृतसाठीं आलेला रघू हे दोघेच बाहेरचे. त्यातला गणिताचा मास्तर शास्त्राचाही बोजा उचलायचा. त्यामुळं तो चार उपकरणाच्या प्रयोगशाळेंत बराच वेळ स्वतः गुंतून गेल्याच दाखवीत असे.

" रामः रामौ " – शिकवण्यात रघूला सुरवातीला कमलाही आनंद वाटत नव्हता. त्याची उणीव भरून काढायची त्याला इच्छा होती. शाळेच्या या वातावरणांत त्याची इच्छा इतराच्या पथ्यावर पडली. मुलाचे खेळ घेण, त्याना भाषणाची सवय लावणं, त्याच्यावर सर्वसामान्य देखरेख करण – या गोष्टी एकेक करीत रघूकडे येऊं लागल्या. त्या निमित्तानं नव्या जोशी-मास्तराचा उत्साह शाळेच्या चालकाना फार आवडला.

फेब्रुवारी महिन्यांत दोन-चार मुलानीं रघूला शिकवणीबद्दल विचारलं. शिकवणीच्या प्रांतात तो अगदीच नवखा होता. त्या मुलाना शिकवणी सर्व विषयाची हवी होती. रघू शिकवायचा संस्कृत आणि मराठी. त्यानं आपल्याला सारे विषय शिकवायला जमणार नाहीं म्हणून सांगितलं. मुलं खट्टू झाली याची त्याला कल्पनाही नव्हती. शिक्षकाच्या खोलींत रघूनं शिकवणी नाकारल्याचं कळलं तेव्हा त्याच्या सहकाऱ्याना आश्चर्य वाटलं. पण तें न दाखवता त्यानीं मुलाच्या अडचणीविषयीं कळकळ दाखवून त्याच्या नावाची चौकशी केली. रघूला ती माहीत नव्हतीं हें कळल्यावर ते थक्क झाले.

एप्रिलात शाळेच्या वर्षअखेरीच्या कामाचा बोजा वाढला. शिकवण्या न करणारा एकुलता एक मास्तर म्हणून मुख्य शिक्षकानीं त्याला मदतीला बोलावलं. रघून मुकाट्यानं सारीं पत्रकं, नव्या वर्षाचीं पुस्तकं, ग्रँटसाठी भरायची माहिती या बाबतींत करता येतील तेवढे कष्ट केले. ते संपल्यावर मुख्य शिक्षकानी त्याला कपभर चहा पाजून त्याचे आभार मानले.

जून महिन्यात रघू पुनः त्याच शाळेंत काम करूं लागला. त्याच्यावर मोठी मेहेरबानी केल्याचा किंवा करण्याचा देखावा मंडळान केला असला तरी अदरकी बात बाहेर आलीच. युद्धाच्या काळात शाळातल्या नोकऱ्याकडे वळणाऱ्यांची संख्या रोडावली होती. अन् त्यांतल्या त्यात आडगावाला यायला कोणीच तयार नव्हते. रघूच्या शाळेंतला बी. एस्‌सी. खडकीला मोठ्या पगाराच्या नोकरीवर निघून गेला होता. गावच्या एका दुसऱ्या

मास्तरानंसुद्धां रेशनिंगमध्यें इन्स्पेक्टरची नोकरी मिळाल्यावर राजीनामा दिला होता. तेव्हां घाईनं मंडळानं रघूला नेमणुकीचा हुकूम देऊन त्याचं काम मुद्दाम केल्याचा देखावा उरकला होता.

त्या वेळीं रघूला हें कळलं नव्हतं. पण कळल्यावरही त्यानं तिकडे विशेष लक्ष दिलं नाहीं. सहा महिन्याच्या जुन्या अनुभवामुळं, त्याच्या कामसू वृत्ती-मुळं, शाळेच्या जगात त्याचं एक स्वतःचं लहानसं स्थान निर्माण झालं होतं. नोव्हेंबर महिन्यांत दहा पुस्तकं वाचून, बिचकत बिचकत वर्गांत शिरणारा रघू जूनमध्यें धडाक्यानं आपले तास घेऊं लागला. त्याला शिकवण्याची, वर्गांतल्या मुलात मिसळण्याची गोडी लागली. निरुपाय म्हणून पत्करलेली नोकरी हाच आपला आवडता व्यवसाय आहे हें त्याला कळून चुकलं दोन-तीन वर्षं उसन्या ऐटीनं दाखवलेला रुबाब उतरून गेला आणि ज्या स्थितीं-तून आपल्याला जावं लागलं तिची जाणीव प्रबल झाली.

आज ना उद्यां बी. एस्सी. मिळेल या आशेवर दोन महिने गणित आणि शास्त्रांच्या तासांची विल्हेवाट लावण्यात आली होती. ऑगस्ट महिना उजाडून गेला तरी गणितार्चीं पुस्तकं उघडलीं जायचीं चिन्हं दिसेनात तेव्हां शाळेचे हेड्मास्तर बेचैन झाले. त्यांनीं आलेल्या चार अर्जदारांना बोलावणं पाठवलं. त्यांतले दोघेजण आधींच दुसरीकडं लागले होते. शेवटीं एक गावांतला इंटर नापास हजर झाला. आणखी एक जागा भरायची होती. हेड्मास्तरांनीं सगळ्या शिक्षकांना बोलावून कोणी ओळखीचा माणूस असल्यास त्याला सरळ बोलावून घ्या म्हणून सांगितलं.

रघूच्या डोक्यांत उगीचच कल्पना आली. त्यानं बापूला भेटायला येऊन जा असं कळवलं. बापू आला. ‘सध्यां रिकामाच आहे. जुळल्यास चार महिने काम करीन ’ असं त्यानं सांगितलं. रघूच्या ओळखीनं बापू त्या शाळेंत मास्तर झाला. तो उतरलासुद्धां दोन दिवस रघूकडे.

वेळापत्रकांत फेरबदल करतांना पुनः गणिताची अडचण आली. रघूचं इंटरपर्यंत गणित झालेलं म्हणून मराठीच्या ऐवजीं गणित शिकवायचं त्यानं कबूल केलं. त्यानं आपण होऊन सांगितलेल्या या माहितीनं त्याचा भाव वाढला. पण पगार मात्र शाळेला परवडेल असाच पस्तीस रुपये होता. तरी-

सुद्धा रघू खुषींत होता. बापूनं वेगळी खोली घेतली असली तरी त्याचा बहुतेक वेळ रघूच्या संगतींत जायचा. त्या संगतीनं रघूला चालू घडींत आराम वाटूं लागला.

बापूच्या येण्यानं, एक वर्षातल्या कॉलेजमधल्या किंवा त्यापेक्षांही अधिक प्रमाणात कॉलेजमधल्या जुन्या जोडीदारापैकीं कांहींच्या हकीकती रघूला ऐकायला मिळाल्या—

गांवाच्या हद्दींतनं बाहेर पडून नाक्यावरनं मोठ्या रस्त्याच्या बाजूनं खूप लाब फिरायला गेल्यावर रघूनं बापूला विचारलं— "काहीं नवी-जुनी हकीकत सांग कॉलेजची—"

"तुला कांहींच पत्ता नाहीं ? सांगण्यासारखी एकच फार मोठी हकीकत घडून आली शिवपुरांत. तिथल्या वर्तमानपत्राना दोन महिने पुरली होती."

"पण इथं तिकडचीं वर्तमानपत्रं कशाला येताहेत ?"

"कुणासंबंधीं हकीकत असेल याची तरी तुला कल्पना येते ?"

"काहीं सागतां येत नाहीं. असेल तुझ्या बंगल्यांच्या जगांतली एखादी भानगड. दुसरी कुठली असणार ?"

"अगदीं फसलास !"

"शक्य आहे. कॉलेजच्या जगापासून गेल्या वर्षात मी इतका वेगळा पडलों आहें कीं मला त्या वातावरणाचा विचारच करतां येईनासा झाला आहे."

"तें दिसतंच आहे. मी तर आठ दिवसांतच या गांवाला कंटाळून गेलोंय्. पण तूं मात्र अगदीं रमून गेलेला दिसतोस— "

"त्यांत काय विशेष ? पण विषय पालटूं नकोस."

"बातमी एवढीच कीं कात्यानं लग्न केलं एल्‌एल्. बी. झाल्याबरोबर- "

"हात्त्याच्या. मागच्या वर्षी बायको मेल्यावर तो परीक्षा होईपर्यंत थांबला हेंच जास्त. पण मला वाटलं वर्तमान पत्रांना खाद्य पुरवणारी बातमी तशीच खमंग असेल."

"पण तें कुणाशीं ठाऊक आहे का ? त्यानं हवा तेवढा खमंगपणा मिळाला वर्तमानपत्रांना— "

" असा काय दिवा लावला त्यानं ? "

" कात्यानं लग्न केलं तें त्या खानावळवाल्या अंबूशी. साग आतां, आहे कीं नाही खमंग बातमी ? "

" म्हटलं तर आहे शिवपूरच्या वातावरणात व्यापाऱ्याच्या मुलानं ब्राह्मणाच्या मुलीशीं लग्न केलं तर त्याचा मोठा बाऊ व्हायचाच ! "

" तूं तर अगदीं स्थितप्रज्ञासारखा बोलतोयस् – पण यांत नुसता मिश्रविवाह नव्हता. बऱ्याच भानगडी होत्या— "

" भानगडी काय असणार ? आधीं बरेच दिवस जमवलं असेल. फारतर दोघंही जोडीनं फिरायला जात असतील. हेंच कीं नाहीं ? "

" मला बनवूं नकोस रघू. अंबू कुंकू लावीत नव्हती हें सगळ्यांना ठाऊक होतं. तूं तर तिथं कैक दिवस जेवीत होतास –"

" म्हणजे काय, मिश्रविवाह अन् पुनर्विवाह एकदम झाले हेंच ना ? "

" शहाणाच आहेच ! पुनर्विवाह करायला अंबूनं आधीं कधीं अन् कुणाशीं लग्न केलं होतं ? "

" पण ती कुंकू लावीत नव्हती म्हणून पुनर्विवाह आहे असाच देखावा केला असेल— "

" छट् ! तिचं लग्न झालेलं नव्हतं ही हकीकतही अचानक मागाहून बाहेर पडली. ती कुंकू पुसून रहात होती तें उगीच नाही. तिच्या कुंकू पुसण्याचा मोठा इतिहास होता. शिवपुरात यायच्या आधी तिनं गुण उधळले होते. ते निस्तरतांना तिला कुंकू पुसून पंढरपूरची वारी करावी लागली होती. याचा कुणालाच नव्हता. पण कात्याच्या लग्नानंतर त्यांचा फोटो प्रसिद्ध झाला. कुठून तरी तो आपल्या तुमच्या चंची क्रूब्रांताचा पंढरपूरकर जोशाऱ्या पहाण्यात आला अन् त्यानं पंढरपुरातनं पत्र पाठवलं. त्या पत्रानं अंबूचं सारं बेंड बाहेर फुटलं—"

आता खरोखरी धक्का बसण्याची पाळी रघूची होती. तरीसुद्धां एकदम सावरून तो एवढंच म्हणाला, " या पढऱ्याला कुणी सागितले होते नसते उद्योग करायला ? "

" त्यानं तें गंमतीनं म्हणून कळवलं. तें कात्याच्या कानावर गेल्यावर त्याची फारच पंचाईत झाली. कारण हें बाळ, घरातल्या धुसपुशीनं कधीं कधीं खानावळींत जेवायला जायचं. तिथं त्यान जमवलेलं. अन् तें जमतांच अंबूनं घाईनं लग्न करायचा हट्ट धरला, ' लग्न केलं नाही तर पंचाईत होईल असा धाक घातला ' —लग्न झाल्यावर कात्याच्या ध्यानात आलं, ती पंचाईत बिंचाईत सारी खोटी होती. खरी ती आधींच होऊन गेलेली होती. पण आईबापाना न जुमानता केलेल्या लग्नामुळं त्याला तोंड उघडायची सोय राहिली नाही.

" चालायचंच. जातील चार-दोन वर्षं तस सारं थंडावून जाईल. कशाला त्याच्यावर एवढी चर्चा हवी ? "

" वा ! हा नवीनच अवतार दिसतोय तुझा ! "

" हं ! अनुभवान शहाणपण येतं. नको असलं तरी येतं—"

" असे काय अनुभव घेतलेस माझ्यापेक्षा जास्ती ? "

" तो प्रश्न निराळा आहे. पण माणूस जोपर्यंत काहीच करीत नाहीं, तोंपर्यंत धडाकून मोठमोठी तत्त्वं आणि शुद्धाशुद्धतेचीं महती सागण्यात आनंद मानतो. पण आपण माणूस आहों हें विसरतों. चुकणं हें माणुसकीचं लक्षण ही अगदी नेहमीच्या परिचयाची व्याख्या ! पण ती डोळ्याआड होते."

" ए, तुझी व्याख्या अन् व्याख्यान राहूं दे—"

" व्याख्यान नाहीं. पण आहे हें असं आहे. चुकणं हें माणुसकीचं लक्षण म्हणा कीं चुका केल्यानं माणुसकीचं मोल कळतं म्हणा—पण तें कळल्याशिवाय भागणार नाही. प्रत्येकजण कधीं ना कधी चुकतोच; तशी अंबूही चुकली असेल एखादे वेळी. तेवढ्यावरून ती काहीं सदाची पापी ठरत नाहीं."

" हें कात्याला ऐकव कधीं तरी. छाती झाली तर— "

" ऐकवायला माझी काहींच हरकत नाहीं. पण तशी वेळ येईल असं मात्र वाटत नाहीं. त्याचं जग निराळं, माझं निराळं—"

" इतका विटलास कां रघू ? मला तर वाटत होतं इथं तूं चांगला रमला आहेस. आनंदात आहेस. शाळेंत तरी तसा दिसतोस. मग एरवींच असा कां ? तुझी तब्येत ठीक नाही का ?

" तब्येतीला काय झालय ? अन् मी तरी विटलों असं कशावरनं म्हणतोस बापू ? माझी सूरतच ही अशी—"

"ही मात्र थाप हं. तुला मी कॉलेजात बघितला नसता तर हेंसुद्धा खरं मानलं असतं. पण मी खरं सांगू ? "

" सांग. माझ्याबद्दल माझ्यापेक्षा तुलाच अधिक कळत असलं तर तें ऐकायला माझी ना नाही. शाळेतल्या मास्तरकीनं म्हण कीं आतापर्यंतच्या अनुभवानं म्हण – काहीही नवं ऐकायला माझी तयारी आहे."

" रघू, मला वाटतंय तुझं काही तरी बिनसलं आहे. पहिला वर्ग न मिळाल्यानं इथं खितपतावं लागत म्हणून असो की दुसऱ्या काही कारणानं असो, तुझा शाळेंतला उत्साह वरवरचा आहे. तुला आयुष्यात खरोखरी राम वाटत नाहीं. कशासाठीं आपण हे करतों याचा उलगडा होत नाहीं. म्हणून तुझी तळमळ चालली आहे. "

" असेल कदाचित्. पण असलीच तर ही तळमळ माझ्यासारख्या प्रत्येकाची आहे; माझी एकट्याची नाही "

" अगदी बरोबर. तुझी तळमळ ही तुझ्यासारख्या प्रत्येकाची आहे; अन् त्याचा उपायही ठरलेला आहे. तोच तूं करायला हवास. "

" सांग ना. करायसारखा असला तर अवश्य करीन—"

" या वयात अशी विषण्णता येते. निरर्थकता वाटायला लागते तेव्हा आयुष्याला गमावलेला अर्थ शोधून जवळ करावा लागतो. आपल्याला या बाबतींत फारसे कष्ट करावे लागत नाहींत, पण फक्त उमज पडायला वेळ लागतो एवढंच. "

" बापू, आतां तूंच कसल्या तरी गूढ तत्त्वज्ञानात शिरलेला दिसतोस. "

" छे ! अगदीं साध्या भाषेंत सांगायचं म्हणजे कशासाठीं – कुणासाठीं या प्रश्नाचं व्यवहारी उत्तर जवळ केलं पाहिजे. तूं आता लग्नाचा विचार कर; म्हणजे तुझी सारी तळमळ शांत होईल—"

" हत् लेका ! शेवटीं डोंगर पोखरून हाच का उंदीर बाहेर काढलास ! "

" तूं वाटेल तें म्हण पण मला आपलं वाटतं – तुझी स्थिति सुधारायचा

हाच उपाय आहे. निष्कारण अंगाबाहेरच्या गोष्टींचा विचार डोक्यांत घोळायला नको असेल तर मन रोजच्या संसारात गुंतलं पाहिजे."

" मग तूं हा उपदेश कृतीनं खरा करून दाखव की."

" मी काहीं अजून तुझ्यासारखा तळमळत उदास होऊन राहिलों नाहीं. अन् मला सध्या हा विचारही करतां येत नाहीं कमळीचं लग्न होईपर्यंत."

" का ? कमलनं तशी अट घातली आहे कीं आत्याबाईनीं ? "

" अट कोणींच घातली नाही. पण मी अजून मास्तरकींत रुतलों नाहीं. माझा विचार कोणत्या ना कोणत्या रीतीनं एम्. ए. व्हायचा आहे."

" अस्सं ! अस्सं ! म्हणून माझ्यावर उदार झालास होय ? "

" उदार होण्याचा प्रश्न नाहीं. हें बोलणं अगदीं सहजीं निघाल – माझं म्हणणं पटत नसलं तर सोडून दे. पण —"

" पण काय ? आणखी काहीं सागणार आहेस ? "

" तूं मला स्वार्थी ठरवणार नसलास तर ! तसं कबूल करीत असलास तर सागतों. माझ्या मनात एक विचार आला आहे—"

" खुशाल साग. तुला कशाला स्वार्थी ठरवूं मी ? अन् ठरवलं तर त्याचा अर्थ एवढाच की प्रत्येक मनुष्य थोडाफार स्वार्थी असतोच."

" माझ्या मनात असं आलं आहे – तुला मधाचं म्हणणं पटत असेल तर तूं आमच्या कमळीशींच का लग्न करीत नाहींस ? नाहीं तरी लहानपणापासून तुमचा एकमेकाना ओढ आहे हें निदान मला तरी पुरतं ठाऊक आहे ! "

" बापू, काय बोललास तें तुझं तुला तरी कळल का ? का इथं येऊन तूं इनामदार अन् मी भट हें विसरलास ? "

" रध्या ! उगीच टोचूं नकोस मला. मी कसला इनामदार आहे हें मला अन् तुला दोघानाही चांगलं ठाऊक आहे. आज तुझ्या ओळखीनं इथं काम करतों म्हणून घरच्या कटकटी अन् कर्जाच्या आठवणी तरी विसरून जाता येतात."

" तें खरं. पण हें तुझ्या अप्पाना आणि आत्याबाईना पटलंय् का ? "

" त्याच्या पटण्याशीं काय करायचं ? त्यांना पटून कमळीचं लग्न होईपर्यंत तुझा मुलगा येईल लग्नाला ! तूं हो म्हण; मी कमळीला इथं हवापालटाला म्हणून घेऊन येतों. परस्पर लग्न उरकून सावकास घरीं कळवूं."

" तूं घोड्यावर बसला आहेस बापू. पण तें शक्य नाहीं. "

" नसायला काय झालं ? तुझ्या वडलांची समजूत मी घालीन. हवं तर मुलीचा भाऊ म्हणून त्याच्यापुढं नाक घाशीन."

" मी त्या अर्थानं म्हणालों नव्हतों. "

" मग काय ? तुला एवढ दिसत नाही का ? कमळीचं मन तुला अजून कळलं नाही असं का तूं मला सागणार आहेस ? "

" छे ! तसं काहींच म्हणणं नाहीं माझं. माझी अन् कमलची ओढ बधुभगिनीच्या विशुद्ध नात्याची आहे असंही भोंदूपणानं मी तुला सागणार नाही. आणि नुसत्या कमलच्या मनाचा प्रश्न असता तर तूं विचारायची वाट न पहाता मींच तुझी मदत मागितली असती. पण—"

" मग अडचण कसली उरली ? "

" अडचण हीच की, माझं मन तुला किंवा कमलला कुणालाच कळलं नाहीं. माझं मला सुद्धां इतके दिवस कळलं नव्हतं. "

" मग हा शोध केव्हा लागला ? "

" सहा महिने बेकार राहिल्यावर. "

" काय शोध लागला तें तरी कळूं दे. "

" दुसरा काय असणार ? तूं-मी मित्र म्हणून कितीही जवळ आलों तरी रोजच्या दैनंदिन व्यवहारात आपल्यांतलं योजनाचं अंतर दूर होणार नाही. तें अंतर तुटल्याचा भास, हा नुसता भास आहे."

" काहीं तरी अधांत्री बोलूं नकोस. कसलं अंतर आहे ? "

" अंतर परिस्थितीचं आहे. तुम्ही खालावलां तरी इनामदार आहात. मी कितीही वर चढलों तरी माझा मूळचा पिंड दरिद्र्याचा आहे. कमल आज कोणत्याही स्थितींत आणि कितीही गरजू असली तरी ती इनामदारीण आहे. मी भट आहें. "

" हें सारं तुझ्या मनचं – सांगायपुरतं निमित्त."

" निमित्त नाहीं. मी मनोमन सांगतों. तुमच्या किंवा पांढरपेशाच्या कुठल्याही घरांत बायकांना काय किंमत असते तें मला ठाऊक आहे. स्त्रियांना शूद्रांच्या कोटींत घालणारा मनु अजून घरोघरीं वावरतो आहे. त्या अर्थानं कमलच काय, कोणतीही स्त्री शूद्र, गुलाम आहे. पण ती कोणाच्या घरांत वावरणारी आहे यालाही महत्त्व आहे. मला तें परवडणारं नाहीं. मी आपली पायरी सोडून वर जाण्याचा प्रयत्न केला नाहीं असं नाही. तो साधला नसता असंही नाहीं. आज तूंच कमलबद्दल विचारलंस तेव्हां तें साधण्याचाही प्रश्न नाहीं. पण तें मला करायचं नाहीं. मी जिथून आलों त्याला पारखा होऊं इच्छित नाहीं. गटेच्या फाऊस्टच सुख किंवा दुःख – जें काय असेल तें – तें घेण्याची माझी तयारी नाहीं."

" तुझं बोलणं काहीं मला कळलं नाही. पण तुझा नकार समजला. मी कमळीला जमेल तेव्हा कळवीन. तिला फार आशा वाटत होती."

" त्याची जाणीव मलाही आहे. पण माझा नाइलाज आहे."

× × ×

गणिताचे मागासलेले अभ्यास भरून काढण्यासाठी मधली सुट्टी, शनिवार–रविवारचे जादा वर्ग या उपायांचा अवलंब रघू करीत होता. त्यामुळं पुष्कळशा विद्यार्थ्यांना हें ओझं पचेनासं झालं. रघूच्या शिकवण्याबद्दल त्यांची तक्रार नव्हती. त्यांतल्या कांहींचे तर फारच हाल व्हायला लागले. त्यातल्या त्यांत सुस्थितींत असलेल्या पाच-सहा विद्यार्थ्यांच्या गटानं रघूला भीत – भीत विचारलं–" सर, आम्हांला गणित जमत नाहीं वर्गाबरोबर खाजगी शिकवाल तर बरं होईल— "

" पण सुट्टींत मी घेतोंच आहें. त्यातून तुम्हाला अडचणी असतील तेवढ्या विचारा म्हणजे झालं. "

" तसं जमण्यासारखं नाहीं सर. आम्ही हवी तर शिकवणी देऊं. "

" मी शिकवण्या करीत नाहीं. तुम्ही शिकवण्या करणाऱ्या शिक्षकांना विचारा. आपल्या शाळेंत नसले तरी गांवांतल्या दुसऱ्या शाळेंत गणिताचे कोणी शिक्षक असतीलच शिकवण्या करणारे— "

" आम्हाला दुसऱ्या कोणाची शिकवणी नको. तुम्हीच आम्हांला शिकवायला हवं. तुम्ही सांगाल त्या तऱ्हेनं-- "

" ठीक आहे. शाळा सुटल्यावर घरीं येत जा. आणखी ज्या कोणाला हवं असेल त्यांना यायला सांगा."

दुसऱ्या दिवसापासून जवळ जवळ सारा वर्ग रघूच्या घरीं हजर झाला. बैठकीच्या लहानशा खोलींत दाटीवाटीनं बसून त्याचा अभ्यास सुरू झाला. दोन-तीन दिवस गेल्यानंतर रघूनं घरी न येणाऱ्या दोन-तीन विद्यार्थ्यांना एकीकडे बोलावून विचारलं, " तुमचं गणिताचं ठीक आहे ? काहीं अडचण नाहीं ? घरी यायची जरुरी वाटत नाहीं ना ? "

तीं मुलं गप्प राहिलीं. रघूनं पुनः त्यांना तेंच विचारलं त्यातल्या एकानं सांगितलं, " जरूर नाही कशी सर ? पण आम्ही येणार कसे तुमच्या घरी ? आम्हांला ते परवडायचं नाहीं— "

' कां ? कुठून लांबून - परगावाहून येता का तुम्ही ? लवकर जावं लागतं ? '

" तसं काही नाही. पण शिकवणी आम्हाला परवडायची नाहीं "

" त्यात न परवडण्यासारखं काय आहे ? "

' शिकवणीचे पैसे—"

" तुम्हाला कुणीं सांगितलं ? शिकवणीच्या पैशाचं मी नाव तरी काढलं होतं ? कुणाच्या डोक्यातनं निघाली ही कल्पना ? "

" आम्हाला ठाऊक नाहीं. पण बाकीच्या मुलांच्या बोलण्यांत आलं. काहीं तरी दोन-दोन रुपये प्रत्येकानं द्यायचे दर महिन्याला. आम्हाला तें कुठून परवडणार ? म्हणून आम्ही आलों नाहीं."

" वेडे आहात. आजपासून यायला लागा—" आणि त्या दिवशीं भूमितीचं प्रमेय सांगायच्या आधीं रघूनं साऱ्या मुलांना दरडावून पण कुणाचं नांव न घेता म्हटलं, " माझी बदनामी करणारे विद्वान कोण आहेत इथं ? मी शिकवणीचे पैसे घेणार आहे असं सांगून, शिकवल्याची फेड करण्याची कामगिरी कुणी अंगावर घेतली आहे ? "

मुलं गप्प राहिलीं. रघूही गप्प राहिला. थोडा वेळ थाबून तो म्हणाला, " याचा छडा लागल्याशिवाय मी शिकवणार नाहीं. सांगा. कुणीं माझ्या-बद्दलचा हा शोध लावला आहे ? "

पांच-दहा मिनिटं अशा चूपचाप वातावरणात गेल्यावर एका मुलान रघूजवळ येऊन हळूंच म्हटलं, " शिकवणी संपल्यावर मी सागीन. आम्हां मुलाचा त्यात काही सबंध नाहीं " तें खरं समजून रघूनं शिकवणी चालू केली. शिकवणी संपल्यावर त्या मुलानं सागितलं, रघूच्या घरीं सारा वर्ग जाऊं लागणार हें कळल्यावर एका जुन्या शिक्षकानं चौकशी केली होती. आधी त्याची दुसऱ्या एका शिक्षकाशीं कुजबूज चालली होती अन् त्यान या कानामागून येऊन तिखट झालेल्या जोशानं लाट मारल्याचा उल्लेख होता. मुलाशीं बोलताना त्या शिक्षकानं, 'आधीं पैसे ठरवा – मागाहून तुमच्या आवाक्याबाहेरचे पैसे द्यावे लागतील. नाही दिले तर फॉर्मच्या वेळेला काटा निघेल – ' अशी प्रेमळ सूचना देऊन, 'इतक्या मुलाना एकाच धबडग्यात शिकवायचं तर दोन रुपयाच्यावर देऊं नका' अशी सल्लाशी केली होती. तिच्यावर वर्गात मुलं बोलली होती, एवढंच—

या माहितीचा रघूवर परिणाम झाला नाहीं असं नाहीं. पहिल्यादा त्याला वाटल होतं, वर्गातल्या मुलाना आपण नाव न घेता सुनावलं, तसंच एकदा शिक्षकाच्या खोलीत सुनवाव. पण ही त्याची उबळ फार वेळ टिकली नाहीं. काहीं झालंच नाहीं अशा रीतीनं वागायच त्यानं ठरवलं. श्रमानं तो पार दमून जात होता त्यामुळं शिक्षकाच्या खोलींत चुकून काहीं वेळ तो राहिला तरी गप्प–गप्प रहात असे शेवटी एकदा तो विषय शिक्षकाच्या खोलींत निघालाच.

" काय जोशी मास्तर – इतके श्रम करून चालायच नाहीं. आपल्याला झेपेल त्याच्याबाहेर जाऊन भागणार नाहीं. "

" कसले श्रम ? जेवढं आवश्यक आहे तेवढंच मी करतों. "

" तेवढंच काय ! जादा तास घेता, शिवाय मुलाना घरीं बोलावता— इतकं करायची काय जरुरी आहे ? "

" त्यांचे अभ्यास मागं आहेत म्हणून करावं लागतं. "

" अहो, त्यांच्या अभ्यासाची काळजी त्यांना. या पोरांना संवयच असते, मॅट्रिकच्या वर्गांत येईपर्यंत टिवल्या-बावल्या करीत एकेक वर्ष काढ त्यचं शेवटच्या महिन्यांत कांहीं तरी गडबडगुंडा करून वरच्या वर्गांत जायचं, अन् या साऱ्याचा वचपा मॅट्रिकच्या वर्गांत काढायला निघायचं ! "

" तें मला ठाऊक नाही. पण यंदा दोन महिने गणिताचे तास झाले नाहींत हा कांहीं मुलांचा दोष नव्हे. त्याबद्दल त्यांना कां शिक्षा ? "

" पण तो तुमचाही दोष नव्हे. तुम्हांला तरी कां शिक्षा ? "

" मी ही शिक्षा मानीत नाहीं—"

" तसं असलं तर गोष्ट निराळी. तुम्हांला शिकवणी करायचीच असली तर तुम्हांला यांत शिक्षा वाटणार नाहीं. तें स्वाभाविक आहे. पण मग एक मात्र विसरूं नका – आपल्या धंद्याची नीति म्हणून सांगतों. "

" वा ! सांगा ना. मी धंद्यांत नवीन आहे. तेव्हां धंद्याची नीति वगैरे जें काय असेल तें मला तुमच्याकडून शिकलंच पाहिजे. "

" म्हणजे त्याचं असं आहे. आपल्याला या शाळांतून पगार काय मिळतो तें तुम्हांला ठाऊकच आहे. प्रत्येकाचा संसार आहे. म्हणून प्रत्येकाला पगाराच्या भरीला शिकवण्या कराव्या लागतातच. त्याबद्दल कोणाचं कांहीं म्हणणं नाहीं. पण त्या करतांना आपण एवढं ध्यानांत ठेवायचं कीं शिकवणीच्या दरात कमी जास्ती करायचं नाहीं. एकाच धंद्यांतल्या माणसांनी एकमेकांशी स्पर्धा करायची नाहीं. एकट्या-दुकट्या शिकवणीला कमींत कमी पंधरा रुपये आणि क्लासांत प्रत्येकीं तीन रुपये. हें इथलं ठरलेलं प्रमाण आहे. तेवढं ध्यानांत ठेवून शिकवणी करा म्हणजे झालं. "

" तुमचं म्हणणं ठीक आहे कुळकर्णी. पण हें प्रमाण ज्यांना शिकवणीचे पैसे घ्यायचे असतील त्यांना लागू. मी शिकवणीचे पैसेच घेत नाहीं. खरं म्हणजे, तुमच्या अर्थानं मी शिकवण्या करीत नाहीं. मागच्या वर्षी मीं शिकवण्या नाकारल्या होत्या हें तुम्हांला ठाऊकच आहे— "

" तें ठाऊक आहे जोशी. पण तुम्ही शिकवणी म्हणा कीं आणखी कांहीं म्हणा – शाळेच्या वेळाबाहेर तुम्ही मुलांना अभ्यास सांगूं लागलात कीं ती

शिकवणी झालीच. तेव्हां तुम्ही ही नीति मोडूं नका. तुम्ही पैसेच घेणार नाहीं म्हणालांत तर तुमच्या घरीं मुलांचे थवे जमतील. पण त्यामुळं तुम्ही शिक्षकवर्गाला कायमचे अडचणींत टाकाल. असं कुऱ्हाडीच्या दांड्यासारखं करणं बरं नव्हे. ”

“ तुमचं म्हणणं मला कळत नाहीं. मी धंदा म्हणून शिकवणी करीत नाहीं. मुलांची अडचण म्हणून त्यांना मदत करतों आहे. यांत तुमच्या शिकवणीच्या नीतीचा प्रश्न येत नाहीं. बिचाऱ्या मुलाचं नुकसान व्हावं हें काही केल्या मला पटणार नाहीं. ”

“ तुमचं अजून विद्यार्थिदशेंतलं रक्त आहे जोशी. तुम्ही चुकता असं आम्ही म्हणत नाहीं. पण तुम्ही संसाराच्या व्यापांत पडला नाहींत म्हणून तुम्हाला अजून असं म्हणणं परवडत आहे. आम्ही कांहीं हौसेनं शिकवण्या करीत नाहीं. पोटाच्या गरजेनं करतों. तुम्हीच असे आमच्या पोटावर मारू नका असं आम्हाला म्हणायच आहे. ”

तो विषय अर्धवट राहिला. रघूचा क्रम चालू होता. त्या क्रमामुळं बापूशीं व्हायच्या त्याच्या गप्पादेखील तुटल्या. बापूला रघूच्या वागण्यातला हा तुटकपणा जाणवला. तो तिथं आला तोच मुळीं रघूमुळं. त्याचं मन त्या गांवात रमत नव्हतं. दिवाळीच्या सुटीला तो घरीं गेला तो काहीं परत आला नाहीं. शाळेत त्यानं राजीनामा पाठवून दिला आहे एवढंच समजलं. तो कुठं आहे याचा काहीं पत्ता नव्हता—

एके दिवशीं ज्या कुलकर्ण्यांनीं रघूला शिकवणीबद्दल छेडलं होतं, त्यानींच त्याला शाळा सुटल्यावर आपल्याबरोबर येण्याबद्दल विचारलं. रघू चालूं लागला. कुलकर्ण्यांच्या घरीं गेल्यावर त्यानीं आंत चहाची ऑर्डर दिली. रघून, घरीं मुलं जमलीं असतील, उशीर व्हायला नको, चहाची जरुरी नाहीं असं सांगायचा प्रयत्न केला. पण कुलकर्ण्यांनीं त्याला आग्रह करून बसवून घेतलं. कपी दुधाचा भडक तांबडा चहा घेऊन झाल्यावर कुलकर्ण्यांनीं हळूच विषय काढला, “ जोशी, एक पांच रुपये देता का ? —अगदीं रेशनची नड आहे.” रघूनं मुकाट्यानं खिशातनं पाचाची नोट काढून दिली अन् तो काहीं न बोलतां उठून चालूं लागला —

दुसऱ्या दिवशीं कुलकर्ण्यांनीं आपण होऊन त्याला सांगितलं, " एक तारखेला नक्की पैसे परत करीन. आजारीपणांत मुलांच्या औषधाचीं बिलं द्यावीं लागली, त्यामुळं फार ओढाताण झाली. वीस तारखेला पाच रुपये द्यायला कुणी तयार नव्हतं; तुम्ही दिलेत म्हणून घरांत चूल चालू राहिली--" रघू त्याचं हें सारं बोलणं थांबवण्याचा प्रयत्न करता करता हतबुद्ध झाला.

× × ×

थंडीच्या दिवसात रघूला आराम असायचा. पावसाळ्यांत हमखास उफाळणारा बाळचा आजार थंडीच्या दिवसांत दबून राहिल्यामुळं तेवढ्या प्रमाणांत कृष्णंभटजी आणि रघू दोघांनाही फुरसत मिळायची. पण या वर्षी कुठं दिवाळीच्या नतर एकदा अवेळी पाऊस पडल्याच निमित्त झालं आणि बाळचं अंथरूण पडलं. नेहमींचा ताप-खोकला आहे म्हणून काढा-गोळ्याची देशी औषधं सुरू झालीं. कृष्णभटजी बाळाची छाती शेकू लागले. दुखण्या-दुखण्यानं बेजार झालेल्या बाळानं निरनिराळे हट्ट करायला सुरवात केली. कडू काढा घ्यायचा नाहीं म्हणून त्यानं दोन दिवस ओळीनं चुळा टाकल्या.

बाळाचा खोकला वाढत होता. शिकवणीच्या वेळीं त्याच्या खोकल्यान शिकवणीत इतके अडथळे आले कीं, बोलायची सोय नाही. मुलानीं अडचण ओळखून दोन दिवस सुट्टी घ्यायचं ठरवलं. रघूला तेवढा मोकळा वेळ मिळताच बाळनं आपल्याजवळ बसलं पाहिजे म्हणून आग्रह केला. बाळच्या जवळ बसल्यावर रघू त्याला कुठली तरी गोष्ट सांगून रंजवण्याचा प्रयत्न करू लागला पण बाळनं, ' गोष्ट नको. तू नुसताच बैस ' म्हणून सांगितलं. औषधाच्या वेळीं त्यान पुनः काढा घ्यायच नाकारलं. तें नाकारताना त्याची जी अवस्था झाली ती पाहून रघूला काय करावं तें कळेना—

कृष्णंभटजींनीं रघूजवळ डॉक्टरला बोलवण्याची गोष्ट काढली. रघूनं मुकाट्यानं डॉक्टर आणला. डॉक्टरांनी बाळला चागलं अर्धा तास तपासलं. औषधाची पाळी सुरू झाली. दोन महिने नियमानं औषध चालू होतं. तोळा-मासा मागपुढं व्हायचं असा प्रकार चालू राहिला. दोन महिन्यात रघूनं प्रत्येक पगाराच्या वेळीं जास्तीत जास्त रक्कम डॉक्टराच्या बिलापोटीं दिली होती. बाळच्यासाठी म्हणून शाळेंतलीं मुलं कधीं एखादा खाण्याचा जिन्नस देत असत. तो खायला रघू बाळला नको म्हणत नव्हता. असं चालू राहिलं.

दोन महिन्यानंतर रघू–कृष्णंभटजी–बाळ कोणालाच कळेना; या दोन महिन्यांत औषधाचा काय परिणाम झाला आहे तो ? अंथरुणावर पडून आहे तोंवर त्याला काहीतरी द्यायला पाहिजे यापेक्षा जास्त चिकित्सा करण्याची शक्तीच कोणात उरली नाहीं. त्याच्या रोगाचं निदान अजून कोणाला समजलं नव्हतं. रघूच्या वर्गातल्या एका मुलानं सरकारी दवाखान्यांत बदलून आलेल्या नवीन डॉक्टराला आणण्याची गोष्ट काढली. पण त्याला घरापर्यंत आणायची फी कोठून द्यायची हा प्रश्न पडला. शेवटी मुलांनीं बाळला झोळींत बसवून आरामात दवाखान्यापर्यंत नेलं. डॉक्टरांनीं त्याला तपासलं आणि या मुलाला अशा स्थितींत दवाखान्यापर्यंत आणण्याच्या पोरटकीबद्दल सर्वांना खूप झाडलं. त्यांनीं तिथं आलेल्या एका मोटारींतून बाळला घरीं पोंचवलं आणि रघूला बोलावून घेतलं. रघूला हा प्रकार समजेना. डॉक्टर ताडताड बोलूं लागले—

" तुम्ही सुशिक्षित माणसं – इथपर्यंत पाळी येईतोंवर गप्प बसतां —आतां इथं डॉक्टर काय करणार कपाळ ? तुम्हाला वेळेवर उपचार करायचं कळूं नये ? याला काय म्हणायचं ? "

" पण काय झालंय् बाळाला ? दोन महिने त्याला डॉक्टराचं औषध चालू. होतं गुण नाही म्हणून आज इकडे आणला—"

" कोण होता तो डॉक्टर ? कसलं औषध देत होता ? —आणि दोन महिन्यांच्या आधीं काय केलंत ? हा आजार दोन महिन्यांतला नाही— "

" त्याची प्रकृतीच मुळापासून अशक्त आहे. पावसाळ्यात ताप-खोकल्याचा त्रास होतो— "

" हें आतां सांगतां आहांत ! वेळच्या वेळीं याची काळजी घेतली असती तर— "

" पण इतके दिवस आमचं बिऱ्हाड खेड्यात होतं – तिथं कुठली व्यवस्था होणार ? "

" मग आतां तरी आलातच ना माझ्याकडे ? हें आधींच केलं असतंत तर— "

" आता काय करता येईल ? "

" काय करणार आतां ? त्याला क्षय झाला आहे— "

— रघूनं मटकन् हातात डोकं खुपसलं. पुढं विचारण्याची त्याला शक्ति उरली नाहीं.

" फार पुढची अवस्था आहे. काय उपयोग होईल सागतां येत नाहीं. पण धीर सोडूं नका. अन् घरांत सांगूं नका. आणखी त्याला मिरजे-बिरजेला नेण्याच्या भानगडींत पडूं नका. मिरजेच्या नांवानं त्याच्या मनावर उलटा परिणाम होईल. "

" आम्हाला तें शक्य नाहीं. इथच काय होण्यासारखं असेल तेवढं—"

" तेवढं मी करतों. त्याच्या समाधानाकरता आठ-पंधरा दिवस त्याला इथलं औषध द्या. मात्र आता त्याच्यावर, अंथरुणावरून उठायचं नाहीं यापेक्षा दुसरं काहींही बंधन घालूं नका. तेलकट सोडून तो मागेल तें, मागेल तितकं त्याला खायला द्या. मनमुराद राहून आणि हवं तितकं खाऊन कदाचित् झाली तर कांहीं सुधारणा होईल – थोडासा संभव आहे. प्रयत्न करून पहा—"

औषधाची बाटली घेऊन रघू उठला. घराकडे जाताना त्याचीं पावलं लटपटत होतीं. दाराजवळ आल्यावर त्यानं शक्य तितका हंसरा चेहेरा केला. बाळन विचारलं, " औषध गोड आहे ? खायला सांगितलं आहे ? "

" हो. औषध गोड आहे. आणि तुला हवं तें खायला सांगितलं आहे. "

कृष्णंभटजींना शंका आली. ' पथ्य नसलेलं औषध कसलं ? ' रघूनं त्यांचं समाधान केलं. नव्या पद्धतीन पथ्यावर भर न देता डॉक्टर औषध देणार आहेत. मध्यंतरीं वडलांच्या समाधानासाठीं रघूनं डॉक्टरांना दोन-तीनदां घरीं यायला लावून ग्लूकोजचीं इंजेक्शनं बाळाला दिलीं. पंधरवड्यानंतर एक शक्तिवर्धक आणून बाळाचं औषध बंद केलं. अजून तो अंथरुणावर पडून होता. विश्रांतीन आतां उरलेला ताप बरा होईल असं रघूनं बाळाला सांगितलं.

मळणीचा हंगाम आला तशी बाळाला गावाची आठवण झाली. रघू नसतानासुद्धा रंगराव मधूनमधून घरीं हुरडा आणून द्यायचा. गुऱ्हाळाच्या

दिवसांत रस पोचवायचा त्याचा बाळानं उच्चार केला. रघूच्या पोटांत कालवलं. त्यानं भाडोत्री गुऱ्हाळांतनं बाळापुरता पावशेर रस आणवला. बाळानं आणखी पाहिजे म्हणून हट्ट घेतला. सोसायचा नाहीं म्हणून रघू त्याची समजावणी करीत होता—

दुसऱ्या दिवशी रघूला शाळेंतून यायला पाच-दहा मिनिटं वेळ झाला. तेवढ्यांत आधीं येऊन बसलेल्या मुलांनीं सहजीं बाळाची चौकशी केली अन् बाळानं त्याना ऊस हवाय् म्हणून सांगितलं. शनिवारच्या सुट्टीहून परत येताना त्यातल्या एकान आपल्या गावाहून पाच उसाची एक छोटी मोळी आणून टाकली. रघूनं याबद्दल त्या मुलाला दटावलं. मुलानं "त्यात काय आहे? खेड्यांत ऊस तसाच कितीजण आणतात!" म्हणून वेळ मारून नेली. पण रघूच्या दटावण्यानं बाळानं गळा काढला. "आम्हाला कुणी आणून दिलं तरी त्याला बोलतो" म्हणून कृष्णभटजींजवळ तक्रार केली. रघूनं ती ऐकली. त्याला कळेना. बाळाच्या या नाजूक प्रकृतीइतकंच नाजूक झालेलं मन असं दुखावेल ही आपल्याला कल्पनाही आली नाहीं. बाळाच्या साठीं आपल्याला त्या मुलाचं ओशाळवाणं व्हावं लागल ही रुखरुख त्याच्या मनात शिल्लक राहिली.

नंतर रघूनं दुसरीच युक्ति काढली. इतके दिवस डॉक्टराच्या सांगण्याकडे त्यानं दुर्लक्ष केलं होत. बाळाच्या खाण्यात फळं येतील तितकीं चागलीं असं डॉक्टर म्हणाले होते. पण तें आपल्याला परवडणारं नाहीं म्हणून रघूनं टाळलं होतं. उसाच्या हकीकतीनंतर रघूनं दररोज बाळाला एक-दोन तरी फळं आणून द्यायचा क्रम ठेवला. ताजीं फळं मिळालीं नाहींत तर निदानीं सुकीं फळं – सुका मेवा तरी चार आण्यांचा रोजचा आणायचा असा त्याचा क्रम चालू झाला. बाळाला त्यामुळं थोडं बरं वाटायला लागलं.

महिनाअखेरीला रघूनं हिशेब केला. नियमितपणें रोजचे चार-सहा आणे खर्चायचे म्हटलं तरी दरमहा दहा रुपये बाजूला काढून ठेवायला लागत होते. उरलेल्या पंचवीस रुपयांत तीन माणसांचा खर्च चालवायचा! बाळाच्या खाण्यांत दूध पाहिजे म्हणून तें घेता येईल तितकं घ्यायचं. घरभाडं, वाणी कुणाची म्हणून उधारी ठेवून फट् म्हणून घ्यायचं नाहीं, हा बाणा वाटेल

त्या परिस्थितींत पाळायचा. दोन्ही टोकाचा मेळ कसा घालायचा या विवंचनेनं रघू चूर झाला.

— दुपारीं शाळेंत त्याला अचानकपणें पुण्याच्या शिक्षयाचं पत्र मिळाल. बापूनं पुण्याला मिलिटरी अकौंटसमध्यें नोकरी धरली होती. नोकरी धरली ती पुण्यात रहायची सोय व्हावी म्हणून. त्यातून वेळ काढून एम्. ए. व्हायचं या जिद्दीनं बापू पुण्याला गेला होता. त्यानं लिहिलं होतं— ' शाळेच्या पस्तीस रुपड्यात काय होणार ? तिथं कशाला खितपत पडतोस ? पुण्याला निघून ये. एम्. ए. च्या अभ्यासाला मिलिटरी अकौंटसची नोकरी सोयीची आहे. त्याहीपेक्षा जमल्यास रेशनिंगमध्यें इन्स्पेक्टर होता येईल. तिथं काम फिरतीच म्हणून दगदगीचं वाटलं तरी फिरती आपल्या हातात असते. सगळ्यात मुख्य म्हणजे दोन्हींपैकी कुठही नोकरी लागली तरी रेशनची विवचना नाहीं. मिलिटरीत पैसे देऊन मिलिटरीच्या रेशनमधला गहूं, तांदूळ मिळतो. आणि रेशनिंग खातं हें तर अन्नाचंच खातं आहे. तुला नुसती जास्त पैशाचीच तात्पुरती नोकरी करून सावकाशीनं एम्. ए. चा अभ्यास करायचा असला तर देहूरोड–खडकीच्या कारखान्यातून सहजीं पाच रुपये रोजावर ओव्हरटाइमसुद्धा दोनशेंपर्यंत जाता येईल. काहींही ठरव पण उगीच विचारत पडू नकोस—''

रघूच्या डोक्यात पत्रानं घर केलं. त्याचा कल पुण्याच्या बाजूचा होऊं लागला. संध्याकाळीं घरीं गेल्यावर नीट विचार करून ठरवूं म्हणून त्यानं पत्र खिशात टाकलं. आपली चल-बिचल कुणाला कळायला नको यासाठीं त्यानं समोर पडलेलं मासिक उचललं. आणि तो तें चाळूं लागला. रघूच्या हातात कधीं नव्हे तें मासिक पाहून कुलकर्णी मास्तरानीं त्याला माहिती दिली, " गोष्टींत फारसा दम नाहीं. तुम्ही चित्रं पहा जोशी मास्तर—'' " कसलीं चित्रं ? कुठं आहेत ? '' रघूनं चमकून विचारलं ' बाकीचीं राहूंद्यात. शेवटच्या पानावर पहा. तीं चित्रं पहायचे तुमचे दिवस आहेत '' तरीही रघू उमगला नाहीं. कुलकर्णी मास्तरांनीं रघूच्या हातून अंक काढून घेतला आणि शेवटचं कव्हर मुडपून त्याला दाखवलं. " नादा सौख्य भरें '' या ठराविक मथळ्याखालीं येणारीं जोडप्यांचीं चित्रं तिथं होतीं, रघूनं तोंड फिरवलं.

"अहो, नुसतीं चित्रं बघायला काय हरकत आहे? एकेकाची किंवा एकेकीची निवड पाहून खूप गमत वाटते. कुठं मुलगा झक्क असतो तर मुलगी काकू, कुठं याच्या उलट; आणि मथळा मात्र 'नांदा सौख्य भरें'—

"असेनात का! आपल्याला काय करायचं आहे?"

"करायचं काय? थोडीशी करमणूक. बघा तरी ही जोडी मुलगा किती टेचात दिसतो मिलिटरी पोषाखात अन् शेजारीं मात्र ढब्बी बायको—" कुलकर्ण्यांनीं बोट ठेवूनच चित्र रघूच्या डोळ्यापुढं धरलं. डोळ्याना तें पहावं लागलं. तरीही रघूला फारसं काहीं वाटलं नाहीं. कुतूहलानं त्यानं चित्राच्या खालची नावं वाचलीं. लेफ्टनंट आपटे आणि शिवपूरच्या कु. यमू बापट" फोटोंतला बडल्याचा स्मार्टपणा आणि लेफ्टनंटचा पोषाख पाहून रघूला धक्काच बसला. मात्र या लग्नानं त्याच्यावर काहींच परिणाम केला नाहीं चित्र दूर करून त्यानं कुलकर्ण्यांना सांगितल, "दोघंही माझ्या ओळखीची आहेत. माझ्याबरोबरच कॉलेजात होतीं—"

"मग आधींच जमवल असेल? हल्लीं लव्ह मॅरेजेस् सर्रास व्हायला लागलीं आहेत, फार पुढं गेलंय् जग" कुलकर्ण्यांनीं टीका केली.

"असेल कदाचित्. त्याबद्दल मला काहीं ठाऊक नाही. बंगल्या-बंगल्यातल्या लोकांचं लग्न आहे हें. तें कसं जमतं हें माझ्या तरी आकलनाच्या पलीकडचं आहे"

"जोशी मास्तर, तुम्ही अलीकडे फारच विरक्त व्हायला लागलात. शोभत नाहीं हें तुमच्या वयाला. अहो, अडीअडचणी सगळ्यानाच असतात. आम्ही संसारीं माणसं, तुमच्यापेक्षा अधिक गुरफटलेलीं; इतकं मनाला लावून घेऊन चालत नाहीं तुम्ही भावाच्या आजाराबद्दल अशी काळजी करूं नका."

"छे! काळजी करायचं मी केव्हांच सोडून दिलं आहे."

"आणखी तुम्हाला सांगूं जोशी—मास्तर? दुष्ट, कठोर म्हणाल तुम्ही—पण तुमच्या भावाच्या आजारानं एक गोष्ट चांगली झाली. जगाचा – या आयुष्याचा फार मोठा अनुभव मिळाला तुम्हांला. आतां तरी आमचं ऐका. नसत्या तत्त्वाच्या नादीं लागून आपलं आणि भावाचं नुकसान करूं नका. अडचणीनं तरी तुम्हाला शिकवलं असेल. घाम गाळून शिकवणी करतां त्याचा

मोबदला घेतल्यावांचून राहूं नका तोच तुमच्या उपयोगी पडेल. सध्याचे दिवस रुपये, आणे, पैचे आहेत या महागाईंन तर पैशाशिवाय सारं व्यर्थ झालं आहे. सार तत्त्वज्ञान भरल्या पोटाचं आहे—''

रघू मुकाट्यानं उठून तासाची पुस्तकं घेऊन बाहेर पडला त्या दिवशीं शाळा सुटायच्या आधींच त्यान मुलाना आज घरीं तास घेणार नाही असं सांगून टाकलं. घरी गेल्यावर पाच-दहा मिनिट बाळाशी गप्पा मारल्या – कृष्णभटांनीं रघूला विचारलं, "आजच्या जेवणाचं काय ? पीठ संपून गेलंय्." फिरायला जायचा विचार गुडाळून रघू कोटाचे खिसे, ट्रंकेचे काने-कोपरं धुंडूं लागला. थोड्या वेळानं तो बाहेर पडला. त्याची पावलं कुलकर्णी मास्तरांच्या घराकडे वळलीं, त्यानं नाइलाजानं पाच रुपयांची मागणी केली. कुलकर्णी तरी एकदम कुठून देणार ? त्यांनीं मुष्कीलीन एक रुपया रघूच्या हातावर ठेवून बाकीचे पुढच्या महिन्यात देईन म्हणून अजीजीनं सांगितलं. रुपया घेऊन तो बाजारात गेला. हिंडून हिंडून तो शिणला. अखेरी जिवाचा धडा करून त्यानं सहा आण्याचीं शेरभर रताळीं घेतलीं. घरीं आल्यावर रघूनं होतं ते सार दूध बाळाला प्यायला दिलं. थोडासा विस्तव पेटवून चार रताळी भाजून भटजींच्या पुढं टाकली. दोन रताळीं कच्चींच स्वतः खाऊन टाकली.

त्या रात्रीं रघूनं बापूच्या पत्राचा विचारच केला नाहीं. पुढं कित्येक दिवस तें पत्र तसंच त्याच्या खिशात पडून होत घरच्या रोजच्या विवंचनेपुढ आणि दैनदिन कामापुढं रघूला विचार करायला सवडच नव्हती. उन्हाळा येऊं लागला तसतशीं फळं महागं लागलीं. बाळाचा खर्च वाढला. रेशनच सगळ धान्य आणायलाही रघूजवळ पैसे उरेनात. बापलेक नियमानं एक वेळ जेवून काढू लागले. संध्याकाळचं जेवण आडवारावर आलं. कधीं कधीं शक्य झालं तर रताळीं आणावीत, नाहीं तर ताब्याभर पाणी भुकेच्या पोटात ढकलून, रात्रीं अंथरुणावर अंग टाकून द्यावं ही संवय रघूच्या अंगीं पडली. कृष्णंभटजींना ती संवय आधींपासूनच होती. त्यांनीं 'असं कां' म्हणून रघूला विचारायचं नाहीं हें ठरवून ठेवलं होतं.

महिनाभरानं कळा खाऊ झालेला कोट रविवारीं पाण्यात बुचकळून काढावा म्हणून मोकळा करायला रघूनं सुरवात केली. तेव्हां चुरगळलेलं बापूचं

पत्र हाताला लागलं. रघूनं पुनः एकदां तें वाचून काढलं. अन् तुकडे तुकडे करून ते तुकडे चुलखंड पेटवायला तिथं नेऊन टाकले. बाळाच्या या अवस्थेंत आपल्याला गांव सोडणं शक्य नाही हें त्याला उमगून आलं होतं. पुण्याच्या जागेच्या टंचाईत सर्वांनीं तिथं जाण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता. एकशेंवीस मैलाचं अंतर – हें आपल्या आवाक्याबाहेरचं आहे हें रघूला पटलं.

अखेर मार्च महिन्याच्या शेवटीं बाळाचं दुखणं विकोपाला गेलं. त्याला रक्त पडूं लागलं खोकल्यानं जीव कासावीस झाला. त्याचे ते हाल बघून रघूच्या डोक्यात अनेकदा विचार आला. याच्या या यातना एकदा संपतील तर बरं होईल. तेलकट–तुपट न खाण्याच बंधनसुद्धा आतां त्यानं शिल्लक ठेवलं नाहीं. बाळ मागील तें त्याला द्यायचं. खोकल्यानं हैराण होऊन पडल्यावर त्याच्या छातीवर हलके हात फिरवायचा असं करीत बापलेक दिवस मोजीत होते

रघूला शाळेंत बोलावणं आलं. खोकता खोकता छातींत बेडका अडकून बाळनं यात्रा संपवली होती. कृष्णंभटजी एकदांच ‘बाळ’ म्हणून टाहो फोडून चिप झाले. रघूच्या सहकाऱ्यांनीं आणि कांहीं विद्यार्थ्यांनीं मिळून अखेरचं काम पार पाडलं. रघू घरीं परत आला तरी कृष्णंभटजी बसल्या जागेवरून हलले नाहींत. त्याच्या डोळ्यात पाण्याचं टिप्पूस नव्हतं ‘अंघोळ करणार ना ?’ रघूनं भीत भीत विचारलं.

“आत्तां ? —संध्याकाळची अंघोळ ? रघ्या, तुला काय वेडबीड लागलंय.”

× × ×

परीक्षा संपून शाळेच्या कामातून सुटका झाल्यावर रघूला त्यांतल्या त्यात स्वस्थता मिळाली. यंदा त्याला हेडमास्तरांची गाठ घ्यावी लागली नाहीं. सुशिक्षित माणसाच्या पुण्या-मुंबईकडे मोठ्या पगाराच्या आशेनं जाणाऱ्या लोंढ्यातून तालुक्या–जिल्ह्याच्या लहान-सहान गांवाकडे कोणी वळण्याची फारशी शक्यता नाहीं हें प्रत्येकाच्या ध्यानीं येऊन चुकल होतं. त्यातही रेशनिंग खात्यानं, लहान गावाची ओढ असलेल्या थोड्याशा

सुशिक्षिताना खेंचून घेतलं होतं. पस्तीसा–चाळीसांची किंमत दहा पंधराच्या घराला आली होती. होते त्या शिक्षकाना पाच-दहा रुपयाचं प्रलोभन दाखवून राखून ठेवायचे दिवस होते. हेड्मास्तराना जे भेटून गेले त्याना त्यांनीं सरांस दहा रुपये वाढवले होते. मंडळाच्या सभेची या खेपेला अडचण नव्हती. रघू भेटला नव्हता. त्याची अडचण सर्वांना ठाऊक होती. भ्रमिष्ट वडलांचं ओझं वागवीत तो बाहेर जाणं शक्य नव्हतं. तरी त्याला उदारपणें पांच रुपयाची बढती देण्यात आली. त्या कागदावर काय लिहिलं आहे याची दखल न घेता रघू शाळेंतून बाहेर पडला.

घरीं वडील स्वस्थ बसून होते. बोलणं त्यानीं टाकलंच होतं. त्याना प्रत्येक गोष्ट करायला सांगावं लागत होतं. सांगितल्यावरसुद्धा ती होईल अशी खात्री नव्हती. पुष्कळदा करवून घ्यावी लागत असे. बाळाच्या मृत्यूनं हलका झालेला मेंदू कालांतरानं ताळ्यावर येईल अशी समजूत करून घेऊन रघू वागत होता.

रघू दोन दिवस घरीं बसून राहिला. सकाळीं उठण्यापासून संध्याकाळीं अंथरुणावर पडेपर्यंतचा कृष्णंभटजींचा प्रत्येक व्यवहार तो स्वतः उरकवून घेऊं लागला. " दादा, चहा घ्या ", " अंघोळ करायला उठा ", जेवण झालं – आतां पानावर बसूं नका. " असं पदोपदीं सांगण्याची पाळी होती. कृष्णंभटजींनीं दोन दिवस न बोलतां सारं रघूच्या सांगण्याप्रमाणं केलं. तिसऱ्या दिवशीं तोच प्रकार पुनः व्हायला लागला तेव्हा कृष्णंभटजींनीं डोळे फिरवले. रघू घाबरला, पण पुनः त्यानं मागल्या दोन दिवसांप्रमाणं वागण्याची तयारी केली – भटजींना वाचा फुटली.

" रघ्या, काय चालवलं आहेस हें ? मला काय तूं कुक्कुलं बाळ समजतोस ? नोकरीवर जायचं सोडून दिलंस आणि माझ्यामागं कटकट लावतोस ! "

" दादा, शाळेला सुट्टी आहे आतां—"

" कांहींतरी सांगूं नकोस मला. माझ्यावर पोलिसी पहारा करायसाठीं तूं मुद्दाम घरीं राहिला आहेस, चांगलं नव्हे हें. "

" तसं नाहीं दादा. तुम्ही उगीच—"

" गप्प बस ! तुझीं लक्षणं कळलींत मला. अलीकडे फळं आणायचीं

सोडून दिलीस. तुझ्या डोळ्यावर खर्च येतो आहे. धाकटा भाऊ मात्र दिसत नाहीं – तुला माया नाहीं. ''

'' दादा ! दादा ! ''

'' चूप. त्याला कुठं धर्मार्थ दवाखान्यांत नेऊन टाकलास. मला सांगितलं-सुद्धां नाहींस. तुला जड झाला ना ? मीसुद्धां जड झालोंय्, म्हणून असा छळून मला दूर करायला बघतोस पण मी तुझा बाप लागून राहिलों आहे.''

'' दादा, आता जेवण करून मुकाट्यानं झोपा बघूं—''

'' तर तर मला झोपा म्हणून सागायचं अन् दाराला कडी लावून बाहेर आपण उंडगायला जायचं असंच कीं नाहीं ? जायचं असेल त्या बाप्याच्या वाड्यात इस्पिटं कुटायला, नाहीं तर रंग्याच्या मळयांत पान चघळायला ! ''

रघूनं जबरीनं कृष्णंभटजींना अंथरुणावर लोटलं. तिथच तो कसलं तरी पुस्तक उघडून बसला. अक्षरांवरनं डोळे फिरत होते. पण काय वाचतों आहे याचा रघूला पत्ता नव्हता. आपल्या वडलाचं बोलणं ऐकून विचारानं त्याला हैराण केल. इतके दिवस वडील तोंड उघडीत नव्हते या चिंतेनं त्याला व्याकूळ केलं होत आज त्यानीं तोंड उघडलं – पण तें असल्या विचित्र बोलण्यासाठीं – इतके दिवस दबून राहिलेली वाचा परत आली म्हणून आनंद मानावा कीं त्या वाचेन जें असंबद्ध भाषण केल त्यामुळं खत करावी हें रघूला समजेना. त्यानं स्वतःची कशीबशी समजूत घातली. बाळाच्या मृत्यूनं वाचा आणि स्मृति दोन्ही काम करीनातशीं झालीं होतीं. वाचा परत आली. साठवलेली, गोठलेली भावना वेडयावाकडया शब्दांनीं बाहेर पडून तिचा निचरा झाला म्हणजे वडलाची स्मृति आणखी कांहीं दिवसांनीं परत येईल. आणखी कांहीं काळ जाऊं द्यावा. इतक्यांतच त्याना बाळाच्या बाबतच्या वस्तुस्थितीनं भेडसावण्यांत अर्थ नाहीं.

आणखी चार दिवसांनीं कृष्णंभटजींचा नवा गोंधळ सुरू झाला ते म्हणाले, '' आपण दोघानींच इथं जेवायचं ? तें पोर तिकड धर्मार्थ दवाखान्यांत तळमळत असेल. त्याला इकडे आण. सुट्टी आहे ना आतां !

मग आतां कशाला दवाखान्यात ठेवतोस त्याला ? त्याला आणल्याशिवाय आज जेवण नाहीं. ''

रघूनं त्याची समजूत घालायचा प्रयत्न केला. "आता बाराच्या वेळेला दवाखाना बंद असतो या वेळीं भेटसुद्धा घेऊ देत नाहींत. सध्याकाळी पाहूं. आता जेवून घ्या—"

"ह्या, ह्या अन्नाची शपथ आहे. मी तर त्याला हात लावणारच नाहीं. पण तू भावाला टाकून एक घास तोंडात घालशील तर या अन्नानं शेण होईल तूं नरकांत पडशील."

"तुम्ही मुकाट्यानं जेवता कीं नाही आता ?"

"माझ्याशी ही मुजोरी—प्रत्यक्ष बापाशीं ? कळलं त्याचं काय केलं असशील तें. उद्या तो दवाखान्यात मेला म्हणूनसुद्धा मला सांगशील.'' कृष्णंभटजींचा अवतार अनावर झाला. रघूच्या अंगावर जायचं अवसान त्यानीं आणलं. उचललेला हात वरच्यावर धरून रघून त्याना बैठकीच्या खोलींत ढकललं. मातीच्या चवीनं ताटातली भाकरी बचावचा तोंडांत घालून गिळली. अन् आचवून तो तिथंच पाटावर स्वस्थ बसला. बाहेरच्या खोलींतली धडपड थोडी शांत झालेली दिसली म्हणून दारांतनं पाहिलं. कृष्णंभटजी सतरंजीवर स्वस्थ पडून राहिले होते. त्याचा डोळा लागला होता.

त्यांना जाग आल्यावर रघूनं हात धरून पाटावर नेलं. भटजींनीं मुकाट्यानं चार घांस पोटात घातले. पुनः ते सतरंजीवर येऊन पडले. असा प्रकार वरचेवर व्हायला लागला. दोन वेळचं अन्न पोटात जाणं ही मोठी कसरत होऊन बसली. भटजींची प्रकृति खंगूं लागली तसतशी त्याची दांडगाई कमी झाली. पण वाढत्या अशक्तपणानं रघूला दुसरी चिंता लागली. त्यानं हिमत धरून, आधीं न सागतां, डॉक्टरांना बोलावून आणलं. ते तपासून जाईपर्यंत भटजी गप्प होते. रघू औषधाची बाटली घेऊन आला तेव्हां ते क्षीणपणानं म्हणाले—

"आणलंस औषध. बरं झालं. पण फळं नाहीं आणलीस ? ती तोडूं नकोस. त्याला फळं फार आवडतात. आपण हाल काढूं. पण त्याचीं फळं कमी करूं नकोस."

रघूनं मुकाट्यानं बाजारांतून मिळालीं तीं चार-सहा फळं आणलीं. भटजींनीं तीं गुंडाळलेल्या अंथरुणाजवळ व्यवस्थित ठेवली. औषधाची बाटली पण तिथंच ठेवली होती. चार दिवस फळं नुसतींच सुकून गेलीं. तेवढ्यांत रघूला एकट एकटं हें सारं निस्तारणं जड वाटूं लागल. म्हणून शेजारच्या खेड्यातल्या आपल्या एका विद्यार्थ्याला त्यानं सोबतीला बोलावून घेतलं—

रघू आणि त्याचा विद्यार्थी माने बाहेर सोप्यांत असून दुपारचा वेळ काढूं लागले कधींमधीं मान्याला अभ्यास सांगावा, कधीं नुसत्याच हलके हलके त्याच्याशी गप्पा माराव्यात आणि त्यांत विरंगुळा मानावा असा क्रम रघूनं चालू केला. मध्यें दोन दिवस फळं बंद केल्यावर भटजींनीं रडायला सुरवात केली. रघून पुनः फळ आणायला सुरवात केली :

दुपारच्या वेळेला रघू अन् माने बाहेर असताना हळूच भटजी काटी टेकीत टेकीत उठले. त्यांनीं दाराला कडी लावली. औषधाची बाटली जमिनीवर ओतून टाकली अन् ती ओल दाराशीवरच्या पंच्यान पुसून तो एका कोपऱ्यांत फेकला. नंतर हात नेसल्या पंचाला पुसून फळं सोलायला सुरवात केली. एक दोन फळं खाऊन पाहिलीं. बाकीचीं फळं नुसतीच सोलून पिळून चोथा विस्कटून टाकला – अन् एवढ्या श्रमानं मलूल होऊन ते आडवे झाले.

पाच वाजता चहा करायसाठीं रघू उठला. त्याला दार खडखडाव लागलं. भटजींनीं दार उघडलं तेव्हा त्यांच्या मुद्रेवर कारुण्य होत. " अरे, हळू नाही का दार वाजवायच ? आजाऱ्याला त्रास होतो आवाजान. आज कित्येक दिवसानीं जिभेला फळांची चव लागली अन् तेवढ्यानं बर वाटून डोळा लागला होता. आता तरी बेतान वावर. त्याची झोपमोड करूं नकोस. तुला अजून कळत कसं नाहीं रघू ? आपलं घर मोटं आहे का ? खुट्ट झालं तरी त्याचा फार फार त्रास होतो बर का ? "

मान्याचा चेहरा चांगला नजरेंत बसल्यावर भटजींनी त्याला एकटा पाहून एक दिवस विचारलं, " काय रे, तूं रंगरावाचा भाऊ ना ? मग एवढं कसं विसरलास ? बाळाला कांहीं ऊंस, हुरडा आणून द्यायचा नाहीं ? त्याला फार आवडतो."

" पण – पण— "

" मला ठाऊक आहे तूं काय म्हणणार आहेस तें. बाळ इथं कुठं आहे असंच की नाहीं ? पण त्याची पंचाईत तुला का – आम्हीं जिवत आहोंत अजून. आमचे आम्ही समर्थ आहोंत. पण तुम्हीं अशी दानत सोडूं नये. तू आणायला हवंस. तुला सगळं नवीन असलं तरी रंगराव तर रघूचा मैतर आहे ना ? त्यानं नाहीं का तुझ्या हातीं पोंचवूं ? आम्ही काय इतके अगदीं परके झालों ? "

माने कांहींच न बोलता नुसता उभा राहिला.

" तूं घाबरूं नकोस. रघू तुला काहीं म्हणायचा नाहीं. शेतावर जाऊन यायला वेळ लागला तर मी सागीन त्याला. उद्या घेईल जास्त अभ्यास जा आतां – उशीर करूं नकोस. रात्रीं-अपरात्रीं पांदींतनं यायला नको. दिवसा उजेडी जाऊन ये. उभा राहू नकोस इथं—"

तेवढ्यांत रघू बाहेरनं आला. तो आल्याबरोबर भटजी गप्प झाले.

सुट्टी संपायच्या वेळेला माने चार दिवस गांवाकडे निघून गेला. तो दोन दिवस दिसला नाहीं. तेव्हा भटजींनीं रघूला जवळ बोलावलं. ते ओक्साबोक्शी रडूं लागले. रघू पिळवटून गेला. त्यानं कसंबसं विचारलं—

" काय पाहिजे दादा तुम्हांला ? कशाला हांक मारली मला ? "

" अरे नुसता जवळ बैस. दुसरं कांहीं नको मला. तुझ्याशिवाय कोण आहे मला जिवाचं ? तुझ्याशिवाय कुणापाशीं मागायचं मीं ? माझं एवढं मागणं पुरव—"

' तुझ्याशिवाय कोण आहे मला ? ' या भटजींच्या शब्दानं रघूला भरतं आलं. त्यानं सारी व्यथा गिळली अन् तो म्हणाला, " सागा ना दादा, काय हवं तें करीन. कुठनं हवं तिथनं आणून देईन. तुम्ही काय तें नुसतं सागा."

" सागतों रे – मला खात्री आहे. माझा रघू शहरांत राहिला तरी वाया जायचा नाहीं. इनामदाराच्या अन्नानं तो मुर्दाड बनायचा नाहीं. माझ्या शब्दाबाहेर जायचा नाहीं – नाहीं ना जायचास रघू ? "

" नाहीं. पण काय हवंय तुम्हांला ? "

" अरे, मला काय हवं असणार ? माझ्या गोंवऱ्या गेल्या आतां पण त्याच्यासाठीं जीव तिळतिळ तुटतोय् रे. त्याचा हट्ट आहे. कोण करणार

आपल्या घरांत आतां दिवाळीच्या फराळाचं ? तुझे डोळे हे असे दुखरे ! पण त्याला अजून कळत नाहीं — लहान आहे — रागावूं नकोस त्याच्यावर. त्याच्यासाठीं, त्याच्यापुरतं घेऊन ये जा फराळाचं — पण ब्राह्मणाच्या हॉटेलातनं आण बरं का. तेवढं पाळ माझ्या हयातींत. अन् हें बघ, असा मख्खासारखा बसूं नकोस. लवकर जा अन् दिवसा उजेडीं परत ये. ''

रघू जागचा हलेना. तेव्हां भटजींनीं उसनं अवसान आणलं. 'कार्ट्या' म्हणून त्याच्या अंगावर धावून, एक सणसणीत मुस्कटांत दिली. कुठलं बळ त्यांच्या अंगांत संचारलं होतं कुणास ठाऊक ! त्या थपडेनं रघू कोलमडला — भटजींच्या डोळयांत इंगळ फुलला होता. त्यांनीं पुनः हात वर उचलला. आतां मात्र रघूच्या सहनशक्तीची सीमा झाली. त्यानं भटजींचा हात वरच्या-वर धरला. तरीही भटजींची नशा उतरली नाहीं. तेव्हा रघूला त्याचे दोन्ही हात धरून ते पाठीशीं बांधावे लागले. तशा स्थितीनं त्यानं भटजींना ओढून अंथरुणावर नेलं आणि खूप खेंकसून तो म्हणाला, '' दादा, आतां सांगितल्या-शिवाय तिथनं हललात तर बघा. कोपऱ्यात मोडगाच ठेवतों. '' पण त्याचं तें वाक्य व्हायच्या आधी भटजी अंथरुणावर विकल होऊन पडले होते.

त्या दिवसापासून कृष्णभटजींनीं रघूची भीति घेतली. तो सांगेल त्याप्रमाणं ते निमूटपणें वागू लागले. पण याचा वचपा काढल्याशिवाय ते राहात नसत रघू कुठं बाहेर गेला किंवा शाळेंत गेला कीं तिथं कोण असेल त्याला भेडसावीत. त्याचा प्रथम प्रथम त्रास होऊन बिऱ्हाड सोडावं लागतं कीं काय अशी वेळ आली. पण रघून बाकीच्यांना सांगून ठेवलं, त्यांनीं असं कांहीं केलं कीं, '' रघू आला '' किंवा '' रघूला हाक मारूं का ? '' असं म्हणत चला. तेवढं ऐकलं कीं भटजी मुकाट्यानं आपल्या अंथरुणावर जाऊन पडत अन् कधीं कधीं रडायला लागत.

शाळा सुरू झाल्यानंतर माने शाळेच्या दिवशी रघूच्या घरीं राहून फक्त शनवार-रविवारच्या सुट्टीला आपल्या गांवाकडे जायचा. त्यान भटजींची स्थिति बदललेली पाहिली. रघूच्या विरोधाला न जुमानतां तो दर सोमवारीं येतांना कांहींतरी भाजीपाला शेतावरनं घेऊन यायचा. एक-दोनदा त्यानं मक्याचीं चार-सहा कणसंसुद्धां आणलीं. मक्याला भलताच भाव होता. ओलें कणीस

काढायला शेतकरी तयार नव्हता. तरी मान्यानं हें काम उरकलं होतं. त्याचे आईबाप शेतावर रोजानं राबणारे. त्याला एवढा भाजीपाला अन् हीं कणसं कशीं मिळालीं याची शंका रघूला आली पण मान्यानं दाद लागूं दिली नाहीं.

तीं कणसं पाहिल्यावर भटजींचा क्षीण चेहेरा खुलला. त्यानीं उसळ खायचा हट्ट घेतला. तसा आजार कांहींच नसला तरी त्याची प्रकृति फार अशक्त झाली होती. रघून त्याना दटावलं. मान्याला सुद्धां तें ऐकवेना. त्यानं हलकेच म्हटलं, " सर, कशाला आता धाक घालता ? कसलं पथ्य अन् पाणी — होऊं द्यात त्याच्या मनासारखं तेवढंच त्याना समाधान वाटेल." पण रघूनं त्याचं ऐकलं नाहीं

× × ×

शाळेंत तारांबळ उडाली होती. दोन दिवस गड्याचा पत्ता नव्हता. असेल कुठंतरी किरकोळ रजेवर, देईल मागाहून अर्ज असं समजून, गरीब मुलाना नादारीच्या धाकानं, थोडं चुचकारून दोन दिवस शाळेची कशीबशी व्यवस्था चालली होती. तिसऱ्या दिवशीं गडी आला नाहीं तेव्हा त्याचं घर हुडकायला मुलांना पाठवलं. त्यानीं परत येऊन सांगितलं, तो भरती झाला फौजेंत — आतां येणार नाही. कांही न कळवता सवरता गेला म्हणून हेड्मास्तर चरफडले. दुसऱ्या गड्याची शोधाशोध सुरू झाली. दोन-चार माणसं येऊन गेलीं. हेड्मास्तरानी दहाच्याऐवजी एकदम पंधरा रुपये देण्याची तयारी दाखवली तरी ते सारे परत गेले. त्यातल्या एकानं त्यांना ऐकवलं — " पंद्रा रुपड्यांत कोन ईल ? रानांत रुपाया रोज मिळतो. अड्ड्यावर बी मोटरीचं पासिंजर डागाला चार-चार आन देत्यात — पुना आपल्या मनात ईल तवा काम हतल्या बादल्या कामाला आट आने रोजानं कोन येतो बगूं या — " आणखी दोन म्हातारे येऊन गेले. त्यांनीं वेगळंच सुनावलं. रानात कामाला गेलों तर पोटाला दाणादुणा मिळतो. तुमच्या नोटाचा काय चुट्टा करायचा हाय ? " पंधरा दिवसांत शाळेचा गोठा व्हायची पाळी आली. त्यातून सकाळ—संध्याकाळी हेड्मास्तराच्या घरीं कांहीं पडलं अडलं — म्हणजे नियामित काम व्हायचं तें अजिबात थांबलं. त्यामुळं तर गड्याची निकड फार भासूं लागली

छे ! या युद्धानं नसत्या माणसांना फार भाव आला ! शाळेचं सार्वजनिक कार्य. शिक्षणदानाचं पवित्र कार्य – पण त्याची बूज कोणाला राहिली नाहीं. हेड्मास्तर तत्त्वज्ञान ऐकवीत होते. खरं म्हणजे ते जिकिरीला आले होते. त्यानीं आपल्या परीनं शक्य होतीं तीं सारी आमिषं शिक्षक–विद्यार्थ्यांच्या करवीं जाहीर केलीं होतीं. त्यानं कुणाला प्रलोभन वाटेना. अखेरीं नाइलाजानं पस्तीस रुपयावर एकजण तयार झाला. त्याला दम्याची व्यथा होती; तरी 'साळचं' काम म्हणून तो निभावून नेणार होता. त्यानं अट घातली – 'साळच्या भाईर आपुन काय बी काम करनार न्हाई. कुनाच्या घरला जानार न्हाई. सुर्गीच्या दिवसात येळ झाला तरी त्याबद्दली पगार कापायचा न्हाई.' त्याच्या साऱ्या अटी कबूल करून शाळेचा गाडा चालू करण्यात आला.

दिवसभर शाळेतलं काम करून वह्यांचीं ओझीं वाहून नेणाऱ्या शिक्षकांना या बनायानं हतबुद्ध केलं सहीच्या जागीं अंगठा उठवणारा हा दमेकरी पस्तीस रुपये घेणार ! होय, पस्तीस रुपये. पहिल्या तारखेला पावतीच्या तिकिटाचा एक आणा मागितला तर उसळून म्हणाला, " त्ये काय ठाव न्हाई. नगद पस्तीस हातात पडाया हुवती. त्यो आना बिना तुमचा तुमी बगा कुटनं घ्याचा त्यो – मजीकड मिळायचा न्हाई ! "

शिक्षकाच्या खोलींत कुजबूज सुरू झाली. गड्याला दहा रुपये होते तिथं पस्तीस झाले – आपलं काय ? बाकीच्या खात्यातून महागाई मिळूं लागली. मूळ पगार तर सगळीकडेच शिक्षकाच्या दिढी-दुपटीनं वाढलेले – आपणच या अर्धपोटी पगारावर किती दिवस खितपत रहायचं ? पण आपण सुशिक्षित माणसं. विद्यादानाच्या कार्यात गुंतलेली. नवी शिक्षण-संस्था – एकदम काहीं करून घोटाळा तर व्हायचा नाहीं ? काय करावं ? कसं करावं ? त्याचा विचार चालू होता. शिक्षणानं त्यांना सुसंस्कृत बनवलं होतं. अविचार' घाई करणं त्यांच्या रक्तात नव्हतं. खरं म्हणजे जेवढे खरेखुरे अडलेले होते तेवढेच शाळेंत राहिले होते. चाळिशी उलटायला आलेले, संसाराचा न आवरणारा पसारा मांडलेले, गावांत सारी पाळंमुळं रुतलेले, युद्धाच्या धकाधकींतल्या आठ-आठ, नऊ-नऊ तासाच्या शारीरिक कष्टाच्या नोकऱ्या झेपण्याच्या पलीकडे गेलेले, जुन्या भाषेंत सांगायचं तर 'सटवाईला नाहीं नवरा, म्हसोबाला नाहीं बायको' अशा नात्यानं शाळा सुटणं शक्य नाहीं

तेवढेच शाळेंत राहिले होते. त्यामुळं हेड्मास्तरांनीं शिक्षकांच्या खोलींत काय चालतं याची कधीं चौकशीसुद्धां केली नाही. पण वातावरण धुमसत होतं.

त्या सगळ्यांत तरुण रघू. पण उत्साहाच्या बाबतींत तो म्हाताऱ्याहून म्हातारा झालेला होता. त्यानं या कुजबुजींत कधीं फारसा भागही घेतला नाहीं. शाळेंतलं काम कसंबस उरकावं अन् घराची वाट धरावी .हा क्रम चाललेला. अशा कुंद वातावरणांत दिवसांमागून दिवस चालले होते.

कुळकर्णी मास्तर म्हणजे शाळेंतल्या शिक्षकांचा अर्क ! नवीन शिक्षकांतला कुणी सुटा-बुटात आला कीं, त्याची हजिरी घेऊन त्याला माणसाळून टाकायचं— शिक्षकांच्या कळपात साजेलशी रहाणी पत्करायला लावायचं या कामांत त्याचा हातखंडा — अशी त्यानीं नोकरीनिमित्त पाहिलेल्या चारी शाळात त्यांची कीर्ति होती. त्या कुळकर्णी मास्तराचा अवतार पाहून मुलंच काय, हेड्मास्तरसुद्धा हादरले. नऊवारी धोतर—उपरणं अशा थाटांत नेहमीं येणारे कुळकर्णी मास्तर पायजमा नेसून शाळेंत आले. मधल्या सुट्टीत हेड्मास्तरानीं शिक्षकाच्या खोलींत अचानक प्रवेश केला. " काय मंडळी ? कसं काय ? " त्यानीं सहजीं विचारण्याचा देखावा केला.

" हं—हं—हं—" खोटं हसून सगळ्यांनीं साद केली.

थोडा वेळ पुनः शांतता होती शेवटीं हेड्मास्तरानींच तोंड उघडलं— " आपली सगळ्यांचीच ओढाताण होते हें मला दिसतंय्. पण शाळेचा विचार करायला हवा. कुळकर्णी, तुम्ही तरी असं कांहीं विपरीत कराल असं वाटलं नव्हतं—"

" कशाबद्दल म्हणतां आहांत आपण ? " कुळकर्ण्यांनीं मख्खपणें विचारलं.

" अहो, हें काय विचारणं ?—असा पोरा-सोरासारखा लेंगा घालून शाळेंत आलांत. हें बरं दिसत नाहीं. निदान या वयांत तरी शोभत नाहीं—"

" माझा पोशाख ही खाजगी बाब आहे—"

" असं म्हणून कसं चालेल ? शाळेंत तुम्ही शिक्षक म्हणून वावरता—"

" हो. मी बाकावर मुलांच्या बरोबर बसत नाहीं. खुर्चीवर बसूनच

शिकवलं आजसुद्धां. अन् लेंगा घातला म्हणून कांहीं एलिझाबेथला बर्लिनच्या गादीवर बसवलं नाहीं की शिवाजीकडून अमेरिकेचा शोध लावला नाही — "

" असं वाकड्यांत शिरूं नका कुळकर्णी माझं म्हणणं तुम्हांला कळलं आहे. उगीच वेड पांघरण्यात काय अर्थ ? "

" आतां पांघरायला तेवढंच उरलं आहे. तेंसुद्धा नको असेल तर स्पष्टच बोलून दाखवू का ? "

" वा ! बोला ना. आपण सगळे सहकारी; एकमेकांच्या अडचणी नाहींत ओळखायच्या तर दुसरं कोण येईल मदतीला ? "

" ठीक आहे ! तुम्ही येत असला मदतीला तर त्यात आनंदच आहे. माझा सगळा उघडा व्यवहार. या जोश्याना विचारा. मी आडपडदा पाळणारा मनुष्य नाहीं. त्याचं वागणं आवडलं नाहीं त्या वेळीं त्याना स्पष्टपणे तसं सांगितलं. आतांही हवं तर तुम्हाला सांगतों—"

" सांगा ना—"

" माझ्या लेंग्यावर तुमचा रोख आहे. मीं आयुष्यात कधीं लेंगा वापरला नव्हता — कॉलेजांत एक वर्ष होतों तेव्हासुद्धा. आज काय मला हौस आली म्हणून लेंगा नेसलों कीं पोरटकी करायचे दिवस आहेत म्हणून नेसलों ? काय वाटतं आहे तुम्हांला ? पंचवीस रुपये देऊनसुद्धा उघड्या बाजारात धोतर दृष्टीला पडत नाहीं. आडवाटेनं घ्यायची ऐपत नाहीं. तुम्ही काय पगार देता तें तुम्हाला ठाऊक आहेच. तुम्ही धोतरं आणून द्या; मी वापरायला तयार आहें."

" माझी काय गिरणी आहे कीं कापडाचं दुकान आहे ? "

" अन् माझं तरी कुठं आहे ? "

" पण हें बरं दिसत नाहीं— "

" तें मला ठाऊक आहे. तरीसुद्धा तें मी करतों. या लेंग्याच्या जोडीला-देखील वीस रुपये खर्च आला. हा खड्डा कसा भरून काढायचा तें सांगा ? तुम्हांला शिक्षकाचा दर्जा रहायला पाहिजे. तो त्यानं कसा राखायचा हें मात्र सांगायला तुम्ही तयार नाहीं. पण मी विचारणार आहें. एकदम वीस रुपये

या लाज राखणाऱ्या लेंग्यांना दिल्यानंतर महिनाभर – दर्जा सोडाच नुसतं शरीर पोषण कसं करायचं तेवढं आम्हाला शिकवा. गडी निघून गेला; दुसरा पस्तीस रुपयावर नेमलात, तेव्हां आमचा काहीं विचार केलात ? "

" हें काय – काय बोलताय् कुळकर्णी ? अडाणी माणसं तीं; त्याना या वेळेला पैसा दिसतो आहे. आपला उपाय नाहीं म्हणून तें पत्करावं लागत. पण आपण सुशिक्षित माणसं. पायापुरतं पाहून भागणार नाहीं. संस्था जगली तर आपण आहोंत. आपल्यासाठीं तरी संस्था आधीं जगवली पाहिजे. "

" हें तुम्ही आम्हाला सांगणार हें ठाऊकच होतं आजपर्यंत कधीं संस्थेची घटना काय ? तिचं नियमन कोण करतं ? हें कधीं सांगण्याची तुम्हाला गरज वाटली नाही. माणूस नकोसा झाला कीं संस्थेचं नांव सांगायचं: हवा असला कीं, संस्थेचं नांव न काढता मुदत वाढवून मिळायची. हे काय आम्हाला कळत नाहीं असं तुम्हांला वाटलं ? "

" छे ! छे ! भलतंच काहीं तरी ! तुम्हीं कांहीं तरी गैरसमज करून घेतला आहे. अहो संस्थेची लफडीं म्हणजे साधी का बाब आहे ? आपल्या कामाखालीं बेजार होणाऱ्या तुम्हा शिक्षकाना उगीच आणखी संस्थेची विवंचना नको म्हणून तुम्हाला त्रास दिला नाहीं. माझं मला ठाऊक – एक तारखेला पगाराची भरती करताना इकडची टोपी तिकडं कशी करावी लागते ती. "

" यात काहींच नवीन नाहीं. पण आम्हाला कळत नाहीं कीं, इतक्या अडचणींचा बोजा तुम्ही एकट्यानेच उचलायचा हट्ट कां धरावा ? आहेत त्या साऱ्या अडचणीच आहेत अन् त्यात फायदा कसलाच नाहीं हें उघड आहे असं तुम्हाला वाटतं तर संस्था चालवायचा भार चारजणानीं – सगळ्यांनींच का वाटून घेऊ नये ? संस्था अशी मोजक्या अन् ठरलेल्या लोकाच्या हातींच का असावी ? त्याबद्दल शंका का येऊं नये ? "

" हा चालू मुद्दा नाहीं कुळकर्णी. संस्थेचं काम घटनेप्रमाणं चाललं आहे. अन् त्यांत काहीं चुकलं नाहीं तोंपर्यंत मी इतरांना लुडबुडूं देणार नाहीं. "

रघूला एकदम वाचा फुटली, " आतां तुम्ही वळणावर आलांत. जोंपर्यंत

तुम्ही नियमांवर बोट ठेवून काम चालवतां तोंपर्यंत अडचणी तेवढ्या आम्हाला कशाला सागता ? त्या नियमाप्रमाण ज्याच्या त्यानीं बघून घ्याव्यात. ''

'' त्या बघून घ्यायला मी समर्थ आहें. मी नियमाप्रमाणंच सागतों. असलीं थेरं माझ्या शाळेंत चालणार नाहींत. मला असले शिक्षक नकोत—''

'' मग नियमाप्रमाणं बाकी सगळ्या ठिकाणी मिळतात तसे पगार अन् महागाईभत्ता द्या म्हणजे वाढलेल्या पगारातून तुम्हाला हवेत तसले कपडे करून येता येईल—'' रघूनं उत्तर दिलं.

'' तें काय तुमचं म्हणणं असेल तें लेखी द्या—''

'' तुमचंही पोशाखाचं सर्क्युलर लेखी येऊं द्या—''

—आणि लेखी कांहींच झालं नाहीं. हेड्मास्तर निघून गेल्यावर कुळकर्ण्यांनीं रघूला समजावलं, '' असं एकेरीवर यायला नको होतं जोशी. त्यांचीं बिंगं आम्हाला ठाऊक आहेत तशीच आमची शेंडी त्याच्या हातात आहे. त्याला ठाऊक आहे आपण कोणी शाळा सोडून जाऊं शकत नाहीं. जाणारे वेळ येताच निघून गेले. आपण दुसरीकडे जाण्यांत अगतिक आहोंत म्हणून इथं खितपतों आहोंत. अन् आज त्याला दुसरीं माणसं मिळणार नाहींत हें ठाऊक आहे म्हणून तो सगळं ऐकून घेत होता पण वेळ येताच हातांत नारळ – नारळसुद्धां नाहीं, नुसतं कागदाचं चिटोरं ठेवून मोकळा होईल—''

शाळेंतलं हें वादळ जसं उठल तसंच शांत झालं. दोन महिन्यानीं रघूही लेंगे नेसून शाळेंत येऊं लागला. त्याला कुणीं कांहीं विचारल नाहीं. सारं आहे तसं चालणार. तेंच व्यवस्थित समजायचं अशा वातावरणात दिवस जात होते.

तेवढ्यांत गावांतल्या दुसऱ्या मोठ्या शाळेंत गडबड सुरू झाली. कधीं नव्हे ते दोन शाळातले शिक्षक एकत्र आले. दोघानीं एकजुटीनं कांहीं तरी मार्ग काढून पगारवाढ, निदान महागाईभत्ता पदरात पाडून घेतला पाहिजे अशी भाषा निघूं लागली. अनेकाचीं जेवणं एक वेळेवर आलीं. श्रीमत व्यापाऱ्या-खेरीज कोणी शिकवणीच्या वाटेला जाईना. अन् या व्यापाऱ्याच्या मुलाच्या शिकवण्या सुरू व्हायच्या त्या फक्त परीक्षेच्या आधीं महिनाभर. कोणाकडे पेपर आहेत याचा पुरता कानोसा लागल्यानंतर तें अळवावरचं पाणी –

त्यातही मखलाशी करून छपाईचा वाढता खर्च वांचवायसाठीं साऱ्या जिल्ह्याच्या हेड्मास्तरांनीं एकत्र जमून एकच सर्वसाधारण पत्रिका काढायची. जास्तींत जास्त पेपर हेड्मास्तरानीं स्वतः काढायचे अशी हूल उठली.

अखेरीस सभेवर सभा बोलावून, चारचारदा विचार करून गांवातल्या पंचवीस शिक्षकांनीं मोठा महत्त्वाचा निर्णय घेतला. कांहींही घाईनं, अविचारानं करायचं नाहीं हा सुशिक्षित पांढरपेशाचा बाणा पाळून, त्यानीं ठरवलं — प्रथम आपल्या संस्थेला परिस्थितीची विस्तृत जाणीव देऊन, महागाईभत्ता तरी दिल्याशिवाय शिक्षकाला जगणं अशक्य होईल असं नम्र निवेदन पाठवून त्याच्या उत्तराची महिनाभर वाट पहायची.

रघूनं आपल्या सहकाऱ्यांचं निवेदन तयार केलं. कुळकर्णी मास्तरांच्या घरीं सगळेजण गुपचूप जमले. रघूचं निवेदन वाचून साऱ्यानीं असमाधानानं माना हलवल्या. फारच जहाल — असं जिव्हारी लिहून कसं भागेल ? आपल्याला फक्त विनंती करायची आहे. तरणं रक्त फार लवकर तापतं, त्या निवेदनाचा कांहीं उपयोग न होता, त्रास होईल असं साऱ्याचं मत पडलं. रघूनं परिश्रमानं तयार केलेले चारी कागद टरकावून दिले.

कुळकर्णी मास्तरानीं रघूच्या पाठीवरून हात फिरवून त्याला शांत करायचा प्रयत्न केला. त्यानीं स्वतः दुसऱ्या दिवशीं निवेदनाचा कच्चा मसुदा तयार करायचं आश्वासन दिलं. लाचारीनं, अजीजीनं भरलेलं तें निवेदन सगळ्यानीं पसंत केलं. कुळकर्णी मास्तरानीं रघूला मोठेपणा देऊन सांगितलं, " जोशी मास्तर, तुम्हीं पहिल्या निवेदनासाठीं फार कष्ट केले होते. तेव्हां हें निवेदन तुमच्या हातूनच जाऊं द्या. तुमचं अक्षरही मोठं वळणदार आहे— " रघूच्या मनात नव्हतं तरी भिडेला पडून त्यानं या निवेदनाची पक्की प्रत आपल्या हस्ताक्षरांत तयार केली.

चार दिवसांनीं हेड्मास्तरांनीं रघूला बोलावून घेतलं. " जोशी, तुम्ही हे उद्योग कशाला केलेत ? तुम्हांला एवढं कसं समजत नाहीं ? "

" पण निवेदन सगळ्या शिक्षकांचं आहे— "

" अशी तुमची समजूत आहे. तुमच्या आधीं मीं प्रत्येकाला बोलावलं होतं. त्यांनीं काय सांगितलं ठाऊक आहे ? हा सगळा तुमचा खटाटोप.

तुम्ही काहीं तरी भयंकर लिहून सह्या गोळा करीत होता. तेव्हां तें दुरुस्त करायला लावून, तुमच्या समाधानाकरतां बाकीच्यांनीं सह्या केल्या. पण त्याचं स्वतःचं यांत कांहीं नाहीं. त्यांचं असलं मागणं नाहीं. संस्थेचीं जुनीं माणसं आहेत तीं. त्याचं संस्थेवर प्रेम आहे— ”

“ पण त्यांच्या सह्या आहेत. ते काहीं अज्ञानी – अडाणी नाहींत. ”

“ होय ना ! अज्ञान नाहींत म्हणून तर तुमच्या समाधानासाठीं त्यानीं सह्या केल्या असल्या तरी मला खाजगी भेटून सांगितलं कीं त्या सह्या परत घेतल्या असं समजा म्हणून.”

“ माझी सही मीं परत घेतली नाहीं.”

“ आतांच काहीं सांगू नका. जा, नीट विचार करा. तुमचंच नुकसान होईल. चार दिवसांनीं सावकाश मला भेटा. ”

रघू संतापून गेला. शिक्षकाच्या खोलींत तो कोणाशींही बोलला नाही. त्याच धुसपुसणं चालल होत. कोणीं चौकशी केली नाहीं. दुसऱ्या दिवशीं त्यानंच सगळा राग गिळून कुळकर्णी मास्तरांना विचारलं, “ हा काय प्रकार आहे ? अम्ह मला तोंडघशी का दिलंत ? ”

कुळकर्णी मास्तरांनी संवयीप्रमाणें त्याच्या पाठीवरनं दात फिरवला, अन् हलकेच सांगितलं, “ जोशी तुम्हाला अजून कस कळत नाहीं ? तुम्ही त्याचं प्रत्येक वाक्य खरं समजून का चालता ? हा सारा फोडाफोडीचा खेळ आहे. त्यात हे गृहस्थ तरबेज आहेत. तुम्ही भलतंच समजूं नका —”

“ म्हणजे, निवेदनावरच्या तुमच्या सह्या कायम आहेत ना ? ”

“ अं ? म्हणजे त्याचं असं आहे – केलेली सही मागं का घेतां येते ? —पण आम्हीं आपलं सांगितलं, संस्था विचार करणार असली तर निवेदन केलंच नाहीं असं समजा. संस्थेला मोठेपणा हवा असला तर तो द्यायला काय हरकत आहे ? ”

“ पण संस्था विचार करणार आहे का ? ”

“ निवेदन मागं घेतलं तर सभा बोलावूं असं ते म्हणाले.”

“ निवेदन मागं घेतल्यावर सभा कशासाठीं ? बोलावणार याची खात्री काय ? कुणावर विश्वास ठेवायचा ? ”

" विश्वासाशिवाय काय होणार ? अन् यात लेखी कांहींच नाहीं. संस्थेनं विचार केला तर निवेदन परत घेतलं म्हणायचं – नाहीतर आहेच तें—"

" मला हें काहीं कळत नाहीं—"

" तुम्ही घाई करूं नका. सर्व कांहीं व्यवस्थित होईल— "

× × ×

थंडीच्या दिवसात एका रात्रीं, कांहीं कल्पना नसतांना गातरणें झोपेतच कृष्णंभटजींच अवसान झालं. एकुलत्या एक चादरींत कुडकुडायला लागलं म्हणून रघू जागा झाला. आपल्याला इतका थंडी वाजते तर वडलांचं पांघरूण नीट पहावं म्हणून तो त्यांच्या अंथरुणापाशीं गेला. पांघरूण सरळ करता करतां त्याचा हात भटजींच्या अंगाला लागला. त्या थंड स्पर्शानं तो चरकला. अंग उघडं पडलं म्हणून असं असेल अशी त्यानं समजूत करून घेतली. विटकरानं थोडा वेळ अंग शेकलं. चांगल्या तापलेल्या विटकराच्या स्पर्शानं-सुद्धां भटजी हूं कीं चूं करीनात ! तो गोंधळला. त्या दिवशीं हाक मारायला मानेसुद्धां जवळ नव्हता. तशीच घराला कडी लावून तो बाहेर पडला. एकाला डॉक्टराकडे पिटाळला. दुसऱ्या दोघा तिघाना घेऊन तो घरीं आला – डॉक्टरानीं दोन तास होऊन गेलेत म्हणून सांगितलं.

समाधानाला आलेल्या माणसांशीं रघू इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत होता. वडलांचा विषय कोणीं काढलाच तरी तो पुढं चालवायचा नाहीं अशी त्याची वृत्ति होती. कुणी म्हणालं, " कसेही असले तरी डोक्यावर छत्र होतं– तें आता गेलं " तरी रघू हुंकार द्यायचा. " बिचाऱ्याचे हाल झाले. आता सुटका झाली तेंच बरं – अन् तीहीं तुम्हाला त्रास न होता " असं कुणी म्हटलं तर त्यालाहि रघू ' हो ' म्हणून गप्प बसायचा. इतर विषय कुणी काढलेच तर मात्र आपले वडील होते, ते दोन दिवसांपूर्वी गेले हें सारं विसरून तो मनःपूर्वक बोलायला लागायचा. सुतकी चेहेऱ्याच्या लाचार वृत्तीच्या देखाव्यासाठीं आलेल्याचा अपेक्षाभंग व्हायचा. काहींचं तोच उलट समाधान करायचा.

पुष्कळांना आश्चर्य वाटायचं. रघूजवळ शिवाशिवीचं बंधन नव्हतं. ‘चहा घेणार का’ म्हणून आलेल्यांना तो विचारायचा. कुणी स्पष्टपणें नको म्हणाला नाहीं तर स्वतः चहा करून आणायचा. आलेले संकोचून जायचे. त्यावरही रघू सरळ सांगायचा – ‘चहा करायला माझ्याशिवाय कोण आहे ? तुम्हांला चालत नसला तर माझा आग्रह नाहीं.’ अन् तो स्वतः चहा प्यायचा.

वडलांच्या मृत्यूनं काय वाटलं तें त्यानं कुणालाच दिसूं दिलं नाहीं. त्याला कांहीं वाटलं कीं नाहीं हें त्याचं त्यालासुद्धा कळत नव्हतं. साऱ्या आयुष्याचा चित्रपट त्याच्या डोळ्यांसमोर होता. पण भावनेनं वाहून जाणं हें त्याच्या पिंडांत नव्हतं. आलेल्या प्रसंगाला—कोणत्याहि प्रसंगाला अनपेक्षित मानायच्या तो पलीकडे गेला होता. त्याचं कोणतंच वेळापत्रक आयुष्यात जमलं नव्हतं, अन् तें जमलं नव्हतं म्हणून खंत मानावी अशी विपरीत अवस्थाही कधीं झाली नव्हती. यश आणि अपयश दोन्ही रूढार्थांनीं त्याला स्पर्शून गेलीं नव्हतीं. यशाच्या वेळीं यापेक्षां अधिक यश काय असतं याची जाणीव शिल्लक राहिली; अपयशाच्या वेळेला यापेक्षां अधिक अपयश काय असतं तें डोळ्यापुढं यायला चुकलं नाहीं. रघू स्वतःलाच एक कोडं होऊन बसला; पण हें सुद्धां खरं नव्हे. त्याला कसलंही कोडं पडलं नाहीं. कांहीं तरी भावनेच्या, विचाराच्या, अनुभवाच्या पलीकडची असली कांहीं अवस्था असली तर तींत रघू होता—

सगळे व्यवहार पहिल्यासारखे चालूं झाले. वेळच्या वेळीं शाळेंत जाव, संध्याकाळीं घरीं आल्यावर त्या मुक्तद्वार ठिकाणीं येतील त्या विद्यार्थ्यांना हवं तें शिकवावं. दोन वेळेला जेवावं; झोपावं असा रघूचा क्रम होता.

पंधरा दिवसांनीं त्याच्या ध्यानांत आलं, मान्याचा पत्ता नाहीं. वडील गेल्यापासून दुसऱ्या माणसाची गरज संपली होती म्हणून म्हणा, कीं इतर कारणानं म्हणा, रघू त्याला जवळ जवळ विसरला होता. जसा अचानक विसरला तसाच तो त्याच्या आठवणीनं अचानक बेचैन झाला. त्यानं चार दिवस विश्रांतीसाठीं म्हणून रजा काढली अन् तो बाहेर पडला.

मान्याच्या खेडेगांवाचं नांव त्याला ऐकून ठाऊक होतं. जवळच आहे हेंही माहीत होतं. रस्ता विचारीत विचारीत तो वाट चालला. तब्बल दोन

तास चालल्यावर, सहा मैल दूर असलेल्या गावांत तो पोंचला. त्या अंतराची जाणीव मनात राहिली. रघूच्या घरीं रहायच्या आधीं माने दररोज इतक्या लांब जाऊन येत असे. रघूच्या घरीं आल्यावरसुद्धां आठवड्यात कमींत कमी दोन फेऱ्या मारून तो चार दिवसाच्या भाकरी घेऊन यायचा. ह्या कष्टाला, ह्या श्रमांना आपण कधीं टिकलों असतों का ? असं रघूच्या मनांत राहून राहून यायला लागलं.

मान्याचं घर विचारून तो कंटाळला. 'कंचा मान्या' म्हणून प्रत्येकानं हटकायचं अन् रघूनं 'शाळेंत येतो तो' असं कांही तरी सांगून पहायचं. शेवटीं त्या शभर-सवाशें घरांच्या खेड्यांतलीं पंचवीस-तीस घरं टिपूनही शोध लागत नाहीं म्हणून परताव काय अशा विचारात तो होता. पण पाय कुरकुरत होते. आणखी थोडा वेळ प्रयत्न करायचं त्यानं ठरवलं. त्याच्या मनांत नसती शंका आली. पंधरा दिवस मुलगा आला नाहीं; आजारी पडून कांहीं बरंवाईट तर झालं नाहीं ? अन् तें सांगायचं टाळण्यासाठीं त्याचं घर दाखवण्याच्या बाबतची ही युक्ति तर नसेल ना ? – कुणी सांगावं ?

शेवटीं एकानं, 'हा, त्यो म्हाताऱ्या शिप्यांचा ल्योक असल' म्हणून एका दोनखणी छप्परवजा पडक्याकडं बोट दाखवलं. रघूनं त्या पडक्यात भीतभीतच चौकशी केली. शिप्यां म्हातारा अंगाखाली एक पोत्याचं पटकुर टाकून पडला होता. त्यानं पावण्याला आत बोलावलं—

" या. कुनीकडं येनं केलसा ? "

" मी शाळेंत असतों. तिथनं आलों— "

" हां – आतां आलं ध्येनांत तुमी त्येचं मास्तर है जनूं " म्हाताऱ्यानं आपल्या बायकोला हाक मारून चूळ भरायला पाणी आणायला सांगितलं. " त्ये घोंगडं त्येवडं टाक बसाया. आन् बामनाच्यातल्या तांब्या आन कुनाकडन— "

" कशाला ? तुमच्या इथलं द्या कीं पाणी— "

" तुमास्नी चालतं न्हवं ? "

" चालतं कीं – त्याला काय झालंय ? "

" झालया काय ? चांगलं केळींतलं गार पानी है. पर कुनाला चालत न्हाई – आभी कसं द्येवावं. "

रघूनं चूळ भरून घटाघटा तांब्या घशांत ओतला. हुश्श करून तो त्या मळकट, फाटक्या घोंगड्यावर शक्य तितक्या मोकळेपणानं बसला.

" काय कामगिरी काडली हुती मास्तर ? काई शेरा–अडशिरीपाई आला असला तर पैसं ठिवून जावा. कुनाकडनं पोस्तं करीन. तुमास्नी त्ये जमायचं न्हाइ कमिटीच्या अन् रासनाच्या लोकांतनं न्याला. "

" तसं कांहीं नाहीं. पण तुमचा – तुमचा मुलगा— ? "

" लक्शा व्हय ? त्येनं साळा सोडली आतां— "

" पण अशी मधेंच ? परीक्षा तोंडाला आली असतांना ? "

" त्ये सारं खरं मास्तर. पर आपल्या हातांतलं का है ? आमास्नी काय त्यो शिकाय नगो हुता ? पर ऐकना त्यो – काईबी ऐकना. "

" पण तो आहे तरी कुठं ? मी सांगतों त्याला समजून. "

" कुनाला सांगनार मास्तर आतां ? लक्शा गेला – त्येच आईनं डोळं भिजवलं. पर त्येनं ऐकलं न्हाई. "

" पण कुठं गेलाय् तो ?

" त्यो घरांतनं ग्येला. परवां कागुद आला. भरती झाला म्हनून. आतां कुटं खडकीला हाय. पैसं पाटवीन म्हनून लिवलया एक तारकला. "

" पण तुम्हीं कसं जाऊन दिलंत ? "

" आमीं काय करायचं ? गड्यासारका गडी. त्येला काय बांदून ठिवायचा. त्येच्या मनानं घ्येतलं. त्यो भरतींत ग्येला. "

" पण मलासुद्धां कांहीं पत्ता लागून दिला नाहीं. "

" म्हनत हुता एक डाव मास्तरास्नीं इचारायचं. पर तुमच्या मागं तुमचं हैच कीं. तसाच न्हाइला अन् हातनं पाटलाला सांगून ग्येला. "

" एवढं काय त्याच्यावर ओझं पडलं होतं ? "

" कसलं वझं न् कसलं काय ! आमी आपलं कसं तरी चालवत हुतों— त्येला त्ये पटना. गांवचीं चार पोरं फलटनींत गेलीं. त्यांच्या मन्याडरी याला लागल्या तवाधरनं त्येनं भरती हुयाचं घ्येतलं हुतं. "

रघूला अजून उमज पडेना. मिलिटरीच्या वाढत्या व्यापांत कारकुनी पेशाच्या नोकऱ्यांवर तुटून पडलेल्या सुशिक्षितांचं मन त्याला कळलं होतं. पण

त्यांत धोका नव्हता. जिवाचा धोका पत्करून युद्धाच्या खाईत हंसत जायला जाणते लोक कां तयार होतात ? त्यांना कसलं आकर्षण वाटत आहे ? युद्ध-आघाडीची रेवडी उडवणारी चर्चा त्यानं ठिकठिकाणीं ऐकली होती. मान्यानं बेचाळीसचा सत्याग्रह चालू झाला तेव्हां केवढी छाती फुगवली होती— वयाला न शोभणारी चमक बोलण्यात दाखवली होती तें त्याला ठाऊक होतं. पण तोच भरती झाला—

लक्शाच्या म्हातारीनं हुडकून हुडकून दोन रताळीं काढलीं. त्यांतला किडलेला भाग खुर्प्यानं तासला. अन् तीं रघूच्या पुढयांत टाकलीं. “ घ्या मास्तर, हतं ‘ चा ’ कुटनं मिळायला. घ्या गरिबाचा मेवा.” रघूनं रताळी हातांत घेऊन त्याच्याशीं चाळा सुरू केला. त्याला जें बोलायचं होतं तें कसं बोलावं हेंच समजेना त्यानं कसंबसं विचारलं—

“ पण लक्ष्मण कां गेला भरती होऊन ? मला अजून काहीं कळत नाहीं. ”

“ द्येव तुमचं भलं करील. तुमास्नी नगो कळाया ! ”

“ असं का ? सागा ना मला. ”

“ काय सांगायचं मास्तर ? मी ह्यो असा दम लागून पडतु वरचीवर; मग कामाला जाया येत न्हाई. खाडा पडल्यावर काय करायचं ? म्हातारी एकली कुटं कुटं बगनार ? त्येच्या पुरती भाकर द्येत हुतो. आमी आपली कनसं, रताळं खाऊन येळ काडीत हुतों – त्येच्यावरनं त्यो झिटीला आला. आज खाया मिळना तर शिकून उद्यांला काय हुयाचं त्यें कशाला होवं म्हनून फलटनींत भरती हुयाचं म्हनत हुता. सा महिन त्येला वढून धरला. पर फुडं निबना. त्यो आमच्या आराच्या भाईर ग्येला. तुमी भुकं मरताय – मी न्हाइ शिकायचा म्हून हट्टून बसला. ऐकलं न्हाई त्येनं कुनाचं—”

“ अन् हीं रताळीं ? असलीं रताळीं खातां तुम्ही रोज ? ”

“ व्हय – तर काय ? पोटांत आग पडल्यावर काय करायचं ? ”

“ तीं बी मिळत्याल तवा. एकेक डाव रताळ्यावर पर उडी पडतीया – गरीबाच्या वाटनीला उरत न्हाईती. तांब्याभर पानी पिऊन भूक माराया लागती ” म्हातारीनं कळवळून म्हटलं.

" खरं आहे ! नाहींतर तो पलटणींत जाणारा नव्हे. सत्याग्रहाच्या गोष्टी बोलत होता. सरकारी कामांत तो शिरायचा नाहीं."

" अन् कोन ल्योक सुकानं गेलाया ? चूल पेटनाशी झाल्यावर वनवन फिरून भरतीच्या कचिरींत जायाचं. कुनाला मरान हवया आपल्या हातानं—"

" सारे गेले ते असेच ? "

" कुना ल्येकाला ठाव हाय ? पर ह्या गांवांत पाटलाला योकबी गडी मिळाला न्हवता भरती दावाया वर्साखालीं. आतां पांचजन ग्येल्याती. आपल्या पायानं कचिरींत हजर झालीं. "

" न हून सागतील कुनाला ? तारकच्या तारकला मन्याडर येतीया. अंगाला लावाया लंगुटी न्हवती ततं कार्डावरची पंजी बोलावनं करून पाटील येतोया, साकार आल्यावर हुवी का म्हून इचराया तराळ घराला धाडतुया— भरती झाल्याबिगार कुटलं हे सारं—"

रघूनं ' भूक नाहीं ' म्हणून रताळीं खालीं ठेवलीं. म्हाताऱ्यानं अगदीं अजीजीनं पायाला हात लावला तेव्हा एक तुकडा मोडून त्यानं तोंडांत घातला. मघाचे सारे श्रम विसरून तो परत निघाला. सहा मैलांचं अंतर त्यानं केव्हां तोडलं हें सुद्धा त्याला कळलं नाहीं. उरलेली रजा रद्द करून तो दुसऱ्या दिवशीं शाळेंत हजर झाला.

अन्नासाठीं – अन्नासाठीं !

× × ×

शाळेंतले अभ्यास संपत आलेच होते. रघूनं उरलेले भाग झटकन् संपवून टाकले अन् त्याबरोबरच घरचा संध्याकाळचा वर्गही बंद करून टाकला. त्याचं संध्याकाळचं फिरणंही बंद झालं. त्या रिकाम्या वेळांत त्यानं घरच्या सामानाची उलथापालथ सुरू केली. वडलांच्या पोथ्या आणि पुस्तकं त्यानं प्रथमच धुंडाळली. त्यांतील कांहीं शाळेंतल्या सहकाऱ्यांना, कांहीं घरवाल्याला आणि उरलेलीं वाण्याला रद्दीवारी देऊन टाकली. तीं द्यायच्या आधीं त्यानं नेहमींच्या परिचयाच्या भारत–भागवत आणि इतर धार्मिक पोथ्या पुरत्या उलगडूनसुद्धां पाहिल्या नाहींत. पुस्तकं बहुतेक त्याचींच होतीं. तीं मात्र त्यानं जुन्या आपुलकीनं चाळलीं.

पुस्तका-पोथ्यांच्या मागोमाग जुने कपडे, डबे, फुटकीं भांडीं – साऱ्यांचा समाचार घेऊन रघूनं त्यांना दुकानाची किंवा बाहेरची वाट दाखवली. 'मास्तर, काय बेत आहे ?' घरवाल्यानं हा प्रकार पाहून विचारलं. रघूनं हंसत हंसत सांगितलं–"बेत कशाचा ! घरांतली रिकामी अडगळ कमी करून टाकतों झालं – आतां काय, मी एकटा जीव सदाशिव. काय करायचा एवढा पसारा ? त्यानिमित्तानं घर स्वच्छही झालं. बरं वाटतं आता" जेवायलाही तो आतां खानावळींत जायचा. त्यामुळं खरोखरीच घर कसं आरशासारखं लख्ख दिसूं लागलं—

मधेंच एक दिवस रघूनं आपल्या सगळ्या सहकाऱ्यांना चहाला बोलावलं 'आम्हांला सोडून जायचा विचार आहे काय ?' हेड्मास्तरांनीं हसत चौकशी केली "छेः हो ! बाळचा आजार, वडलांचं दुखणं यांत सर्वांनीं इतकी मदत केली पण मला फुकाचे चार भलेपणाचे शब्दही बोलायला झालं नाहीं त्या वेळीं. जुन्या पद्धतीनं श्राद्ध – दिवस असल कांहीं मी करीत नाहीं; पण मनावर ओझं नको. म्हणून वाटलं एकदां सगळयांना चहाला बोलवावं."

"सांगून सांगायचं तर हें दिवसाचं निमित्त कशाला सांगितलं ?— कधीं कधीं अगदींच विचित्र बोलतात जोशी मास्तर" परतताना कुळकर्णी मास्तरांनीं टीकेची फोडणी दिली.

एप्रिल महिना उजाडल्यावर हेड्मास्तरांनीं रघूला बोलावणं पाठवलं. रघूला वाटलं कांहींतरी परीक्षेचं काम असेल. हेड्मास्तरांनीं त्या निवेदनाचा विषय काढला. रघू त्या निवेदनाचा विषय पार विसरून गेला होता. त्यानं अनुमानधबक्यानं विचारलं, "काय करायला हवं त्याच्याबद्दल ?"

"तुम्हीं तें निवेदन मागं घेतल्याबद्दल मला कळवलं नाहींत. आतां मंडळाची सभा घ्यायची वेळ आली. तुम्ही एकटेच राहिलेले आहांत तेव्हां काय करणार, जोशी ?"

"काय करावं अशी तुमची अपेक्षा आहे ?"

"दुसरं काय ? तें निवेदन मागं घ्या. मागं घेतलं असं लिहून द्या."

"काय पाहिजे तें तुम्हीच लिहून पाठवा. मी सही करतों—"

थोड्या वेळानं शाळेचा शिपाई टाईप केलेलं पत्र घेऊन आला. तासावरनं परत आल्यावर रघूनं तें घेतलं. त्याचे तास संपले होते. त्यानं मुद्दाम तें पत्र मोठ्यान वाचलं. त्यांत निवेदन मागं घेतलं एवढंच लिहिलेलं नव्हतं. तें पाठवण्यात मोठी चूक आणि अविचारीपणा झाला; त्याबद्दल मनःपूर्वक माफी मागून तें परत घ्यायला परवानगी द्यावी अशी विनंती केली होती !

रघूनं त्या पत्रावर सही केली. गडी कागद परत मागूं लागला. जवळच्या वहींतला एक कोरा कागद त्यानं टरकावला. त्याच्यावर चार ओळी खरडल्या. अन् सही केली. दोन्ही कागद गड्याच्या हातीं देऊन तो बाहेर पडला.

घरीं आल्यावर रघूनं राखून ठेवलेलीं चार मोठीं भांडीं होतीं त्यांची दुकानांत मोड घातली. आलेल्या पैशांत हॉटेलांत काय तोंडाला आलं तें मागून पोटात भरलं. पानाचा विडा तोंडांत कोंबला अन् तो रस्त्याला लागला.

रघू ताडताड चालला होता. त्याला मागचंपुढचं कांहीं दिसत नव्हतं. जोडरस्त्याच्या दोन्ही बाजूंनी पसरलेला भकास माळ झपझप मागं पडत होता. उखडलेल्या रस्त्यावरची अपरंपार धूळ अंग माखीत होती; तरी त्याची पर्वा न करतां रघू अंतर काटत राहिला.

नाक्यावरचा पोलीस दिसूं लागला. रघूनं एक वेळ चारी बाजूंना दृष्टि फिरवली. अजगरासारखा पसरलेला पुणें–कोल्हापूर रस्ता, त्याला आडवी मिठी मारणारे दोन रस्ते; त्याच्यावरनं मोटारी भरधाव धांवत होत्या. माणसांच्या पायरवाला खंड नव्हता. आवतीभोंवतीच्या या तुडुंब गर्दींत — जीवनाच्या धकाधकींत तो अगदीं एकटा एकटा चालला होता.

नाकं ओलांडून तो पलीकडच्या शेतांत जाऊन बसला. एकदम त्याला मोकळं वाटलं. माणसांच्या गर्दींतून बाहेर पडल्यावर वाटलेल्या या मोकळे-पणावरच त्याचं मन भरकटूं लागलं. इतका वेळ त्याचं मन काम करीत नव्हतं. तें असं भरकटूं लागल्यावर त्याला उगीचच उपमा सुचली — समुद्रांतून बाहेर पडलेल्या माशाची. पण तडफड व्हायच्या ऐवजीं आपल्याला मोकळे-पणा वाटतो — तो कां ?

**आपली स्थिति लवणाच्या मासोळीसारखी आहे. ना पाण्यांत ना पाण्याबाहेर. आपल्याला जीवनच नाहीं. थांग नाहीं. अस्तित्व नाहीं. अस्तित्व नाहीं !**

मग गाढवा, त्या माफी पत्राच्याबरोबर राजिनामा कशाला खरडलास? हॉटेलांत तोंडाला आलं तें मागून पोटात का भरलंस? तत्त्वज्ञानाच्या कुशींत दडून उघडया वस्तुस्थितीला पाठ कां फिरवतोस?

पण तोंड द्यायचं म्हणजे तरी काय? लवणाच्या मासोळीनं जगायचं म्हटलं तरी कसं?——कसं? आधी उपमेच्या क्षीण प्रमाणाला कवटाळून बसायचं सोडून दे – शिकलास काव्यप्रकाश, अलंकार – ते असा दुरुपयोग करायला नाहीं. लवणाची मासोळी म्हणे! कुठं आहे ती? तिला अस्तित्व नाहीं – तुला आहे. तूं मासोळी असशील. पण नुसती सामान्य मासोळीच! सुसंस्कृतपणाच्या, पांढरपेशेपणाच्या चवीच्या मिठाला अंग समजूं नकोस. तें मीठ साऱ्या पाण्यांत मिसळायचं आहे – समुद्राच्या खाऱ्या पाण्यातून काढलेलं मीठ – पुनः समुद्रात मिसळूं दे – तुझ्या अगांत नव्हे – त्या खाऱ्या पाण्यात तुझं जीवन आहे – डबक्यात नाहीं, मिठांत नाहीं. खाऱ्या पाण्यांतल्या मिठाची हाव धर. तें वेगळं करण्याचा किंवा झाल्याचा कृत्रिम भास सोडून टाक. ऊठ, माणसातून बाहेर पडण्यानं माणूस उरत नाहीं.

माणूस! —कुठं आहे? माणुसकी असलेला माणूस कुठं आहे? कातिलाल, बापू, कुळकर्णी मास्तर, यमू बापट – सारे द्विपादांचे सांगाडे आहेत माणुसकीचा बहाणा व्यर्थ आहे. सारं कृत्रिम आहे. अशक्य तेंच शक्य आहे. मी लवणाची मासोळीच आहे—

लवणाची मासोळी!

पांढरपेशा माणूस!

रघू जोशी?

उघड्या डोळ्यांनीं सगळीकडे पहात, सुसंस्कृतपणानं रघूचं मन भरकटत होतं.

